ISBN 978-81-925695-0-5

महाराष्ट्र राज्य ग्रंथ निवड समितीने शासनमान्य यादीकरिता
निवडलेले पुस्तक क्र. २२०/२०१३ भाग १

***बहिणाबाई चौधरी यांच्या कवितांचा अभ्यास***

संत गाडगे बाबा अमरावती विद्यापीठ व महाराष्ट्रातील विविध विद्यापीठांतील पदवी व पदव्युत्तर मराठी तसेच मराठी वाङ्मयाच्या अभ्यासक्रमांकरिता उपयुक्त संदर्भ ग्रंथ

# बहिणाईची गाणी सौंदर्य आणि समीक्षा

## डॉ. पवन मांडवकर

**सेवा प्रकाशन**

विजय कॉलनी, रुक्मिणी नगर, अमरावती ४४४ ६०६
भ्रमणध्वनी ९४२२८६७६५८ / ९४०३०१४८८५
E mail : marathipradhyapak@gmail.com

***सहयोगी वितरक***

डॉ. भाऊ मांडवकर संशोधन केंद्र
इंदिरा महाविद्यालय, कळंब, जि. यवतमाळ ४४५ ४०१

**मूल्य तीनशे पन्नास रुपये**

 ISBN 978-81-925695-0-5

 **महाराष्ट्र राज्य ग्रंथ निवड समितीने शासनमान्य यादीकरिता निवडलेले पुस्तक क्र. २२०/२०१३ भाग १**

 **ग्रंथप्रकार** संदर्भग्रंथ REFERENCE BOOK

 **बहिणाईची गाणी : सौंदर्य आणि समीक्षा**
BAHINAICHI GANI : SOUNDARYA AANI SAMIKSHA


इंदिरा महाविद्यालय, कळंब, जि. यवतमाळ

 **संशोधन/लेखन काल** २००४ ते २०१३

 **प्रथमावृत्ती** १० मार्च, २०१३ (महाशिवरात्री) सेवा प्रकाशन

 **नवीन द्वितीयावृत्ती** २८ एप्रिल, २०१७ (अक्षय्य तृतीया)
निखिल प्रकाशन, कोल्हापूर

 **तृतीयावृत्ती** १ मे, २०१८ (महाराष्ट्र दिन) सेवा प्रकाशन

 **प्रकाशन क्र.** १८५  **प्रती** १०००

 **आकार** डेमी **पृष्ठसंख्या** २५६  **मुखपृष्ठ** फोर कलर

 **संगणक / मुखपृष्ठ रचना** डॉ. पवन मांडवकर

 **प्रकाशक / मुद्रक / वितरक**
डॉ.सौ. वीरा मांडवकर, सेवा प्रकाशन
विजय कॉलनी, रुक्मिणी नगर, अमरावती ४४४ ६०६
**भ्रमणध्वनी** : ९४२२८६७६५८, ९४०३०१४८८५

(अभ्यासकांना सूचना - 'बहिणाईची गाणी' हे पुस्तक १९५२ पासून आजपर्यंत विविध साहित्यिक, संशोधक व प्रकाशकांनी प्रकाशित केले. कवितांमधील लेखनविषयक नियमांचे पालन त्या त्या लेखक किंवा संकलनकर्त्यांनी त्यांच्या धारणेनुसार अथवा उच्चारणानुसार केलेले आहे. त्यामुळे त्यात तफावत आढळते. या पुस्तकातील मते ही लेखकाची आणि विविध अभ्यासकांच्या मतांचा परामर्श घेऊन मांडलेली असली तरी नवनवीन संशोधन आणि स्थल, काल तसेच वाचकांच्या दृष्टीने त्यात वेगळेपणा असू शकतो. हीच समीक्षा ग्राह्य धरावी, असा आमचा आग्रह नसून संशोधक व अध्ययनकर्त्यांनी निष्कर्ष मांडताना संदर्भ मूलतः तपासून घ्यावेत, ही विनंती.)

 मूल्य ३५० रुपये

# बहिणाईंची गाणी
# सौंदर्य आणि समीक्षा

## अनुक्रम

# दोन शब्द

ज्या कालखंडात मराठी सारस्वतातील दिग्गज कवी आपली प्रतिभा महाराष्ट्रावर उधळीत होते, मराठी जनता ज्यांच्या काव्याच्या आस्वादात रंगून गेली होती, त्याच सुमारास खानदेशातील जळगावात राहणाऱ्या एका शेतकरी कुटुंबातील एक अडाणी स्त्री शेतात काम करता करता किंवा जात्यावर दळता दळता संसाराची गाणी गात होती. काळ्याशार भूमीत रसरशीत अंकुरासारखी ती रुजली, वाढली आणि त्या भूमीची गाणी तिने गायली. पाटीपुस्तक तर दूरच; पण अक्षराचाही गंध नसलेल्या या स्त्रीने मौलिक आणि आशयघन असा काव्यरूपातील हंडाच महाराष्ट्राला बहाल केला. मानवी जीवनाचे तत्त्वज्ञान ज्या अडाणी स्त्रीने आपल्या साध्या, सोप्या पण रसाळ भाषेत, अगदी मोजक्या शब्दात सांगितले आणि समस्त बुद्धिवाद्यांना चकित करून सोडले, अशी ही लोकमाता, भूमीकन्या, निसर्गकन्या बहिणाई म्हणजेच बहिणाबाई चौधरी.

लक्ष्मीबाई टिळक आणि बहिणाबाई चौधरी ह्या समकालीन होत्या. दोन्ही कवयित्रींचे लेखनस्वरूप फार वेगळे आहे. लक्ष्मीबाईंच्या साहित्यनिर्मितीला त्यांचे साक्षर होणे निमित्त ठरले तर बहिणाबाईंचे निरक्षरत्व कवितेतून शोभून दिसले आणि मराठी कवितेने साहित्यशास्त्राला आव्हान दिले. त्यांनी रचलेल्या खानदेशी-वऱ्हाडी भाषेतील गाण्यांना सुशिक्षित सुसंस्कृत महाराष्ट्राने अभूतपूर्व अशा कौतुकाने स्वीकारले, डोक्यावर घेतले. त्यांच्या रचनाच इतक्या प्रभावी आहेत, की त्या वाचताना किंवा अभ्यासताना वाचक झपाटून न गेला तर नवल! अशा आश्चर्यकारक रचनाकार बहिणाबाई चौधरींच्या कवितेवर अभ्यासपूर्ण, आस्वादात्मक पुस्तक लिहावे, ही फार पूर्वीची इच्छा 'बहिणाईची गाणी : सौंदर्य आणि समीक्षा'च्या रूपाने पूर्ण होत आहे, हा आनंद अवर्णनीय आहे. आस्वादक वाचकांप्रमाणेच अभ्यासक व विद्यार्थ्यांनाही या पुस्तकाचा उपयोग निश्चितच होईल!

हा ग्रंथ तयार करीत असताना संशोधन आणि अध्ययन यात बरीच वर्षे खर्ची झाली. २००३-०४ मध्ये हे काम सुरू केले. डॉ.सौ. वीरा मांडवकर यांचे आचार्य पदवीसाठी संत बहिणाबाईंवरील संशोधन या कालखंडात सुरू होते. त्यांच्या संशोधनाकरिता जे साहित्य गोळा होत होते किंवा अनेक नामवंतांनी, अभ्यासकांनी, ग्रंथपालांनी जी माहिती पुरविली त्यात संत बहिणाबाईंबरोबरच बहिणाबाई चौधरी यांचीही माहिती मिळत गेली. त्याचा उपयोग करता आला.

माझी आई प्रसिद्ध साहित्यिक डॉ. सिंधू मांडवकर, पत्नी डॉ.सौ. वीरा मांडवकर यांचा या ग्रंथनिर्मितीत मोठा सहभाग आहे. त्याचबरोबर कै. स्नेहलता चौधरी, प्रा.डॉ. प्रमिला भिरुड, डॉ. अलका चिडगोपकर, डॉ. स.ग. यादव यांच्या ग्रंथांचा फार उपयोग झाला. प्रा.डॉ. प्रमिला भिरुड यांनी स्वतः त्यांचे पुस्तक पाठवले. शिवाय श्री. अ.ग. जावडेकर (वडोदरा), सौ. सुवर्णा जाधव (मुंबई), डॉ.सौ. अबोली देशपांडे (नाशिक), श्री. सु.गो. राऊत (ग्रंथपाल, केशव गोरे स्मारक ट्रस्ट, मुंबई), श्री. प्रणव प्रकाश सोनार (नाशिक), श्री. भानुदास लक्ष्मणराव धोत्रे (सहशिक्षक, सोनखेड, ता. पूर्णा, जि. परभणी), श्री. कृष्णकांत कोळी (मुंबई), २००३ मध्ये अहमदनगरला राष्ट्रीय सेवा योजनेच्या दहा दिवसांच्या उद्‌बोधन वर्गाला माझ्या सहपाठी म्हणून सहभागी झालेल्या प्रा.सौ. उज्ज्वला पाटील (देवपूर, जि. धुळे) अशा अनेक अभ्यासकांनी, मान्यवरांनी कात्रणे, लेख, पुस्तके पाठवून किंवा माहिती कळवून मदत केली, त्या सर्वांचे मनापासून आभार. या संशोधनाच्या फलश्रुतीमध्ये या सर्वांचा मोलाचा वाटा आहे.

*- डॉ. पवन मांडवकर*

# तिसऱ्या आवृत्तीच्या निमित्ताने

२०१३ मध्ये पहिली आवृत्ती प्रकाशित झाल्याबरोबर अनेकांनी 'बहिणाईची गाणी : सौंदर्य आणि समीक्षा' या पुस्तकाची मागणी केली आणि 'साध्यासोप्या आणि रसाळ भाषेत केलेली मांडणी' असे कौतुक करून अनेक अभ्यासकांनी समीक्षणात्मक लेखनासाठी या ग्रंथाचा उपयोग केला. शासनमान्य निवड यादीमध्ये या पुस्तकाला स्थान मिळाले आणि लवकरच राजा राममोहन रॉय ग्रंथालय प्रतिष्ठान, कोलकाता यांनी ४० व्या ग्रंथखरेदी योजनेत या ग्रंथाची खरेदी करून महाराष्ट्राच्या विविध ग्रंथालयांत या पुस्तकाला पाठविले. श्री. मनोहर पाटील यांनी त्यांच्या निखिल प्रकाशन, कोल्हापूरतर्फे दुसरी नवीन आवृत्ती २०१७ मध्ये प्रकाशित करून हे पुस्तक महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यात पोचविले. पुढे संत गाडगे बाबा अमरावती विद्यापीठाच्या पदव्युत्तर मराठीच्या विशेष वाङ्मयप्रकार – कवितेच्या अभ्यासक्रमात 'बहिणाईची गाणी' हे मूळ पुस्तक समाविष्ट झाले आणि इतरही काही विद्यापीठांतून बहिणाबाईंची गाणी अभ्यासली जात असल्याने या पुस्तकाची निकड वाढली. त्यामुळे साहजिकच तिसरी आवृत्ती काढावी लागली आणि आज हे पुस्तक अध्ययनाच्या दृष्टीने बहिणाबाईंच्या मूळ कवितांचा समावेश करून आपल्यापुढे सादर करीत आहे. या आवृत्तीचेही स्वागत संशोधक, अभ्यासक आणि बहिणाबाईंच्या कवितांचा निखळ आनंद घेऊ इच्छिणारे रसिक वाचक करतील याची खात्री आहे.

***- डॉ. पवन मांडवकर***

***प्राचार्य, इंदिरा महाविद्यालय, कळंब, जि. यवतमाळ***

***अध्यक्ष, संत गाडगे बाबा अमरावती विद्यापीठ मराठी प्राध्यापक परिषद***

# बहिणाबाईंची काव्यनिर्मिती

'मराठी साहित्यातील 'मराठीपणा'चा व्यापक आयाम जपणारं आणि जोपासणारं नाव म्हणजे बहिणाबाई चौधरी! लोकसाहित्य, संतसाहित्य, आधुनिक साहित्य आदींचा संस्कृतिनिष्ठ वारसा घेऊन काव्यरचना करणारं आणि कष्टार्जित शेती-मातीच्या बोलीत जीवनाचं तत्त्वज्ञान सांगणारं 'सोपं गाणं' म्हणजे बहिणाबाईंची कविता!'[१]

बहिणाबाईंनी काव्यलेखनास केव्हा प्रारंभ केला, त्यांची पहिली आणि शेवटची कविता कोणती, हे निश्चित सांगता येणार नाही. १९५१ साली कवी सोपानदेव चौधरींनी एकत्रित करून बहिणाबाईंची कविता श्री. प्र.के. अत्रे यांच्याकडे दिली. त्यावर कुठेही कालखंड नमूद नाही. तरीही पतीच्या निधनानंतर बहिणाबाईंना कविता स्फुरली असावी असे वाटते. त्यांच्या कवितेत विविध विषय आणि विविध भावभावनांचा आविष्कार आहे. त्यावरून पतीच्या निधनाचे दुःख ही त्यांच्या कवितेतील प्रारंभिक अवस्था असली तरी पुढे त्यांच्या रचनांचा विचार यष्टीपासून समष्टीपर्यंत विकसित झालेला दिसतो.

बहिणाबाईंच्या कवितेचा पहिला श्रोता त्यांचा मुलगा सोपानदेव हा होता. सोपानदेव स्वतः सांगतात, 'मी मराठी शाळेत असताना (मला वाटते चौथ्या इयत्तेत असेन) जुनी पुस्तके चाळीत होतो. चाळता चाळता दुसऱ्या इयत्तेचे पुस्तक माझ्या हाती आले. शाईचे डाग पडलेल्या माझ्या काही विशिष्ट खुणा त्या पुस्तकात मी हुडकीत होतो. तोच माझ्या आवडीचा एक धडा मला दिसला. त्याचा मथळा 'सावित्रीचे चातुर्य'. तो धडा मोठ्या ऐटीत मी वाचू लागलो. आई माझ्याजवळ येऊन लक्षपूर्वक ऐकत होती. मला वाटले, माझ्या अशिक्षित आईला त्यातले काय कळणार? त्यानंतर सकाळी रामप्रहरात आई दळायला उठली. जात्याच्या घरघरीबरोबर तिच्या ओठांतून बाहेर पडणाऱ्या मंजूळ ओव्या माझ्या कानी पडताच मी तिच्या मांडीवर डोके ठेवून पडलो. आई ओव्या गात होती.

'सायत्री सायत्री
सत्येवानाची सावली
निघे सत्यवान
त्याच्या माघून धावली'

ह्या दोनच ओळी आता मला आठवतात. दुर्दैवाने सर्व ओव्या आज उपलब्ध नाहीत. दळण सरल्यावर मी आईला विचारले, 'या ओव्या तुला कुणी

शिकवल्या?' त्यावर ती म्हणाली, 'कालदी तुनं माले धडा वाची दाखवला, त्याचज गानं माह्या मनानं मी म्हनत व्हती! (काल तू मला धडा वाचून दाखविला, त्याचंच गाणं मी माझ्या मनाने गात होते.)' तिचे हे उत्तर ऐकताच मी थक्क झालो.'[२]

येथे एक गोष्ट लक्षात घेतली पाहिजे की, 'सावित्रीचे चातुर्य' या धड्याचा आशय सोपानदेवांच्या मनावर कितपत बिंबला, हे महत्त्वाचे नसून निरक्षर बहिणाबाईंनी तो काव्यानुभव म्हणून कसा आत्मसात केला, हे महत्त्वाचे ठरते.

सकाळी रामप्रहरी जात्यावर दळता दळता त्यांच्या मुखातून ओव्या बाहेर पडायच्या. त्या ओव्या पुढे सोपानदेव टिपून घेऊ लागले. त्या काळात कष्ट करताना म्हटली जाणारी गाणी स्त्रीजीवनाच्या सुखदुःखाची साक्षीदार ठरते. स्त्रीजीवनाचे आणि ओव्यांचे हे असे अतूट नाते आहे. ओव्या रचणाऱ्या या स्त्रीला आपण काव्यनिर्मिती करीत आहोत, याची जाणीवही नव्हती. बहिणाबाईंनी आपल्या जीवनातील सुखदुःखाच्या अनेक प्रसंगांना ओवीबद्ध केले. जात्यातून पीठ सहज पडावे, तशा त्यांच्या रचना घडत गेल्या. अभिजात लाभलेली काव्यप्रतिभा ही त्यांच्या अंतिम श्वासापर्यंत सोबत होती. त्यांचे चिंतनशील सजग मन विविध घटकांचे, प्रसंगांचे, मानवी प्रवृत्तींचे, जीवनव्यवहाराचे निरीक्षण करीत होते. या निरीक्षणातून त्यांची कविता फुलत गेली. त्यांच्या कित्येक रचनांना तुकोबांच्या रचनांप्रमाणे सुभाषितांचा दर्जा प्राप्त झाला. अशा अनेक वैशिष्ट्यांमुळे त्यांची काव्यनिर्मिती ग्रामीण आणि नागर रसिकवाचक अशा सर्वांनाच आकृष्ट करते.

संतांनी आपल्या काव्यनिर्मितीचे श्रेय परमेश्वराला दिले. बहिणाबाईसुद्धा आपल्या रचनांमागे ईश्वरी प्रेरणा असल्याचे नमूद करतात. 'माझी माय सरसोती' या कवितेतून त्यांच्या काव्यनिर्मितीचे रहस्य उलगडते. तुकोबा ज्याप्रमाणे 'बोलविता धनी वेगळाची' असल्याचे सांगतात, त्याप्रमाणेच बहिणाबाईंना ही सरस्वतीमाता आपल्याला बोलणे शिकवते, असे वाटते.

'माझी माय सरसोती
माले शिकवते बोली
लेक बहिनाच्या मनी
किती गुपितं पेरली!'
('माझी माय सरसोती', 'बहिणाईची गाणी', पृ. ३)

अशी असंख्य काव्यबीजे सरस्वतीने आपल्या मनात रुजवली आहेत, असे सांगणाऱ्या बहिणाबाईंना पांडुरंगाच्या गीता-भागवताशी जिव्हाळ्याचे नाते जोडावेसे वाटते. शेतात पेरलेले बी पावसात भिजते, मातीतून उगवते, तशा त्यांच्या मनातील काव्यविषयक जाणिवा शब्दरूपाने उगवतात. परमेश्वराप्रती भक्तिरसाची गोडी आपल्या जिभेवर रेंगाळत असल्याने आपल्या ओठी कवितेचे पीक येते, असे त्या प्रांजळपणे सांगतात.

'बहिणाबाई चौधरी खरंतर एक निरक्षर शेतकरी स्त्री; पण गाणं म्हटल्याशिवाय त्यांना राहावयाचं नाही. गाणं ही त्यांची जणू सहजप्रवृत्ती होती. आपण जे गीत गातो, ते 'काव्य' ह्या संज्ञेस प्राप्त होऊ शकतं, याची जाणीवही त्यांना नव्हती. जाणिवेच्या या नेणिवेमुळेच त्यांचे काव्य अक्षर, अजर ठरले. Poets are born, not made ही उक्ती बहिणाबाईंचे काव्य वाचताना सार्थ वाटते.'[३]



## संदर्भ :

१. चंदनशिव, भास्कर, 'मलपृष्ठावरील मजकूर', डॉ. अलका चिडगोपकर, बहिणाबाईची गाणी : एक काव्यदर्शन, प्रथमावृत्ती, स्नेहवर्धन पब्लिशिंग हाऊस, पुणे, २०००, मलपृष्ठ.

२. चौधरी, सोपानदेव, 'निसर्गकन्या बहिणाई – माझी आई', भाग २, बहिणाईची गाणी, बहिणाबाई चौधरी, सातवी आवृत्ती, सुचित्रा प्रकाशन, मुंबई, १९९९, प्रा.पृ. ६५.

३. खानझोडे, (डॉ.) विजया, 'बहिणाईचे माहेर', मधुरा पुरवणी, दै. सकाळ, पुणे, दि. १७–८–२००५, पृ. ५.



# बहिणाबाईंचे चरित्र : एक दृष्टिक्षेप

इ.स. १८८० च्या नागपंचमीला बहिणाबाई चौधरींचा जन्म 'आसोदे' (असोदे) ह्या गावी झाला. हे गाव जळगाव शहरापासून अवघे २ मैलांवर होते. बहिणाबाईंचे वडील उखाजी (उखर्डू) हे गावचे महाजन होते. साहजिकच त्यांच्या घराण्याला गावात प्रतिष्ठा होती. ते कर्तृत्ववान होते. त्यांचा व्यवहार स्वच्छ होता. घरी नेहमीच येणाऱ्या जाणाऱ्यांची रीघ लागलेली असे.

'बापाजीच्या हायलीत
येती शेट शेतकरी
दारी खेटरांची रास
घरी भरली कचेरी'

('माहेर', 'बहिणाईची गाणी', पृ. ४)

पुढे त्या म्हणतात,

'गावामधी दबदबा
बाप महाजन माझा
त्याचा काटेतोल न्याव
जसा गावामधी राजा'

('माहेर', 'बहिणाईची गाणी', पृ. ४)

काटेतोल न्याय करणारे वडील 'उखाजी' तर आई 'भीमाबाई' (भीमाई) - सर्वांचे भले चिंतणारी, प्रेमळ स्वभावाची, सर्वांना शीतल छाया देणारी.

'माय भीमाई माऊली
जशी आंब्याची साऊली'

('माहेर', 'बहिणाईची गाणी', पृ. ४)

बहिणाबाईंना घनःश्याम, गणपत, धनाजी हे तीन भाऊ तर सीता, तुळसा, अहिल्या ह्या तीन बहिणी होत्या.

'आम्ही बहिनी आम्हाला
सीता, तुळसा, बहिना
देल्या अशीलाचे घरी
सगेसाई मोतीदाना'

('माहेर', 'बहिणाईची गाणी', पृ. ४)

बहिणाबाईंचा विवाह वयाच्या तेराव्या वर्षी जळगावच्या नथूजी खंडेराव चौधरींबरोबर झाला. माहेराप्रमाणेच सासरचे घराणेही प्रतिष्ठित होते. सासरी सर्व कुटुंब एकत्र राहत होते; पण लवकरच ते कुटुंब विभक्त झाले. वाटण्या झाल्या. वाट्याला आलेल्या घरात, मिळालेल्या मोजक्या जमिनीवर कष्ट करत बहिणाबाई पतीसह राहू लागल्या. २-३ वर्षांनी दुष्काळ पडला. दुष्काळाच्या काळात त्यांना खडी फोडण्याचे कामही करावे लागले. खडतर अशी जीवनाची वाट त्यांच्या वाट्याला आली. वाड्यातले धान्याचे पेव संपले. पेव म्हणजे जमिनीत खोलवर विहिरीप्रमाणे खणून, शेणाने सारवून, लिंपून त्यात धान्य साठवले जाते. इंग्रज सरकारने जळगावच्या मेहेरूण गावाला दुष्काळी काम म्हणून तलाव बांधायचे ठरवले. बहिणाबाईही शेती सोडून कामावर गेल्या. बहिणाबाईंनी जो देवाचा प्रथम शोध घेतला तो या परिस्थितीत. 'टाया पिटिसन देव भेटत नाही' हे त्यांनी जाणले. 'ज्याच्या हाताला घट्टे, त्याले देव भेटे।' हे त्यांना पटले.

बहिणाबाईंना दोन मुले आणि एक मुलगी झाली. ओंकार, सोपान आणि काशी. दुर्दैवाने तिशीच्या आतच त्यांच्यावर वैधव्याची आपत्ती कोसळली. त्या काळात स्त्रीचा आधार म्हणजे पतीच असे. जोडीदार गेला म्हणजे संसाररथाचे एक चाकच निखळले.

'अरे रडता रडता
डोये भरले भरले
आसू सरले सरले
आता हुंदके उरले!...
सांग सांग धर्ती माता
अशी कशी जादू झाली
झाड गेलं निंघीसनी
मांघे सावली उरली!'

('आता माझा माले जीव', 'बहिणाईची गाणी', पृ. २२)

बहिणाबाईंना आता जगायचे होते ते मुलांसाठी.

'देव गेले देवाघरी, आठी ठेयीसनी ठेवा
डोयापुढे दोन लाल, रडू नको माझ्या जीवा'

('आता माझा माले जीव', 'बहिणाईची गाणी', पृ. २२)

असा स्वतःला धीर देऊन त्यांनी जीवन मार्ग पुढे आक्रमित केला; पण 'सुख पाहता जवापाडे, दुःख पर्वताएवढे' या उक्तीप्रमाणे बहिणाबाईंवर संकटेच अधिक आली. त्यांची मुलगी काशी हिचे लग्न बालवयात झाले. तिला सासरी फारसे सुख लाभू शकले नाही. मोठा मुलगा ओंकार हा प्लेगमधून वाचला; पण अपंग झाला. ओंकारच्या पत्नीलाही संसार सावरण्यासाठी कष्ट करावे लागले. त्यांना पांडुरंग नावाचा मुलगा होता. बहिणाबाईंचा दुसरा मुलगा म्हणजेच कवी सोपानदेव चौधरी. सोपाननेही पहिल्या पत्नीला घटस्फोट दिला व दुसरा प्रेमविवाह केला. ही सगळी संकटे बहिणाबाईंनी एकट्याने पचवली.

सोपानदेवांनी पत्नी लीलादेवींबरोबर नाशिकला बिऱ्हाड केले. तिथे बहिणाबाई जात असत. तिथे बहिणाबाईंवा लक्ष्मीबाई टिळक, जानकीबाई साठे अशा मोठ्या व्यक्तींशी परिचय झाला. त्या परिचयातून, चर्चेतून बहिणाबाईंचे काव्य अधिक फुलले. संकटांना दूर सारताना त्या स्वतःच्या मनाला समजावत,

'रडू नको माझ्या जीवा
तुले रडव्याची रे सव
रडू हासव जरा
त्यात संसाराची चव'

('आता माझा माले जीव', 'बहिणाईची गाणी', पृ. २२)

तरीही अनेकदा कर्जबाजारीपणामुळे त्यांचा जीव व्यथित व्हायचा. हातातोंडाची गाठ जोडताना पांडुरंगाला त्या म्हणतात,

'अरे पांडुरंगा तुझी
कशी भक्ती करू सांग
तुझ्या रूपाआड येतं
सावकाराचं रे सोंग'

('स्फुट ओव्या', 'बहिणाईची गाणी', पृ. ८९)

पण बहिणाबाईंच्या संघर्षातही सकारात्मक पैलू जाणवतो. तळागाळातील माणसांच्या दुःखाचा, वेदनांचा वेध त्या घेतात. परमेश्वरावर डोळस श्रद्धा ठेवतात; पण त्यापेक्षा अधिक विश्वास आपल्या कर्तृत्वावर ठेवतात. 'माझी माय सरसोती, माले शिकवते बोली' असे सांगणाऱ्या बहिणाबाईंनी जीवनाच्या तत्त्वज्ञानाची उकल करून अनेक गुपिते काव्यातून उघड करून अनमोल असा ठेवा जगाला दिला आहे.

३ डिसेंबर १९५१ रोजी बहिणाबाईंनी इहलोकाचा निरोप घेतला. ह्या थोर कवयित्रीची गोड परंतु परखड भाष्य करणारी बरीचशी गाणी सोपानदेव व त्यांचे मावसबंधू श्री. पीतांबर चौधरी यांनी टिपून ठेवली होती. ते हस्तलिखित सोपानदेवांना आईच्या निधनानंतर सापडले आणि त्यांनी ते आचार्य अत्रे यांच्याकडे नेले. "अहो, हे बावनकशी सोनं आहे! हे महाराष्ट्रापासून लपवून ठेवणं, हा गुन्हा आहे."[१] असे अत्रे त्या कविता चाळताच भावनावश होऊन ओरडले. १९५२ मध्ये 'बहिणाईची गाणी'ची पहिली आवृत्ती निघाली आणि महाराष्ट्राला काव्यरूपी मोहरांचा हंडा मिळाला.



## संदर्भ :

१. अत्रे, प्र.के., 'पहिल्या आवृत्तीची प्रस्तावना', बहिणाईची गाणी, सातवी आवृत्ती, सुचित्रा प्रकाशन, मुंबई, १९९९, प्रा.पृ. ६.



*लक्ष्मीबाईंसारखाच बहिणाबाईंचा जिव्हाळा जबर आहे. त्यांच्या शब्दाशब्दांतून प्रतिभा नुसती झिरपते आहे. असे सरस आणि सोज्ज्वळ काव्य मराठी भाषेत फार थोडे आहे. मौज ही आहे की, जुन्यात चमकेल आणि नव्यात झळकेल असे त्यांचे तेज आहे. एका निरक्षर आणि अशिक्षित शेतकरी स्त्रीने हे सारे रचलेले आहे, हा तर तोंडात बोट घालायला लावील असा चमत्कार आहे.*

(अत्रे, प्रल्हाद केशव, 'परिमळ' पहिल्या आवृत्तीची प्रस्तावना, बहिणाईची गाणी, बहिणाबाई चौधरी, सातवी आवृत्ती, सुचित्रा प्रकाशन, मुंबई, १९९९, प्रा.पृ. ५.)

# बहिणाईची गाणी : विविध आवृत्त्या

जीवनानुभूतीने नटलेली बहिणाईंची गाणी १९५२ च्या डिसेंबर महिन्यात प्रथमतः वाचकांसमोर आली. हृदयाचा ठाव घेणारी ही गाणी 'ग.पां. परचुरे प्रकाशन मंदिर', मुंबई यांनी प्रथमावृत्तीच्या रूपाने प्रकाशित केली. आचार्य प्र.के. अत्रे यांची प्रस्तावना आणि सोपानदेव चौधरी यांनी व्यक्त केलेल्या त्यांच्या आईबद्दलच्या व त्यांच्या काव्याबद्दलच्या भावना पुस्तकाच्या प्रारंभी जोडल्या आहेत. प्र.के. अत्रे, सोपानदेव चौधरी यांच्या व्यतिरिक्त सौ. लीलादेवी चौधरी यांनी या ग्रंथनिर्मितीत पुढाकार घेतला होता.

पहिल्या आवृत्तीत एकूण ३५ कविता समाविष्ट आहेत, त्या खालीलप्रमाणे -

१. आदिमाया, २. माहेर, ३. कशाला काय म्हनूं नही, ४. संसार, ५. घरोटं, ६. मन, ७. हिरीताचं देनंघेनं, ८. लपे करमाची रेखा, ९. वाटच्या वाटसरा, १०. शेतीची साधने, ११. आला पाऊस, १२. पेरनी, १३. देव अजब गारोडी, १४. कापनी (कापणी), १५. रगडनी (मळणी), १६. उपननी, १७. मोट हाकतो एक, १८. गाडी जोडी, १९. गुढी उभारनी, २०. आखजी (अक्षय्यतृतीया), २१. पोया (पोळा), २२. गोसाई, २३. जयरामबुवाचा मान, २४. खोकली माय, २५. काय घडे आवगत, २६. आप्पा महाराज, २७. आली पंढरीची दिंडी, २८. विठ्ठल मंदिर, २९. खरा देवामधी देव, ३०. मानूस, ३१. पिलोक (प्लेग), ३२. चुल्हा पेटता पेटेना, ३३. स्फुट ओव्या, ३४. काही व्यक्तिचित्रे, ३५. धरत्रीले दंडवत.

'बहिणाईची गाणी' या पुस्तकाची दुसरी आवृत्ती १९६९ मध्ये म्हणजेच प्रथमावृत्तीनंतर १७ वर्षांनी, तर तिसरी आवृत्ती १९७८ मध्ये निघाली. ह्या आवृत्तीच्या निर्मितीत बहिणाबाईंच्या नातसून सौ. सुचित्रा मधुसूदन चौधरी यांनी पुढाकार घेतल्याचे लक्षात येते.

प्र.के. अत्रे यांच्या दुसऱ्या प्रस्तावनेशिवाय ३ डिसेंबर, १९७६ रोजी 'दै. लोकसत्ता'मधून बहिणाबाईंच्या पुण्यतिथीनिमित्त प्रकाशित झालेला सुप्रसिद्ध कवियित्री इंदिरा संत यांचा लेखही ग्रंथात जोडला आहे.

या आवृत्तीत प्रथमावृत्तीनंतर कवी सोपानदेव चौधरींना सापडलेल्या बहिणाबाईंच्या काही अपुऱ्या, स्फुट ओव्या, नव्या कविता, म्हणी यांचा समावेश केला आहे. एकूण काव्यरचना संख्या ५० झाली आहे. नव्याने समाविष्ट केलेल्या कविता अशा -

१. माझ्या जीवा, २. आता माझा माले जीव, ३. खोप्यामधी खोपा, ४. सासुरवाशीन, ५. योगी आणि सासुरवाशीण, ६. घरापासून मळ्याकडे, ७. अनागोंदी कारभार, ८. नही दियामधी तेल, ९. माझी मुक्ताई, १०. देव दिसला, ११. देव कुठे, १२. रायरंग, १३. मी कोन?

ओव्यांमध्ये १७ ओव्यांची भर घातली आहे.

१. जसा बोल्याले कर्‍य, २. बोरू चाले कुरूकुरू, ३. धर्तीवरली हिर्वय, ४. उठा उठा बहिनाई, ५. जव्हा इमान सचोटी, ६. किल्ल्या राह्यल्या ठिकानी, ७. माझं दुखं, माझं दुखं, ८. माझं दुखं, माझं दुखं (दुसरी ओवी), ९. अरे छापीसनी आलं, १०. अरे देवा तुझं देनं, ११. अरे देवा तुझं घेनं, १२. गानं आलं कानामधी, १३. सोता झाला रे आरसा, १४. माय म्हनता म्हनता, १५. माय म्हतली म्हतली, १६. ताता म्हनता म्हनता, १७. जीजी म्हनता म्हनता.

या आवृत्त्यांमध्ये २९ म्हणीही जोडल्या आहेत.

'बहिणाईची गाणी'ची चौथी आवृत्ती १९८२ मध्ये, पाचवी १९८७ मध्ये, सहावी १९९८ मध्ये तर सातवी आवृत्ती १९९९ साली निघाली.

सातव्या आवृत्तीत प्र.के. अत्रे यांच्या प्रथम व द्वितीय आवृत्तीच्या प्रस्तावना, इंदिरा संतांचा लेख, 'सप्तसरिता काव्यसंग्रहातील सरिता दर्शन' ह्या प्रस्तावनेमधील डॉ. मालती किर्लोस्करांचे 'बहिणाई काव्यदर्शन' या शीर्षकाखालील विचार, कवयित्री पद्मा लोकूर यांचा 'जागेपणचे स्वप्न' या शीर्षकाखालील लेख, 'बहिणाईची गाणी - एक चिंतन' म्हणून सदा कऱ्हाडे यांचा लेख, चित्रपट महर्षी वसंतराव जोगळेकर यांची 'चित्रपटरूप 'बहिणाबाई' निवेदन भावांजली', सोपानदेव चौधरी यांचे दोन प्रस्तावनापर लेख यांचा समावेश आहे.

या व्यतिरिक्त कवी बा.भ. बोरकर यांचे बहिणाबाईंचा काव्यगौरव करणारे त्यांच्या हस्ताक्षरातील पत्रही जोडले आहे.

अवघ्या पन्नास कवितांनी मराठी सारस्वतात आपला ठसा उमटवणाऱ्या बहिणाबाई एक चमत्कारच म्हणावा लागेल. अजूनही त्यांच्या पुस्तकांच्या आवृत्त्या विविध प्रकाशकांमार्फत निघतच आहेत आणि रसिक वाचकांसह अभ्यासकही मोठ्या प्रमाणावर या कवितांवर सखोल चिंतन करीत आहेत.



# बहिणाबाईंच्या कवितांचे वर्गीकरण

बहिणाबाईंच्या एकूण रचनांची संख्या म्हणी व स्फुट ओव्या धरून १३४ होते. त्यांच्या रचनांचे वर्गीकरण सर्वसामान्यपणे असे करता येईल -

१. सामाजिक आशयपर कविता - ९
२. निसर्गकविता - ९
३. आध्यात्मपर किंवा श्रद्धादर्शी कविता - ९
४. जीवनविषयक तत्त्वज्ञानपर कविता - ९
५. वर्णनात्मक कविता - १३
६. स्फुट ओव्या - ५६ (समान विषयपर मोजल्यास ४१)
७. म्हणी - २९

## १. सामाजिक आशयपर कविता -

१. माहेर, २. संसार, ३. घरोटं (जातं), ४. वाटच्या वाटसरा, ५. आखजी, ६. पोया, ७. माहेराची वाट, ८. गुढी उभारनी, ९. सासुरवाशीन, १०. अनागोंदी कारभार

## २. निसर्गकविता -

१. पेरनी, २. देव अजब गारोडी, ३. कापनी, ४. रगडनी, ५. उपननी, ६. धरत्रीले दंडवत, ७. आला पाऊस, ८. पेरनी, ९. मोट हाकलतो एक

## ३. आध्यात्मपर किंवा श्रद्धादर्शी कविता -

१. माझी माय सरसोती, २. मोट हाकलतो एक, ३. हिरीताचं देनं घेनं ४. मी कोन?, ५. परसुराम बेलदारा, ६. आदिमाया ७. आली पंढरीची दिंडी, ८. विठ्ठल मंदिर, ९. खरा देवामधी देव

## ४. जीवनविषयक तत्त्वज्ञानपर कविता -

१. योगी आणि सासुरवाशीन, २. मन, ३. लपे करमाची रेखा, ४. खोप्यामधी खोपा, ५. खोकली माय, ६. कशाले काय म्हनू नही, ७. संसार, ८. माझ्या जीवा, ९. आता माझा माले जीव, १०. काय घडे आवगत

## ५. वर्णनात्मक कविता -

१. गोसाई, २. जयरामबुवाचा मान, ३. अनागोंदी कारभार, ४. नही दियामंधी तेल, ५. काय घडे आवगत, ६. खरा देवामंधी देव, ७. रायरंग, ८. पिलोक, ९. चुल्हा पेटता पेटेना, १०. शेतीची साधने, ११. गाडी जोडी, १२. घरापासून मळ्याकडे.



### निवडक शब्दांचे अर्थ

आग्या - काजवा
आडोय - विहिरीला बसविलेले
आढवानी - अनवाणी
आधरतायी - अधांतरी
आपसुक - आपोआप
आयी - आळी, किडा
आरदटाकेल - निष्ठूर
आराई - आरोळी
आवतन - निमंत्रण
उपननी - धान्यातील भुसा वाऱ्याने उडविणे
कना - कणा, विहिरीच्या लाकडाला लावलेले लांबोळे
करतुत - कर्तृत्व
कर्रय - कठोर
कान्ही - बिन दाण्याचे काळे कणीस
कारोन्या - करुणा
खिरनी - निंबोळीच्या आकाराचे गोड फळ
खैमाना - सत्यनाश
गह्यरीसन - गहिवरून
गिऱ्हे - ग्रह
चाकी - गोल भोपळा
जुवा - उवा
टहस - महान
ठांगय - ठांगळ, भाकड
डाडोर - पोटाची ढेरी
डाब - डबके
ढोरकी - गुराखी
तिवस - एक प्रकारचे चिवट लाकूड
थायन्यात - थारोळ्यात
दुल्ळी - दुरडी, भाकरीची टोपली
धुक्क्य - धूर
नाडा समदूर - मोटेचा दोरखंड
नानावटी - श्रीमंत
नित्तय - नितळ
निमानतोंड्या - दुर्मुखलेला
नेटे - नजीक

# बहिणाबाईंच्या कविता आणि त्यांचा थोडक्यात परिचय

बहिणाबाई निरक्षर असूनही आपल्या उपजत प्रतिभाशक्तीच्या बळावर त्यांनी अर्थगर्भ, रसाळ, प्रासादिक रचना केल्या. त्या रचनांचा थोडक्यात परिचय करून घेणे आवश्यक ठरते. हा परिचय म्हणजे कवितेचा परिपूर्ण अर्थ नव्हे, हे अभ्यासकांनी लक्षात घ्यावे.

## १. येडीमाय (आदिमाया)

अशी कशी येळी वो माय, अशी कशी येळी?
बारा गाडे काजळ कुंकू
पुरलं नही लेनं
साती समदूराचं पानी
झालं नही न्हानं
अशी कशी येळी वो माय, अशी कशी येळी?

धरतीवरलं चांदीसोनं
दागिन्याची तूट
आभायाचं चोयी लुगडं
तेभी झालं थिटं
अशी कशी येळी वो माय, अशी कशी येळी?

इडा पिडा संकटाले
देल्हा तुने टाया
झाल्या तुह्या गयामंधी
नरोंडाच्या माया
अशी कशी येळी वो माय, अशी कशी येळी?

बरह्मा इस्नू रूद्र बाळ
खेळईले वटी
कोम्हायला फुटे पान्हा

गानं आलं व्होटी
अशी कशी येळी वो माय, अशी कशी येळी?

नशिबाचे नऊ गिऱ्हे
काय तुझ्या लेखी?
गिऱ्हानाले खाईसनी
कशी झाली सुखी?
अशी कशी येळी वो माय, अशी कशी येळी?

नऊ झनासी खाऊन गेली
सहज एक्या गोष्टी
दहाव्याशी खाशीन तव्हा
कुठे राहीन सुर्ष्टी
अशी कशी येळी वो माय, अशी कशी येळी?

ही एक आध्यात्मिक किंवा श्रद्धादर्शी कविता आहे. या कवितेतून आदिमायेला उद्देशून बहिणाबाईंनी तिच्या अचाट शक्तीचे वर्णन केले आहे. सातासमुद्रांचे पाणी बारा गाड्या भरून काजळ-कुंकू पृथ्वीवरील सर्व चांदी-सोने प्राप्त होऊनही ती अतृप्तच दिसते. जिच्या मांडीवर ब्रह्मा-विष्णू-महेश खेळले, तरीसुद्धा तिची तृप्ती होत नाही, म्हणून कवयित्री म्हणतात,

'अशी कशी येळी वो माय, अशी कशी येळी?'

आदिमायेची जी अनेक रूपे आहेत, ती अनाकलनीय आहेत, म्हणूनच बहिणाबाईंनी जमेल तसे वेडेवाकडे वर्णन मनापासून या कवितेत केले आहे.

## २. माझी माय सरसोती

माझी माय सरसोती
माले शिकवते बोली
लेक बहिनाच्या मनी
किती गुपितं पेरली!

माझ्यासाठी पांडुरंगा
तुझं गीता-भागवत
पावसात समावतं
मातीमधी उगवतं!

अरे देवाचं दर्शन
झालं झालं आपसुक
हिरीदात सूर्यबापा
दाये अरूपाचं रूप!

तुझ्या पायाची चाहूल
लागे पानापानांमधी
देवा तुझं येनंजानं
वारा सांगे कानामधी

फुलामधी समावला
धरत्रीचा परमय
माझ्या नाकाले इचारा
नथनीले तिचं काय?

किती रंगवशी रंग
रंग भरले डोयात
माझ्यासाठी शिरिरंग
रंग खेये आभायात

धर्तीमधल्या रसानं
जीभ माझी सवादते
तव्हा तोंडातली चव
पिंडामधी ठाव घेते!

बहिणाबाईंना प्रतिभेचे वरदान कुठून लाभले, तर जणू साक्षात सरस्वतीचा वरदहस्तच त्यांच्यावर आहे आणि सोबत पांडुरंगाची कृपाही.

'माझ्यासाठी पांडुरंगा, तुझं गीता-भागवत
पावसात समावतं, मातीमधी उगवतं!'

('माझी माय सरसोती', 'बहिणाईची गाणी', पृ. ३)

पांडुरंगाचे गीता-भागवत पावसात सामावून मातीत उगवते. म्हणजेच चराचरात, नैसर्गिक क्रियाप्रक्रियांमध्ये बहिणाबाईंना गीता-भागवतातील तत्त्वज्ञानाची शिकवण मिळते आणि परमेश्वराचे दर्शन घडते.

## ३. माहेर

बापाजीच्या हायलीत
येती शेट शेतकरी
दारी खेटरांची रास
घरी भरली कचेरी

गावामधी दबदबा
बाप महाजन माझा
त्याचा काटेतोल न्याव
जसा गावामधी राजा

माय भीमाई माऊली
जशी आंब्याची साऊली,
आम्हाईले केलं गार
सोता उन्हात तावली

तुझे भाऊ देवाघरी
नही मायबाप तुले
तुले कशाचं माहेर
लागे कुलूप दाराले

भाऊ 'घमा' गाये घाम
'गना' भगत गनात
'घना' माझा लिखनार
गेला शिक्याले धुयात

आम्ही बहिनी 'आह्यला'
'सीता', 'तुयसा', 'बहिना'
देल्या अशिलाचे घरी
सगेसाई मोतीदाना

लागे पायाले चटके
रस्ता तापीसनी लाल

माझ्या माहेराची वाट
माले वाटे मखमल
　　जीव व्हतो लाही लाही
　　चैत्र वैसागाचं ऊन
　　पाय पडता ‘लौकी’त
　　शीन जातो निंघीसन
तापीवानी नही थडी
जरी वाहे थोडी थोडी
पानी ‘लौकी’चं नित्तय
त्याले अम्रीतीची गोडी
　　माहेरून ये निरोप
　　सांगे कानामंधी वारा
　　माझ्या माहेराच्या खेपा
　　‘लौकी’ नदीले इचारा

स्वतःच्या माहेरचे वर्णन बहिणाबाई या कवितेत करतात. बापाजीच्या हवेलीचे वैभव वर्णन करतात. वडील गावचे महाजन होते. गावात त्यांचा दबदबा होता. तसेच स्वतः उन्हात तापून इतरांना आंब्याच्या सावलीप्रमाणे थंडगार सावली देणारी आई भीमाई; पण आईचे आईवडील, भाऊ सारे देवाघरी गेल्याने आपल्या आईला माहेर नाही, या जाणिवेने बहिणाबाईंचे मन गहिवरते. बहिणाबाई आपल्या भावंडांच्या सहवासातले दिवस, माहेरी येण्याचा निरोप सांगणारा वारा आणि किती वेळा त्या माहेरी गेल्या, हे सांगणारी लौकी नदी यांचे वर्णन त्या करतात.

## ४. माहेराची वाट

आज माहेराले जानं
झाली झाली वो पहाट
आली आली वो डोयापुढे
माझ्या माहेराची वाट
　　रातदिन गजबज
　　असं खटल्याचं घर

सदा आबादी आबाद
माझं ‘आसोद’ माहेर

माझ्या माहेराच्या वाटे
तांडे पानाचे लागले
पानं कतरतो बारी
लागे बारीन येच्याले

माझ्या माहेरच्या वाटे
रेलवाईचे फाटुक
आग्गाडीचं येनंजानं
तिले कशाची आटक?

माझ्या माहेराच्या वाटे
‘लौकी’ लागली लागली
वाटच्या रे वाटसरा
तुझी तहान भागली

माझ्या माहेराच्या वाटे
पिव्वी चिकनास खारी
पानी पावसाया आंधी
जाते धाब्याधाब्यावरी

माझ्या माहेराच्या वाटे
देखा बाभयीचं बन
चुल्हा लहाडीच्यासाठी
घराघरात बैतन

माझ्या माहेराच्या वाटे
डाबा पान्याच्या लागल्या
म्हशी बसल्या पान्यात
जशा वरमाई न्हाल्या

माझ्या माहेराच्या वाटे
देख मये चारोमेरी
गाड्या ऊसाच्या चालल्या
बुधवारच्या बाजारी

माझ्या माहेराच्या वाटे

घंट्याघुंगराचा नाद
येती जाती बैलगाड्या
धुरकरी घाले साद

मांघे पोत्यातून गये
गव्हाजवारीची धार
पाखराचा जमे बेत
दाने खाई झाले गार

माझ्या माहेराच्या वाटे
गायी म्हशीचं खिल्लार
गावामधी बरकत
दह्यादुधाची रे ढेर!

माझ्या माहेराच्या वाटे
कोन्ही भिकारी-टकारी
आला भीक मांगीसनी
झोयी गेली सम्दी भरी

माझ्या माहेराच्या वाटे
कोन्ही भिलीन बायजा
खाले उतारली पाटी
म्हने कटेलं लेयजा

माझ्या माहेराच्या वाटे
जरी आले पायी फोड
पाय चालले चालले
अशी माहेराची ओढ

माझ्या माहेराच्या वाटे
जरी लागल्या रे ठेचा
वाटवरच्या दगडा
तुले फुटली रे वाचा!

नीट जाय मायबाई
नको करू धडपड
तुझ्याच मी माहेराच्या
वाटंवरला दगड

माझ्या माहेराच्या वाटे
माले लागली गुचकी
आली उडत उडत
एक दिसली सायंकी

माझ्या माहेराच्या वाटे
मारे सायंकी भरारी
माझ्या जायाच्याच आधी
सांगे निरोप माहेरी

ऊठ ऊठ भीमामाय
काय घरात बसली
कर गुरमय रोट्या
लेक बहिनाई आली

माहेराच्या वाटेचे वर्णन बहिणाबाई करतात. नागवेलीचे मळे, त्यांचा मालक, त्याने कातरलेली पाने, वेचणारी मालकीण, मध्येच लागणारे आगगाडीच्या रुळांवरील फाटक, वाटेवरची लौकी नदी (किंवा ओढा?) अशी वर्णने त्यांनी केली आहेत.

वाटेवरची पिवळी चिकण खारी गावातील धाब्याधाब्यावर टाकली जाते. त्यामुळे पावसापासून रक्षण होते. डबक्यांमध्ये डुंबणाऱ्या म्हशी पाहून बहिणाबाईंना 'वरमाई' आठवतात. रस्त्याच्या बाजूने दिसणारे उसाचे मळे, रस्त्यावरील बैलगाड्यांच्या बैलांच्या गळ्यातील घुंगरांच्या किंवा घंट्यांच्या माळांचा नाद, त्याबरोबर धुरकऱ्याने बैलांना घातलेली साद, गाड्यांमध्ये भरलेली धान्यांची पोती, त्यातून गळणारे धान्य म्हणजे पाखरांची मेजवानी, वाटेने जाणारी भिल्लीण बायजा ही सर्व माहिती या कवितेत दिली आहे.

जर चालताना दगडाची ठेच लागली, तर दगडालाही वाचा फुटेल आणि तो प्रेमाने म्हणेल,

'नीट जाय मायबाई
नको करू धडपड
तुझ्याच मी माहेरच्या
वाटंवरला दगड!'

('माहेराची वाट', 'बहिणाईची गाणी', पृ. ८)

## ५. कशाले काय म्हनू नही

बिना कपाशीनं उले
त्याले बोंड म्हनू नही
हरी नामाईना बोले
त्याले तोंड म्हनू नही

नही वाऱ्याने हाललं
त्याले पान म्हनू नही
नही ऐके हरीनाम
त्याले कान म्हनू नही

पाटा येहेरीवाचून
त्याले मया म्हनू नही
नही देवाचं दर्सन
त्याले डोया म्हनू नही

निजवते भुक्यापोटी
तिले रात म्हनू नही
आखडला दानासाठी
त्याले हात म्हनू नही

ज्याच्यामधी नही पानी
त्याला हाय म्हनू नही
धावा ऐकून आडला
त्याले पाय म्हनू नही

येहेरीतून ये रीती
तिले मोट म्हनू नही
केली सोताची भरती
त्याले पोट म्हनू नही

नाही वळखला कान्हा
तिले गाय म्हणू नही
जिले नही फुटे पान्हा
तिले माय म्हनू नही

अरे, वाटच्या दोरीले
कधी साप म्हनू नही

इके पोटच्या पोरीले
त्याले बाप म्हनू नही
दुधावर आली बुरी
तिले साय म्हनू नही
जिची माया गेली सरी
तिले माय म्हनू नही
इमानाले इसरला
त्याले नेक म्हनू नही
जल्मदात्याले भोवला
त्याले लेक म्हनू नही
ज्याच्यामधी नही भाव
त्याले भक्ती म्हनू नही
ज्याच्यामधी नही चेव
त्याले शक्ती म्हनू नही

'कशाले काय म्हनू नही' ही एक संस्कारक्षम कविता. नकारात्मक भाव दूर सारून सकारात्मक बाजू मनावर ठसविणारी जीवनदृष्टी देणारी कविता.

ज्यातून कापूस उमलत नाही त्या कपाशीच्या बोंडाला काही अर्थ नसतो. माणसाचे तोंड जर हरिनाम घेत नसेल तर काय कामाचे? वाऱ्याने हलत नाही ते पान नाही, हरिनाम ऐकत नाही ते कान नाहीत. विहिरीवरचे पाट वाहत नसतील तर मळा फुलणार नाही आणि जे देवदर्शन घेत नाहीत, ते डोळे नाहीत. दानासाठी आखडतो तो हात नाही. मदतीची हाक ऐकून धावत नाही ते पाय नाहीत. श्रीकृष्णाच्या बासरीचा आवाज ऐकून जी धाव घेत नाही म्हणजेच कान्ह्याला ओळखत नाही, ती गाय नाही. मुलाला पाहून पान्हा फुटत नाही, ती माय नाही.

उपदेशाबरोबरच समाजस्थितीचे दर्शन बहिणाबाई घडवतात. बहिणाबाईंच्या अशा कवितांच्या अध्ययनाची आणि त्यातून प्रसविलेल्या विचारांची आज जगाला नितांत आवश्यकता आहे.

## ६. संसार

अरे संसार संसार
जसा तवा चुल्ह्यावर
आधी हाताला चटके
तवा मियते भाकर!

अरे संसार संसार
खोटा कधी म्हनू नही
राऊळाच्या कयसाले
लोटा कधी म्हनू नही

अरे संसार संसार
नही रडनं कुढनं
येड्या, गयातला हार
म्हनू नका रे लोढनं!

अरे संसार संसार
खीरा येलावऱ्हे तोड
एका तोंडामधी कडू
बकी सर्वा लागे गोड

अरे संसार संसार
म्हनू नको रे भीलावा
त्याले गोड भीमफुलं
मधी गोडंब्याचा ठेवा

देखा संसार संसार
शेंग वरतून काटे
अरे, वरतून काटे
मधी चिक्ने सागरगोटे!

ऐका संसार संसार
दोन्ही जीवांचा इचार
देतो दुःखाले होकार
अन् सुखाले नकार

देखा संसार संसार
दोन्ही जीवाचा सुधार

कधी नगद उधार
सुखदुःखाचा बेपार!
अरे संसार संसार
असा मोठा जादूगार
माझ्या जीवाचा मंतर
त्याच्यावरती मदार
अरे संसार संसार
आधी देवाचा ईसार
माझ्या दैवाचा जोजार
मग जीवाचा आधार!

सुखाला नकार आणि दुःखाला होकार देणारा हा संसार बहिणाबाईंनी वर्णन केला आहे. मंदिराचा कळस लोट्याच्या साच्यात घालून घडवतात म्हणून त्याला लोटा म्हणू नये. ओढाळ ढोरं पळून जाऊ नये म्हणून त्यांच्या गळ्यात लोढणे बांधतात; पण वरवधू एकमेकांना वरताना हार घालतात, याची जाणीव असली म्हणजे ते लोढणे वाटत नाही. खिरा-काकडी कापताना तोंडावरचा थोडा भाग कापून तो काकडीवर फिरवला म्हणजे कडूपणा निघून जातो, काकडी गोड लागते तसा संसार सुरुवातीला क्लेषदायक वाटला तरी नंतर तो गोड वाटू लागतो. सागरगोट्यांच्या वेलींना वरून काटेरी फुले आणि आत मात्र चिकने सागरगोटे असतात तसा हा संसार.

हा संसार दोन जीवांचा विचार असतो. एकमेकांसाठी दुःखाला होकार दिला आणि वैयक्तिक सुखाला नकार दिला तर संसार सुखमय होतो.

'देखा संसार संसार
दोन्ही जीवांचा सुधार
कधी नगद उधार
सुख दुःखाचा बेपार!'

('संसार', 'बहिणाईची गाणी', पृ. १२)

असे हे संसारी जीवन. त्यात सुखदुःखांचा नगद-उधारीचा व्यापार सुरू असतो. जीवनातील अडीअडचणींना न घाबरता दुःखाला सामोरे जाऊन सुखाचा शोध घेतला पाहिजे, कटुत्व दूर करून गोडवा चाखण्याचा प्रयत्न केला पाहिजे, हा मंत्र त्यांनी दिला आहे.

## ७. माझ्या जीवा

जीव देवानं धाडला
जल्म म्हने 'आला आला'
जव्हा आलं बोलावनं
मौत म्हने 'गेला गेला'

दीस आला कामामधी
रात नीजमधी गेली
मरनाची नीज आता
जलमाची जाग आली

नही सरलं सरलं
जीवा तुझं येनं जानं
जसा घडला मुक्काम
त्याले म्हनती रे जीनं

आला सास, गेला सास
जीवा तुझं रे तंतर
अरे जगनं-मरनं
एका सासाचं अंतर!

येरे येरे माझ्या जीवा
काम पडलं अमाप
काम करता करता
देख देवाजीचं रूप

ऐक ऐक माझ्या जीवा
पीडायेलाचं कन्हनं
देरे गांजल्याले हात
त्याचं ऐक रे म्हननं

अरे निमानतोंड्याच्या
वढ पाठीवऱ्हे धांडा
नाच नाच माझ्या जीवा
संसाराचा झालझेंडा

हास, हास माझ्या जीवा
असा संसारात हास

इडा पीडा संकटाच्या
तोंडावऱ्हे काय फास
जग जग माझ्या जीवा
असं जगनं तोलाचं
उच्च गगनासारखं
धरत्रीच्या रे मोलाचं

ह्या कवितेत त्या स्वतःशीच संवाद साधतात. ईश्वराच्या इच्छेनेच सर्वकाही सुरू असते, असे त्यांना वाटते. जन्ममरणाचे चक्र सतत फिरत असते. जगण्यात आणि मरण्यात किती अंतर असते? शेवटचा श्वास सोडला की खेळ संपतो. जगण्यात आणि मरण्यात केवळ एका श्वासाचे अंतर असते, असे बहिणाबाई सांगतात. रंजल्यागांजल्यांना मदत करणे, कष्ट करतानाही परमेश्वराचे स्मरण करणे आणि संसारात इडा-पीडा-संकटांच्या काळातही हसतमुखाने सामोरे जाणे कसे आवश्यक आहे, हे त्या पटवून देतात.

## ८. घरोट

देवा, घरोट घरोट
तुझ्या मनातली गोट
सर्व्या दुनियेचं पोट
घरी कर्माचा मरोट
अरे घरोट घरोट
वानी बाम्हनांचं 'जात'
कसा घरघर वाजे
त्याले म्हनवा घरोट
अरे जोडता तोडलं
त्याले नातं म्हनू नही
ज्याच्यातून येतं पीठ
त्याले जातं म्हनू नही
कसा घरोट घरोट
माझा वाजे घरघर
घरघरीतून त्याच्या
माले ऐकू येतो सूर

त्यात आहे घरघर
येड्या, आपल्या घराची
त्यात आहे घरघर
त्यात भर्ल्या आभायाची!

आता घरोटा घरोटा
दयन मांडलं नीट
अरे, घंट्या-भरामधी
कर त्याचं आता पीठ

चाल घरोटा घरोटा
तुझी चाले घरघर
तुझ्या घरघरीतून
पीठ गये भरभर

जशी तुझी रे घरोटा
पाऊ फिरे गरगर
तसं दुधावानी पीठ
पडतं रे भुईवर

अरे घरोटा घरोटा
घास माझा जवारीचा
तुले सनासुदी गहू
कधी देते बाजरीचा

माझा घरोट घरोट
दोन दाढा दोन व्होट
दाने खाये मूठ मूठ
त्याच्यातून गये पीठ

अरे घरोटा घरोटा
माझे दुखता रे हात
तसं संसाराचं गानं
माझं बसते मी गात

अरे घरोटा घरोटा
तुझ्यातून पडे पिठी
तसं तसं माझं गानं

पोटातून येते होटी
दाने दयता दयता
जशी घामानं मी भिजे
तुझी घरोटा घरोटा
तशी पाऊ तुझी झिजे
झिजिसनी झिजिसनी
झाला संगमरवरी
अरे, तुला टाकलाये
टकारीन आली दारी!

बहिणाबाईंचे घरोट्याशी नाते अगदी जवळचे. अगदी समाधी अवस्थेप्रमाणे या जात्याची लयबद्ध घरघर ऐकताना अंतर्मुख होऊन त्या या घरोट्याशी संसाराशी आणि देवाशी केव्हा हितगुज करू लागतात ते कळतही नाही.

ज्याच्यातून पीठ येते, त्याला जाते का म्हणावे? असा प्रश्न त्या करतात. या जात्याला दोन दाढा, दोन ओठ आहेत. मुठमुठ दाणे खाऊन त्याच्या ओठातून पीठ बाहेर पडते. मात्र त्याला ज्वारीचाच घास मिळतो. सणासुदीला गव्हाचा घास, काही वेळा बाजरीचा घास.

पहाटे पहाटे घरागणिक जात्याची घर घर सुरू व्हायची. गावातल्या स्त्रिया दळू लागायच्या. त्याबरोबरच त्यांच्या मुखातून ओव्याही बाहेर पडायच्या. दळणाचे कष्ट जाणवू नयेत म्हणून त्या ओव्यांचे गायन. बहिणाबाईंच्या ओव्यांमध्ये तर विचारांची पेरणीच होती, असे म्हणायला हरकत नाही.

## ९. मन

मन वढाय वढाय
उभ्या पिकातलं ढोर
किती हाकला हाकला
फिरी येतं पिकावर
मन मोकाट मोकाट
त्याले ठायी ठायी वाटा

जशा वाऱ्यानं चालल्या
पान्यावऱ्हल्यारे लाटा
मन लहरी लहरी
त्याले हाती धरे कोन?
उंडारलं उंडारलं
जसं वारा वाहादन
मन जह्यरी जह्यरी
याचं न्यारं रे तंतर
अरे, इचू, साप बरा
त्याले उतारे मंतर!
मन पाखरू पाखरू
त्याची काय सांगू मात?
टाता व्हतं भुईवर
गेलं गेलं आभायात
मन चप्पय चप्पय
त्याले नही जरा धीर
तठे व्हयीसनी ईज
आलं आलं धर्तीवर
मन एवढं एवढं
जसा खाकसचा दाना
मन केवढं केवढं?
आभायात बी मायेना
देवा, कसं देलं मन
आसं नही दुनियात
आसा कसा रे तू योगी
काय तुझी करामत!
देवा आसं कसं मन?
आसं कसं रे घडलं
कुठे जागेपनी तुले
असं सपन पडलं!

मानवी मनाचे पैलू बहिणाबाई सादर करतात. उभ्या पिकाकडे सतत धाव घेणाऱ्या, हाकलूनही परत येणाऱ्या वढाय (ओढाळ) ढोराप्रमाणे मन असते. त्याला एखाद्या गोष्टीची ओढ लागली की त्यापासून परावृत्त करणे कठीणच! हे मोकाट मन कुठेही धावते. जशा पाण्यावरच्या लाटा पळत असतात, तसे हे मनही पळते. ते लहरी असते.

विंचवाचं, सापाचं विष मंत्राद्वारे उतरवता येतं; पण मनाच्या जहरीपणावर कोणताही मंत्र चालत नाही. एखाद्याविषयी कलुषित झालेले मन सहजासहजी निर्मळ होत नाही.

मनाची संकुचित आणि उदात्त प्रवृत्तीही बहिणाबाई वर्णन करतात. पाखराप्रमाणे आकाशात भरारी मारणारे हे मन वीजेप्रमाणे चपळ असते. असे हे मन या परमेश्वराने घडवले तरी कसे? असा प्रश्न त्यांना पडतो.

## १०. हिरीताचं देनंघेनं

नको लागू जीवा, सदा मतलबापाठी
हिरीताचं देनं घेनं, नही पोटासाठी
उभे शेतामधी पिकं
ऊन वारा खात खात
तरसती 'कव्हा जाऊ
देवा, भुकेल्या पोटात'
पेटवा रे चुल्हा आता, मांडा ताटवाटी
नको लागू जीवा, सदा मतलबापाठी
पाहीसनी रे लोकाचे
यवहार खोटेनाटे
तव्हा बोरी बाभयीच्या
आले आंगावर काटे
राखोयीच्यासाठी झाल्या शेताले कपाटी
नको लागू जीवा, सदा मतलबापाठी
किती भरला कनगा
भरल्यानं होतो रिता
हिरीताचं देनंघेनं
नही डाडोराकरता

गेली देही निंधीसनी, नाव रे शेवटी
नको लागू जीवा, सदा मतलबापाठी

मनाचे आणि हृदयाचे स्वरूप बहिणाबाईंनी उलगडून दाखवले आहे, ते 'हिरीताचं देनं घेनं' ह्या कवितेत. माणसाने सतत स्वार्थी विचार करू नये. शेतातल्या पिकाचे उदाहरण त्या देतात. ऊन, वारा सहन करीत शेतात उभे पीक कोणाच्या तरी पोटात जाऊन त्याची भूक शमविण्यासाठी तरसत असते. त्याचप्रमाणे माणसानेही स्वार्थ सोडावा, असे बहिणाबाईंना वाटते; पण माणूस स्वार्थाचे खोटेनाटे व्यवहार सोडत नाही, बोरीबाभळीच्या अंगावर आलेले काटे हे माणसांचे खोटेनाटे व्यवहार किंवा त्यांची भयानक कृत्ये पाहून आलेले आहेत. याच काट्यांचा उपयोग शेताभोवती कुंपण म्हणून होतो. काटेही परोपकारी होतात; पण माणूस स्वार्थ सोडत नाही.

शेवटी हा नश्वर देह जगातून निघून जातो. माणसाने चांगली कामे केली असतील तर मृत्यूनंतरही त्याला कोणी विसरणार नाही; म्हणून माणसाने परोपकारासाठी जगले पाहिजे, स्वार्थासाठी नाही, असे त्या म्हणतात.

## ११. लपे करमाची रेखा

लपे करमाची रेखा
माझ्या कुंकवाच्या खाली
पुशीसनी गेलं कुकू
रेखा उघडी पडली

देवा, तुझ्याबी घरचा
झरा धनाचा आटला
धन-रेखाच्या चऱ्यानं
तयहात रे फाटला

बापा, नको मारू थापा
असो खऱ्या असो खोट्या
नही नशीब नशीब
तयहाताच्या रेघोट्या!

अरे, नशीब नशीब
लागे चक्कर पायाले

नशिबाचे नऊ गिऱ्हे
ते भी फिरत राह्यले!

राहो दोन लाल सुखी
हेच देवाले मांगनं
त्यात आलं रे नशीब
काय सांगे पंचागन?

नको नको रे ज्योतिषा
नको हात माझा पाहू
माझं दैव माले कये
माझ्या दारी नको येऊ!

ऐन तारुण्यात पतीचे निधन झाल्यावर बहिणाबाईंना 'लपे करमाची रेखा' ही कविता सुचली असावी. वैधव्याची आपत्ती कोसळल्यावर धनाचा झराही आटला. कष्टांना सीमा राहिली नाही. त्याचे वर्णन करताना त्या म्हणतात,

'देवा, तुझ्याबी घरचा
झरा धनाचा आटला
धन-रेखाच्या चऱ्यानं
तयहात रे फाटला'

('लपे करमाची रेखा', 'बहिणाईची गाणी', पृ. २१)

ग्रामीण भागात घराघरात जाऊन भविष्य सांगणारे ज्योतिषी असतात. बहिणाबाई ज्योतिष्याला स्पष्ट सांगतात,

'नको नको रे ज्योतिषा
नको हात माझा पाहू
माझं दैव माले कये
माझ्या दारी नको येऊ!'

('लपे करमाची रेखा', 'बहिणाईची गाणी', पृ. २१)

इथे बहिणाबाईंची कणखर वृत्ती जाणवते. खोट्या आशेच्या आहारी न जाता कष्टावर, वास्तवावर त्यांचा विश्वास आहे. आपले नशीब जाणण्यासाठी त्यांना ज्योतिष्याची गरज वाटत नाही.

## १२. आता माझा माले जीव

अरे रडता रडता
डोये भरले भरले
आसू सरले सरले
आता हुंदके उरले!

आसू सरले सरले
माला मलेच इसावा
आस आसवा बिगर
रडू नको माझ्या जीवा!

सांग सांग धर्ती माता
अशी कशी जादू झाली
झाड गेलं निंधीसनी
मांघे सावली उरली

देव गेले देवाघरी
आठी ठेयीसनी ठेवा
डोयापुढे दोन लाल
रडू नको माझ्या जीवा!

रडू नको माझ्या जीवा
तुले रडण्याची रे सव
रडू हासव रे जरा
त्यात संसाराची चव

कुंकू पुसलं पुसलं
आता उरलं गोंधन
तेच देईन देईन
नशिबाले आवतन

जरी फुटल्या बांगड्या
मनगटी करतूत
तुटे मंगयसूतर
उरे गयाची शपत

नका नका आयाबाया
नका करू माझी कीव

झालं माझं समाधान
आता माझा माले जीव

पतीच्या निधनानंतर बहिणाबाईंना जे दुःख झालं त्याचं वर्णन 'आता माझा माले जीव' या कवितेत येते.

'सांग सांग धर्ती माता
अशी कशी जादू झाली
झाड गेलं निंधीसनी
मांघे सावली उरली'

('आता माझा माले जीव', 'बहिणाईची गाणी', पृ. २२)

धरतीमातेला बहिणाबाई विचारतात, की अशीकशी ही जादू झाली? पती म्हणजे झाड, पत्नी म्हणजे त्याची छाया. झाडावाचून सावलीला अस्तित्वच नाही. आपल्या जीवनात आता आधार उरला नाही; पण या दुःखातही स्वतःचे सांत्वन स्वतःच करताना आपल्या मुलांसाठी आपण जगले पाहिजे, याची जाणीव त्यांना होते.

'देव गेले देवाघरी
आठी ठेयीसनी ठेवा
डोयापुढे दोन लाल
रडू नको माझ्या जीवा!

रडू नको माझ्या जीवा
तुले रडण्याची रे सव
रडू हासव रे जरा
त्यात संसाराची चव'

('आता माझा माले जीव', 'बहिणाईची गाणी', पृ. २२)

दुःखात गुरफटून राहणारा, दुःखाचे रडगाणे गात राहणारा माणसाचा स्वभाव. पण हे रडणे हसण्यात बदलले तर संसारात गोडी निर्माण होते.

बहिणाबाईंचा आत्मविश्वास दांडगा आहे. जीवनसाथी निघून गेला असला तरी मनगटात जोर असल्याचे, म्हणजे मुलांसाठी कष्ट करून जगण्याची हिंमत असल्याचे त्या सांगतात आणि सांत्वन करणाऱ्या आयाबायांना आपली कीव न करण्याविषयी स्पष्ट सांगतात.

## १३. वाटच्या वाटसरा

वाटच्या वाटसरा, वाट बिकट मोठी
नशिबी दगड गोटे
काट्याकुट्याचा धनी
पायाला लागे ठेचा
आलं डोयात पानी

वरून तापे ऊन
आंग झालं रे लाही
चालला आढवानी
फोड आले रे पायी

जानंच पडीन रे
तुले लोकाच्यासाठी
वाटच्या वाटसरा, वाट बिकट मोठी

दिवस ढयला रे
पाय उचल झट
असो नसो रे तठी
तुझ्या लाभाची गोट

उतार चढनीच्या
दोन्ही सुखादुखात
रमव तुझा जीव
धीर धर मनात

उघडू नको आता
तुझ्या झाकल्या मुठी
वाटच्या वाटसरा, वाट बिकट मोठी

'माझेच भाऊबंद
घाईसनी येतीन!'
नको धरू रे आशा
धर एव्हढं ध्यान

तुझ्या पायाने जानं
तुझा तुलेच जीव
लावनी पार आता

तुझी तुलेच नाव
मतलबाचे धनी
सर्वी माया रे खोटी
वाटच्या वाटसरा, वाट बिकट मोठी
वाऱ्याचं वाहादन
आलं आलं रे मोठं
त्याच्यात झुकीसनी
चुकू नको रे वाट
दोन्ही बाजूनं दऱ्या
धर झुडूप हाती
सोडू नको रे धीर
येवो संकट किती
येऊ दे परचीती
काय तुझ्या ललाटी
वाटच्या वाटसरा, वाट बिकट मोठी

बहिणाबाईंना जीवन म्हणजे एक न संपणारी बिकट वाट आहे, असे वाटते आणि मनुष्य म्हणजे त्या वाटेवरून चालणारा वाटसरू. या वाटेवरच्या प्रवासात मनुष्याला विविध चांगले-वाईट अनुभव येतात. कधी काट्याकुट्यांचे धनी व्हावे लागते तर कधी पायाला ठेच लागते. उन्हातान्हात चालणाऱ्या माणसाच्या नशिबात दुःख जास्त आणि सुख कमी आहे. तरीही बहिणाबाई मनुष्याला आशेने चालत राहायला सांगतात. सुखदुःखातही धीर धरायला सांगतात. झाकल्या मुठीमध्ये त्याचे सामर्थ्य आहे, याची जाणीव करून देतात. कितीही संकटे आली तरी मनुष्य ही बिकट वाट पार करून जाण्यासाठी बहिणाबाई त्याला मार्गदर्शन करतात.

## १४. शेतीची साधने

सरत सरत
करे पेरत पेरत
मोघडा मोघडा
पेरनीचा चवघडा

पांभर पांभर
मांघे धारये झांबर
कोयप कोयप
निंदाईले सोप सोप
आऊत आऊत
आला कमाईले ऊत
तिफन तिफन
व्हये शेताचं मापन
चाहूर चाहूर
आता सरलं काहूर
वखर वखर
घाले मायेची पाखर
नाागर नागर
साऱ्या सुखाचं आगर

'शेतीची साधने' या कवितेत विविध अवजारांची माहिती व महत्त्व बहिणाबाई वर्णन करतात. कोयप, वखर, नांगर, तिफन, चाहूर, सरत, मोघडा, पाभर ही सारी अवजारे त्यांच्या कवितेत आढळतात. पेरणी सरत्याने करायची. पाभराने बियाण्यांवर माती पसरायची. कोयप्याने (कोयता, विळा) कोळपणी तर वखराने वखरायचे अशी प्रत्येक अवजारांची उपयुक्तता त्या वर्णन करतात. 'तिफन तिफन, व्हय शेताचं मापन' ('शेतीची साधने', 'बहिणाईची गाणी', पृ. २६) असे एक कडवे या कवितेत आहे. यावरून शेताचे मोजमाप तिफणमध्ये केले जाते, हे लक्षात येते.

## १५. आला पाऊस

आला पह्यला पाऊस
शिपडली भुई सारी
धरत्रीचा परमय
माझं मन गेलं भरी
आला पाऊस पाऊस
आता सरीवर सरी
शेत शिवारं भिजले
नदी नाले गेले भरी

आला पाऊस पाऊस
आता धूमधडाख्यानं
घर लागले गयाले
खारी गेली वाहीसन

आला पाऊस पाऊस
ललकारी रे ठोकत
पोरं निंघाले भिजत
दारी चिल्लाया मारत

आला पाऊस पाऊस
गडगडाट करत
धडधड करे छाती
पोरं दडाले घरात

आता उगू दे रे शेतं
आला पाऊस पाऊस
वऱ्हे येऊ दे रे रोपं
आता फिटली हाऊस

येता पाऊस पाऊस
पावसाची लागे झडी
आता खा रे वडे भजे
घरांमधी बुसा दडी

देवा, पाऊस पाऊस
तुझ्या डोयातले आंस
दैवा, तुझा रे हारास
जीवा, तुझी रे मिरास

निसर्गकन्या असलेल्या बहिणाबाईंना पहिल्या पावसातल्या मातीच्या सुगंधाने वेड नाही लागले तर नवलच! म्हणूनच 'आला पाऊस' या कवितेत त्या पहिल्या पावसाचे वर्णन करतात. उन्हाळ्यामुळे तापलेली जमीन पहिल्या पावसाने सडा शिंपडल्यासारखी ओलीचिंब होते. पावसाच्या सरीवर सरी बरसू लागल्या की नदीनाल्यातून पूर वाहू लागतो. घर गळू लागते, तरी लहान मुलांना या पावसात भिजण्यात ललकारी ठोकत धूम पळण्यात मजा येते. ढगांच्या गडगडाटाला घाबरून मात्र ती घरात लपतात. पावसात मोठ्यांचीही वडेभजे खाण्याची मजा

असते. तरी बहिणाबाईंना पाऊस मात्र देवाच्या डोळ्यातील अश्रू आहेत, असे वाटते. शेतकरी जीवनाशी निगडित अशा ज्या बहिणाबाईंच्या गाजलेल्या कविता आहेत, त्यापैकी ही एक.

## १६. पेरणी

पेरनी पेरनी
आले पावसाचे वारे
बोलला पोपया
पेर्ते व्हा रे पेर्ते व्हा रे!

पेरनी पेरनी
आले आभायात ढ
ढगात बाजंदी
ईज करे झगमग

पेरनी पेरनी
आभायात गडगड
बरस बरस
माझ्या उरी धडधड

पेरनी पेरनी
काढा पांभरी मोघडा
झडीन तो झडी
कव्हा बर्साती चौघडा

पेरनी पेरनी
आला धरतीचा वास
वाढे पेरनीची
शेतकऱ्या, तुझी आस

पेरनी पेरनी
आता मिरूग बी सरे
बोलेना पोपया
पेर्ते व्हारे पेर्ते व्हारे!

पेरनी पेरनी
भीज भीज धर्ती माते
बीय बियान्याचे
भरून ठेवले पोते

पेरनी पेरनी
अवघ्या जगाच्या कारनी
ढोराची चारनी
कोटी पोटाची भरनी

पेरनी पेरनी
देवा, तुझी रे करनी
दैवाची हेरनी
माझ्या जीवाची झुरनी

शेतकरी जीवनाशी निगडित या कवितेत पेरणीविषयी माहिती आली आहे. पेरणीमुळे संपूर्ण जगाचा उदरनिर्वाह चालतो म्हणून बहिणाबाईंच्या दृष्टीने पेरणीला विशेष महत्त्व आहे. पावशा पक्षाने 'पेर्ते व्हा, पेर्ते व्हा' म्हटले की शेतकरी पेरणीसाठी तयार होतो; पण कधी कधी मृग नक्षत्र संपले तरी पावसाचा पत्ता नसतो, हे पाहून कवयित्री धरतीमातेला उद्देशून म्हणतात, 'भीज भीज धर्ती माते'. शेतकऱ्याची पेरणीसाठी पूर्ण तयारी होते. अशा वेळेस सगळ्यांचे पोट भरण्यासाठी बहिणाबाई धरणीमातेकडे विनवणी करतात.

## १७. देव अजब गारोडी

धरत्रीच्या कुशीमधी
बीयबियानं निजली
वऱ्हे पसरली माटी
जशी शाल पांघरली

बीय टरारे भुईत
सर्वे कोंब आले वऱ्हे
गह्यरलं शेत जसं
आंगावरती शहारे

ऊन वाऱ्याशी खेयता
एका एका कोंबातून
पर्गटले दोन पानं
जसे हात जोडीसन

टाया वाजवती पानं
दंग देवाच्या भजनी

जसे करती कारोन्या
होऊ दे रे आबादानी
दिसामासा व्हये वाढ
रोप झाली आता मोठी
आला पिकाले बहार
झाली शेतामध्ये दाटी
कसे वाऱ्यानं डोलती
दाने आले गाडी गाडी
दैव गेलं रे उघडी
देव अजब गारोडी!

बी-बियाणं पेरल्यानंतर त्यातून कोंब येणे, त्याची होणारी वाढ, बहरणारी पिके, डुलणारी कणसे आणि गाडी भरून घरात येणारे धान्य ही सगळी परमेश्वरी किमया पाहून हा देव एक अजब गारुडी आहे, असे बहिणाबाईंना वाटते. चिमुकल्या बी पासून गाडीभर धान्याच्या राशी निर्माण होईपर्यंत बहिणाबाईंनी केलेले वर्णन त्यांच्या अफाट कल्पनाशक्तीची साक्ष देतात.

सुरुवातीला प्रत्येक कोंबातून दोन दोन पाने प्रगटतात, जणू ते हात जोडून असतात आणि वाऱ्यामुळे जेव्हा एकमेकांवर आपटतात, तेव्हा जणू टाळ्या वाजवून देवाचे भजन करतात आणि सर्वत्र समृद्धीची प्रार्थना करतात. अशी विलक्षण कल्पनाशक्ती बहिणाबाईंजवळ होती. कर्मयोगाला प्राधान्य देणाऱ्या बहिणाबाईंची परमेश्वरावर किती नितांत श्रद्धा होती, हे या कवितेतून लक्षात येते.

## १८. कापनी

आता लागे मार्गेसर
आली कापनी कापनी
आज करे खालेवऱ्हे
डाव्या डोयाची पापनी!
पडे जमिनीले तढे
आली कापनी कापनी
तशी माझ्या डोयापुढे
उभी दान्याची मापनी

शेत पिवये धम्मक
आली कापनी कापनी
आता धरा रे हिंमत
इये ठेवा पाजवुनी

पिंक पिवये पिवये
आली कापनी कापनी
हातामधी धरा इय्ये
खाली ठेवा रे गोफनी

काप काप माझ्या इय्या
आली कापनी कापनी
थाप लागली पिकाची
आली डोयाले झापनी!

आली पुढे रगडनी
आली कापनी कापनी
खये करा रे तय्यार
हाती घीसन चोपनी

माझी कापनी कापनी
दैवा तुझी रे मापनी
माझ्या दैवाची करनी
माझ्या जीवाची भरनी

शेत पिवळे झाले की कापणीचा हंगाम सुरू झाल्याची सूचना मिळते. अशा वेळी बहिणाबाई शेतकऱ्यांना विळ्यांना धार लावायला, गोफणी ठेवून द्यायला सांगतात. कापणीनंतर रगडणी येत असल्याने खळे तयार करायला सांगतात. शेतातल्या या धनधान्याचे श्रेय बहिणाबाई देवाला देतात.

## १९. रगडनी

केला पिकाचा रे साठा
जपीसन सर्व्याआधी
शेताशिवाराचं धन
आता आलं खयामधी

खय झालं रे तैयार
सम्दी भुई सारवली
मधी उभारलं मेढं
पात बैलाची चालली

आता चाल चाल बैला,
आता चाल भिरभिरा
व्हऊ दे रे कनुसाचा
तुझ्या खुराखाले चुरा

पाय उचल रे बैला,
कर बापा आता घाई
चालू दे रे रगडनं
तुझ्या पायाची पुन्याई

पाय उचल रे बैला,
कनुसाचा कर भुसा
दाने एका एकातून
पडतील पसा पसा

आता चाल चाल बैला,
पुढे आली उपननी
वारा चालला रे वाया,
कसा ठेवू मी धरूनी

आता सोडी देल्ही पात
बैलं गेले चाऱ्यावरी
डोयापुढे उपननी
जीव माझा वाऱ्यावरी

रगडनी रगडनी
देवा, तुझी रे घडनी
दैवा तुझी झगडनी
माझी डोये उघडनी!

रगडनी (रगडणी) म्हणजेच मळणी. यात शेतातील धान्य खळ्याची जागा उत्तम सारवून त्यात गोळा करण्यात येते. त्यात मध्ये एक मेढं

गाडण्यात येते. त्याभोवती बैलांची पात जुंपली जाते. बैल त्या मेढ्याभोवती गोलगोल फिरतो. बैलांच्या पायातील खुरांनी धान्य आणि भुसा वेगवेगळे होतात. अशा प्रकारे रगडणीसाठी बैलांची फार मदत होते. म्हणून बहिणाबाई बैलांविषयी कृतज्ञता प्रकट करताना 'तुझ्या पायाची पुन्याई' असे म्हणतात. रगडणी झाली की बैलांना चारा खायला सोडले जाते आणि शेतकरी वारा वाया जाऊ न देता उपननीची तयारी करतात.

## २०. उपननी

उपननी उपननी
आता घ्यारे पाट्या हाती
राहा आता उपन्याले
उभे तिव्हाऱ्यावरती

चल ये रे ये रे वाऱ्या
ये रे मारोतीच्या बापा
नको देऊ रे गुंगारा
पुऱ्या झाल्या तुझ्या थापा!

नही अझून चाहूल
नका पाडू रे घोरात
आज निंघाली कोनाची
वाऱ्यावरती वरात?

ये रे वाऱ्या घोंगावत
ये रे खयाकडे आधी
आज कुठे रे शिरला
वासराच्या कानामध्यी!

भिनभिन आला वारा
कोन कोनाशी बोलली?
मन माझं हारखलं
पानं झाडाची हालली!

वारा आलारे झन्नाट्या
झाडं झुडपं डोलली
धरा मदनाच्या पाट्या
खाले पोखरी चालली

देवा, माझी उपननी
तुझ्या पायी इनवनी
दैवा, तुझी सोपवनी
माझ्या जीवाची कारोनी

उपननी म्हणजे धान्यातील भुसा वाऱ्याने उडवणे. उपननीच्या वेळी पाट्या हाती घेऊन भुसा भरले धान्य टोपल्यात भरून ते तिव्यावर उभे असलेल्या माणसाच्या हाती उडवण्यासाठी देण्यात येते. या कामात खरे तर जोरदार वाऱ्याची आवश्यकता असते; पण कधी कधी वारा येत नाही. म्हणून बहिणाबाई वाऱ्याला वेगवेगळ्या नावांनी हाका मारतात. त्याची विनवणी करतात. वाऱ्यावरची वरात किंवा वासराच्या कानामध्ये शिरणारा वारा या वाक्प्रचारांचा उपयोग करून वाऱ्याची गंमतही करतात. शेवटी झाडंझुडपं डोलवत वारा येतो आणि देवानेच आपली विनवणी मान्य करून वाऱ्याला पाठवलं, असे बहिणाबाई म्हणतात.

## २१. मोट हाकलतो एक

येहेरीत दोन मोटा
दोन्हीमधी पानी एक
आडोयले कना, चाक
दान्हीमधी गती एक
दोन्ही नाडा - समदूर
दोन्हीमधी झीज एक
दोन्ही बैलाचं ओढणं
दोन्हीमधी ओढ एक
उतरनी - चढनीचे
नाव दोन धाव एक
मोट हाकलतो एक
जीव पोसतो कितीक?

शेतीला पाणी देण्यासाठी विहिरीतील मोट महत्त्वाची असते. मोट ओढताना बैल उतरणीवरून उतरतात, चढतात. या मार्गाला धाव म्हटले जाते.

येथे बहिणाबाईच्या अनेकत्वाकडून एकत्वाकडे होणाऱ्या प्रवासाकडे आपले लक्ष वेधले जाते. मोट हाकलणारा एकच असला तरी त्याच्या कष्टांमुळे अनेकांच्या पोटापाण्याचा प्रश्न सुटतो.

## २२. खोप्यामधी खोपा

अरे खोप्यामधी खोपा
सुगरनीचा चांगला
देखा पिलासाठी तिनं
झोका झाडाले टांगला

पिलं निजली खोप्यात
जसा झुलता बंगला
तिचा पिलामधी जीव
जीव झाडाले टांगला!

सुगरीन सुगरीन
अशी माझी रे चतुर
तिले जल्माचा संगाती
मिये गन्यागंप्या नर

खोपा इनला इनला
जसा गिलक्याचा कोसा
पाखराची कारागिरी
जरा देख रे मानसा!

तिची उलूशीच चोच
तेच दात, तेच ओठ
तुले देले रे देवानं
दोन हात दहा बोटं

सुगरण आपल्या पिलांसाठी खोपा करते. तिच्या नराला खोपा विणता येत नाही. तो गवताच्या काड्या आणून देतो. या खोप्यात सुगरणीची पिले निजतात. पिलांवर पक्षिणीची माया असते. खोप्यातील पिलांमध्ये सुगरणीचा जीव टांगला असतो. हा छोटासा पक्षी छोट्याशा चोचीने इतका सुंदर खोपा तयार करू शकतो, तर दोन हात, दहा बोटे असलेल्या माणसाचे सामर्थ्य

सुगरणीपेक्षा अधिकच असायला हवे ना? माणसाच्या कर्तृत्वाला जागृत करणारी ‘खोप्यामधी खोपा’ कविता आहे.

## २३. गाडी जोडी

माझ्या लाल बैलायची जोडी रे
कशी गडगड चाले गाडी
एक रंगी एकज शिंगी
एकज चनका यांचे अंगी
दिसे डौलदार ते खांदे रे
तसे सरीलाचे बांधे
माझ्या बैलायची चालनी रे
जशी चप्पय हरनावानी
माझ्या बैलायची ताकद रे
साखयदंडाले माहित
दमदार बैलाची जोडी रे
तिले साजे गुंढ्यगाडी
कशी गडगड चाले गाडी रे
माझी लाल बैलायची जोडी
कसे टन् टन् करती चाकं रे
त्याले पोलादाचा आंख
सोभे वरती रंगीत खादी रे
मधी मसूऱ्याची गादी
वऱ्हे रेसमाचे गोंडे रे
तिचे तिवसाचे दांडे
बैल हुर्पाटले दोन्ही रे
चाकं फिरती भिंगरीवानी
मारे ललकारी धुर्करी ना -
लागे पुऱ्हानं ना आरी
अशी माझी गुंढ्यगाडी रे
तिले लाल बैलायची जोडी

बहिणाबाईंनी ‘गाडी जोडी’ ह्या कवितेत लाल रंगाच्या बैलजोडीचे आणि गाडीचे वर्णन केले आहे. बैलांचा एक रंग, एकशिंगी जोडी, त्यांचे डौलदार खांदे आणि बांधे, हरणासारखी गती हे सर्व वर्णन ह्या कवितेत येते.

## २४. गुढी उभारनी

गुढीपाडव्याचा सन
आता उभारा रे गुढी
नव्या वरसाचं देनं
सोडा मनातली आढी

गेलं साली गेली आढी
आता पाडवा पाडवा
तुम्ही येरांयेरांवरी
लोभ वाढवा वाढवा

अरे, उठा झाडा आंग
गुढीपाडव्याचा सन
आता आंगन झाडुनी
गेली राधा महारीन

कसे पडले घोरत
असे निस्सयेलावानी
हां हां म्हनता गेला रे
रामपहार निंघुनी

आता पोथारा रे घर
सुधारा रे पडझडी
करीसन सारवन
दारी उभारा रे गुढी

चैत्राच्या या उन्हामधी
जीव व्हये कासाईस
रामनाम घ्या रे आता
रामनवमीचा दिस

पडी जातो तो ‘पाडवा’
करा माझी सुधारनी

आता गुढी पाडव्याले
म्हना 'गुढी उभारनी'
काय लोकाचीबी तऱ्हा
कसे भांग घोटा पेल्हे
उभा जमिनीच्या मधी
आड म्हनती उभ्याले
आसं म्हनू नही कधी
जसं उभ्याले आडवा
गुढी उभारतो त्याले
कसं म्हनती पाडवा?

नववर्षाच्या आगमनाच्या सणाचे वर्णन या कवितेत आहे. गुढीपाडव्यापासून सुरू होणाऱ्या नवीन वर्षात सर्वांनी एकमेकांशी प्रेमाने वागावे, गेल्या वर्षीचा राग, आळस झाडून टाकावा. गुढी उभारावी. आळस झटकून नव्या दिवशी, नव्या उत्साहाने कामाला लागा, हा संदेश त्या देतात.

गुढी पाडव्याला गुढी उभारली जाते, पाडली जात नाही, मग आपण 'गुढी पाडवा' का म्हणायचे? 'गुढी उभारणी' म्हटले पाहिजे, असे त्या म्हणतात.

## २५. आखजी

आखजीचा आखजीचा
मोलाचा सन देखा जी
निंबावर निंबावर
बांधला छान झोका जी
माझा झोका माझा झोका
चालला भिरभिरी जी
माझा झोका माझा झोका
खेयतो वाऱ्यावरी जी
गेला झोका गेला झोका
चालला माहेराले जी
आला झोका आला झोका
पलट सासराले जी

माझा झोका माझा झोका
जीवाची भूक सरे जी
भूक सरे भूक सरे
वाऱ्यानं पोट भरे जी

आला वारा आला वारा
वाऱ्यानं जीव झुले जी
जीव झुले जीव झुले
झाडाची डांग हाले जी

डांग हाले डांग हाले
नजर नही ठरे जी
झाली आता झाली आता
धरती खालेवऱ्हे जी

आंगनात आंगनात
खेयती पोरीसोरी जी
झाल्या दंग झाल्या दंग
गाऊनी नानापरी जी

झाला सुरू झाला सुरू
पहिला माझा पिंगा जी
फुगड्यांचा फुगड्यांचा
चालला धांगडधिंगा जी

दारोदारी दारोदारी
खेयाची एक घाई जी
घरोघरी घरोघरी
मांडल्या गवराई जी

गवराई गवराई
सजव सजवल्या जी
संगातिनी संगातिनी
बोलव बोलवल्या जी

बोलवल्या बोलवल्या
टिपऱ्या झाल्या सुरू जी
टिपऱ्याचे टिपऱ्याचे

नादवले घुंगरू जी
किती खेय किती खेय
सांगू मी काय काय जी
खेयीसनी खेयीसनी
आंबले हातपायजी
चार दिस चार दिस
इसावल्या घरात जी
आहे पुढे आहे पुढे -
शेतीची मशागत जी
सन सरे आस उरे
आखजी गेली व्हयी जी
सांग सई सांग सई,
आखजी आता कही जी?

'आखजी' ह्या सणाला मुलींना माहेरी जाण्याची संधी मिळते. लिंबाच्या झाडाला दोर बांधून झोपाळे तयार केले जातात. माहेरवाशिणी एकत्र येतात. कामातून तात्पुरती सुटका झाल्याचा आनंद मनवतात. गौराई मांडून सजवतात. झोके, फुगडी, झिम्मा, पिंगा असे खेळ खेळतात.

माहेरात चार दिवस विसाव्याचे; पण या माहेरवाशिणी खेळत राहतात. पुढे मृग नक्षत्र लागले की पेरण्या सुरू होतात. म्हणून शेतीची मशागत करून ठेवावी लागते. शेतीचं काम 'उद्या करू' म्हणून चालत नाही. आता ही आखजी पुन्हा कधी येणार असा गहिवरल्या अंतःकरणाने निरोप घेणाऱ्या या सख्या बहिणाबाईंनी भावपूर्ण वर्णिल्या आहेत.

## २६. सासुरवाशीन

ऊठ सासुरवाशीन बाई
ऊठ मघ्घम राती मांड दयन तू नीट
अन् चालव बाई घरोट
ऊठ सासुरवाशीन बाई
ऊठ राम पहारी डोईवर घे घडा
ऊठ बांग फुके कोंबडा

ऊठ सासुरवाशीन बाई
ऊठ सयपाकाले पेटव पेटव चुल्हा
वर सूर्य बापा आला

ऊठ सासुरवाशीन बाई
ऊठ जानं, शेतीकामाचा किती घोर
तू गोठ्यामधलं ढोर

ऊठ सासुरवाशीन बाई
सुरू झाली वटवट कातवली वो सासू
पुस डोयांमधले आसू

ऊठ सासुरवाशीन बाई
घे सोशीसन घे घालू नको वो वाद
कर माहेराची याद

'सासुरवाशीण' ही कविता तत्कालीन सामाजिक स्थितीवर प्रकाश टाकते. मध्यरात्रीच कामाला सुरुवात करावी लागे. जात्यातून दळण दळणे, कोंबडे आरवताच पाणी आणण्यास जाणे, मग स्वयंपाक करणे, शेतीकामावर जाणे. बहिणाबाई येथे या सासुरवाशिणीला म्हणतात--

'ऊठ सासुरवाशीन बाई
ऊठ जानं, शेतीकामाचा किती घोर
तू गोठ्यामधलं ढोर'

('सासुरवाशीन', 'बहिणाईची गाणी', पृ. ४३)

असे ढोराप्रमाणे या सासुरवाशिणीला राबावे लागते. आणि वरून सासू कातावलेली. तिची वटवट सुरूच; पण बहिणाबाई या सासुरवाशिणीला 'पूस डोयामधले आसू' असे सांगून त्या 'घे सोशीसन घे, घालू नको वो वाद, कर माहेराची याद' अशी माहेरच्या सुखाची आठवण करून देतात. तिच्या कष्टावर, त्रासावर मायेची हळुवार फुंकर घालतात.

## २७. योगी आणि सासुरवाशीण

योगी :-

बसला मी देवध्यानी
काय मधी हे संकट

बाई, बंद कर तुझ्या
तोंडातली वटवट!

माझं माहेर, माहेर
सदा गानं तुझ्या ओठी
मंग माहेरून आली
सासराले कशासाठी?

सासुरवाशीण :-

अरे लागले डोहाये
सांगे शेतातली माटी
गाते माहेराचं गानं
लेक येईन रे पोटी!

देरे देरे योग्या ध्यान
ऐक काय मी सांगते
लेकीच्या माहेरासाठी
माय सासरी नांदते

देव कुठे देव कुठे
भरीसनी जो उरला
अरे उरीसनी माझ्या
माहेरात सामावला

संसारात राहूनही माहेरच्या रूपात देवाशी समरस होणारी सासुरवाशीण आणि संसाराचा त्याग करून नित्य देवाच्या मागे धावणारा तरीही त्याच्याशी समरस होऊ न शकणाऱ्या योग्याची ही कविता. सासुरवाशिणीच्या तोंडून सतत माहेरचे गुणगान ऐकून वैतागलेला योगी म्हणतो, 'माहेर माहेर करतेस, तर सासरी आलीस कशाला?' त्यावेळी गर्भात वाढणाऱ्या मुलीच्या भविष्यात तिला माहेर मिळावे, म्हणून मी सासरी आली, असे उत्तर ती सासुरवाशीण देते. त्यावर योगी ओशाळतो. त्या सासुरवाशिणीला देवाचे नाव घे, म्हणजे पुण्य मिळेल असा सल्ला देतो. यावर ती सर्वत्र भरून उरलेला देव माहेरात सामावला आहे, असे उत्तर देते. यावरून सासुरवाशिणीसाठी देवापेक्षाही माहेर मोठे आहे, हेच प्रतीत होते.

## २८. पोया

आला आला शेतकऱ्या
पोयाचा रे सन मोठा
हाती घेईसन वाट्या
आता शेंदूराले घोटा

आता बांधा रे तोरन
सजवा रे घरदार
करा आंघोयी बैलांच्या
लावा शिंगाले शेंदूर

लावा शेंदूर शिंगाले
शेंव्या घुंगराच्या लावा
गयामधी बांधा जीला
घंट्या घुंगरू मिरवा

बांधा कवड्याचा गेठा
आंगावऱ्हे झूल छान
माथा रेसमाचे गोंडे
चारी पायात पैंजन

उठा उठा बह्यनाई
चुले पेटवा पेटवा
आज बैलाले निवद
पुरनाच्या पोया ठेवा

वढे नागर वखर
नही कष्टाले गनती
पीक शेतकऱ्या हाती
याच्या जीवावर शेती!

उभे कामाचे ढिगारे
बैल कामदार बंदा
याले कहीनाये झूल
दानाचाऱ्याचाच मिंधा

चुल्हा पेटवा पेटवा
उठा उठा आयाबाया

आज बैलाले खुराक
रांधा पुरनाच्या पोया
खाऊ द्या रे पोटभरी
होऊ द्यारे मगदूल
बशीसनी यायभरी
आज करू द्या बागूल
आता ऐका मनातलं
माझं येळीचं सांगनं
आज पोयाच्या सनाले
माझं येवढं मागनं
कसे बैल कुदाळता
आदाबादीची आवड
वझं शिंगाले बांधता
बाशिंगाचं डोईजड
नका हेंडालू बैलाले
माझं ऐका रे जरासं
व्हते आपली हाऊस
आन बैलाले तरास
आता पुंजा रे बैलाले
फेडा उपकाराचं देनं
बैला, खरा तुझा सन
शेतकऱ्या तुझं रीन!

'पोळा' हा शेतकरी जीवनातला महत्त्वाचा सण. त्याचे वर्णन 'पोया' मध्ये बहिणाबाईंनी हुबेहूब केले आहे. बैलाचे कौतुक करण्याचा, त्याला विश्रांती देण्याचा हा दिवस. बैलांना अंघोळ घालून, शिंगे रंगवून पुरणपोळीचा नैवेद्य दाखवला जातो. घरोघरी बैलांना जेवणाची आमंत्रणे असतात. या कवितेत शेवटी बहिणाबाई एक मागणी करतात.

'नका हेंडालू बैलाले, माझं ऐका रे जरासं
व्हते आपली हाऊस, आन बैलाले तरास'
('पोया', 'बहिणाईची गाणी', पृ. ४६)

आपल्या हौसेसाठी बैलांची स्पर्धा लावून, त्यांच्या शिंगाला ओझे बांधून त्यांना छळू नका, बहिणाबाईंची मुक्या जनावरांबद्दलची ही हळहळ मनाला चटका लावते. बैलांचे ऋण फेडण्याचा हा दिवस आहे, असे त्या सांगतात.

## २९. घरापासून मळ्याकडे

१.

देखा महारवाड्यात
नावाचेच घरदारं
भटकती गावामधी
चाले तोंडानं जोहार

देखा महारवाड्यात
कशी मानसाची दैना
पोटामधी उठे आग
चुल्हा पेटता पेटेना!

महारकी महारकी
गावकरी ठेकेदार
गावातल्या पाटलाचे
हुकुमाचे ताबेदार!

२.

आता चाला जरा पुढे
भट्टी दारूची लागली
तठी भंगड दुनिया
जिती आशीसनी मेली

सदू गेली रे दवडी
बेसूदाची चाले गीता
नही हातात कवडी
तोंडी हजाराच्या बाता!

काम करीसनी भागे
संकटानं गांजे कोनी
दुख इसऱ्याच्या साठी

करती रे नशापानी
        पैशापरी जाये पैसा
        भुतामधी झाले जमा
        दारू पीसनी पीसनी
        झाल्या तोंडाच्या चिलमा

३.

अरे नारखा वाड्यात
देवा, पडता रे पाय
दाबा दाबा नाकपुड्या
आता नही दुजी सोय!
        किती बदकं - कोंबड्या
        आठीतठी घनानल्या
        दारोदारी पडे घान
        घरी माख्या भनानल्या!

४.

चुनीलाल बापू नांदे
राम मंदिराच्या नेटे
त्याच्या वाट्याले रे दाम
आप्पाजीले राम भेटे
        चुनीबापूची रे पेढी
        तठी चाले छन छन
        राम मंदिरामधी रे
        रामनामाचं भजन

५.

मंमई बाजारवाटे
चाले धडाड - दनाना
असा जयगावामधी
नानाजीचा छापखाना
        नानाजीचा छापखाना
        त्यात मोठे मोठे पुठ्ठे
        तसे शाईचे दराम

आन कागदाचे गठ्ठे

किती शिशाच्या चमट्या
ठसे काढले त्यावर
कसे निंघती कागद
छापसनी भराभर

चाले 'छाप्याचं यंतर'
जीव आठे बी रमतो
टाकीसनी रे मंतर
जसा भगत घुमतो!

मानसापरी मानूस
राहतो रे येडजाना
अरे होतो छापीसनी
कोरा कागद शहाना

६.

आता पाह्य जरा पुढे
लागे भुताची हायली
तिले नक्षीचं लाकूड
कोन्ह कशाले बांधली!

काय बांध्याचा उपेग
नही मानूस घरात
यायभरी रातभरी
त्यात नाचती रे भुतं!

भूईमंधी रे डबोलं
डोई पापाचं टोपलं
अरे मानसाचं भूत
मानसानं रे घडलं!

७.

आलं भाटीनीचं घर
तान्हा माझा रे हाटला
झेप टाकली टाकली
तिनं उचली घेतला

“खेय खेय यायभरी
भाटीनीची भारी माया
खाय आता भुसकुट
पेपरमीटाच्या गोया.”

८.

सोन्यारूपानं मढला
मारवाड्याचा बालाजी
शेतकऱ्याचा इठोबा
पानाफुलामधी राजी

अरे बालाजी - इठोबा
दोन्ही एकज रे देव
सम्रीतीनं गरिबीनं
केला केला दुजाभाव

९.

देखा रंगीत हायली
हांड्या झुंबर ते किती
मखरात बसवला
मोऱ्याबापा गनपती

१०.

सनी देवा सनी देवा
तुले माझा दंडवत
फेऱ्या घालते मी बापा
नको पाडू रे फेऱ्यात

सनीबापा, सनीबापा
घे रे तेलाचं बुधलं
तुले तेलात न्हानते
नको काढू माझं तेल

११.

दायवाल्याच्या फडात
तुरी हर्बऱ्याची थाप
दाय भरड भरड

झालं झालं सुरू माप
दायवाल्याच्या फडात
जसं पिकलं रे सोनं
दाय पिवयी धम्मक
भरीसनी गेलं मन
घरी भरल्या तिजोऱ्या
दारी दायीचे रे हुडे
कानी घातल्या रे साक्या
हाती सोनियाचे कडे

शेतात काम करावयास जाणाऱ्या बहिणाबाईंना मार्गात ज्या ज्या गोष्टी दिसायच्या, त्या त्यांच्या मनःपटलावर कोरल्या जायच्या. त्यातूनच ही कविता स्फुरली आहे.

महारवाड्यातील लोक तोंडाने 'जोहार मायबाप' म्हणत गावात भटकत असतात. त्यांची दैना, पोटाची आग तरीही न होणारी अन्नाची सोय प्रारंभीच या कवितेत वर्णन केली आहे.

मार्गात दारूची भट्टी लागते. दारू पिणाऱ्यांवरही बहिणाबाईंची रचना आहे. काम करून थकल्याने किंवा दुःख विसरण्यासाठी लोक दारू पितात; पण अडाणीपणा आणि दारिद्र्य यांमुळे गरिबांची झालेली दुर्दशा बहिणाबाईंना व्यथित करते. दुःख विसरण्यासाठी ते नशापाणी करतात. कोंबड्या-बकऱ्या मारून खातात. भुताखेतावर, मंत्रतंत्रावर विश्वास ठेवतात आणि त्यामुळेच त्यांची दुर्दशा ओढवते, असे त्या 'घरापासून मळ्याकडे'सारख्या कवितांतून पटवून देतात.

पुढे नानाजीचा छापखाना लागतो. बहिणाबाईंच्या मते कोरा कागद अडाणीच असतो; पण त्यावर अक्षरे छापली की तो शाहणा ठरतो. तसेच शिक्षणाने, सुसंस्काराने माणूस दुर्दशेवर मात करू शकेल, असा आशावाद त्यांच्या कवितेतून दिसतो.

या व्यतिरिक्त नारखा वाड्यातील घाण, राममंदिर, त्याजवळचे चुनीलाल बापूचे घर, भुताची हवेली, भाटिणीचे घर, बालाजी मंदिर, मखरात बसविलेला गणपती, शनी मंदिर, दाळवाल्याचे गोदाम या संदर्भातील वर्णने या कवितेत आलेली आहेत.

## ३०. गोसाई

तठे बसला गोसाई
धुनी पेटयी शेतात
करे 'बं बं भोलानाथ'
धरे चिमटा हातात

मोठा गोसाई यवगी
त्याच्यापाशी रे इलम
राहे रानात एकटा
बसे ओढत चिलम!

अरे, गोसायाच्यापाशी
जड्याबुट्या व्हत्या फार
देये लोकाले औसद
रोग पयी जाये पार!

अशा औसदाच्यासाठी
येती लोकांच्या झुंबडी
पन कोन्हाबीपासून
कधी घेयेना कवडी

चार झाडाले बांधल्या
व्हत्या त्याच्या चार गाई
पेये गाईचंच दूध
पोटामधी दूज नही

एक व्हती रे ढवयी
एक व्हती रे कपीली
एक व्हती रे काबरी
आन एक व्हती लाली

साऱ्या गायीमधी व्हती
गाय कपीली लाडकी
मोठं गुनी जनावर
देवगायीच्या सारकी

व्हती चरत बांदाले
खात गवत चालली

रोप कशाचं दिसलं
त्याले खायासाठी गेली

रोप वडाचं दिसलं
भूत बोले त्याच्यातून
'नींघ वढाय कुठली
व्हय चालती आठून'

आला राग कपीलाले
मालकाच्याकडे गेली
शिंग हालवत पाडे
माटी उखरू लागली

तिचा मालक गोसाई
सम्दं काही उमजला
'कोन आज कपीलाले
टोचीसनी रे बोलला?'

तसा गेला बांधावर
रोप हाललं हाललं
त्याच्यातून तेच भूत
जसं बोललं बोललं

टाके गोसाई मंतर
भूत पयीसनी गेलं
तसं वडाच्या रोपाचं
तठी जैऱ्ही रोप झालं

आरे जहरी बोल्याची
अशी लागे त्याले आंच
रोप वाढलं वाढलं
झाड झालं जहराचं

मोठ्ठं झाड जहराचं
गोसायाच्या शेतामधी
ढोरढाकर त्याखाले
फिरकती ना रे कधी

काय झाडाचं या नाव?

नही मालूम कोन्हाले
आरे कशाचं हे झाड
पुसा गोसाई बोवाले!

'गोसाई' ह्या कवितेत एक छोटीशी कथा आलेली आहे. गोसावी आणि त्याच्या चार गाई यांचे वर्णन त्यात आहे. कपिला गाय ही गोसाव्याची आवडती. देवगाईसारखी असलेली ही गाय बांधाजवळ चरत असताना एक रोप खाण्यासाठी पुढे जाते. त्या वडाच्या रोपावर बसलेले भूत तिला तेथून हाकलून देते. राग आल्यावर ती गोसाव्याकडे जाते. आवडत्या कपिलेला टोचून बोललेले पाहून क्रोधित झालेला गोसावी त्या रोपावर मंत्र टाकतो. विषारी बोलण्याच्या परिणामाने ते रोपही विषारी होते. गुरेढोरे त्याला खात नाही. त्याचे नावही कुणाला माहीत नाही. अशाप्रकारे वाईट बोलण्यामुळे आपले जीवनही तद्वत होऊन जाते.

## ३१. जयरामबुवाचा मान

तुझ्या लाडक्या लेकाचा
देता मान तुले
जाऊ आता सम्दे जनं
लोडगे खायाले

ध्यारे पुंजापत्री हाती
उदबत्ती कापूर
वहा हात जोडीसनी
जयराम् बोवावर

'आज आली तुझ्या दारी
मंगन रे तुले'
दे जयराम बुवा आता
आऊक्ष लेकाले

आता सांगते मी ऐका
ऐका रे काहानी
काय अवगत घडे, या
पुन्यात्री ठिकानी

“बारा वरसाचा मुंजा
वाटसरू कोनी
टिस लागीसनी गेला
पेयालेज पानी”

त्याले सोंबर दिसली
येहेर मयात
तांब्या शिकाई घेतली
टाकली गयाद

मंग वडांग कुदीसनी
येहेरीजोय आला
तव्हा तितक्यात कोनी
कोनी खकारला

जाये वडाच्या खालती
कोनी आर्वालया
तढी व्हता देवध्यानी
जयराम बोवा

म्हने जयराम बोवा
‘कोन तू पोरगा
अरे, पानी पेयाआंधी
खाई घे लोडगा?’

व्हता मुंजाबी भुकेला
बेवा पुढे आला
हाती घेतला लोडगा
खायाले लागला

मंग खाऊन लोडगा
वाटली हुशारी
गेला पेयासाठी पानी
आला येहरीवरी

त्यानं सोडली शिकायी
नित्तय पान्यात
घेये भरीसनी तांब्या

घटाघट पेत
तव्हा पानी पेता पेता
वडाच्या खालून
गेला सर्पटत साप
मुंजाच्या बाजूनं
तसा पाहे जयराम् बोवा
डोये रोखीसन
आता लागीन लागीन
मुंज्याले रे पान
पेत होता मुंजा पानी
पेयात मगन
तो कशाले देईन
आठे तठे ध्यान?
तसा उभे जयराम् बोवा
तीराच्या सारखा
देला सापावर पाय -
सापावर देखा
साप चेंदता चेंदता
साप उलटला
अन् मुंजाच्या वाटचा
बोवाले डसला
तव्हा पयाला पयाला
मुंजा घाबरत
पडे जयराम बुवा
लह्यऱ्याज देत
गेली गेली रे बातनी
आवघ्या गावाले
आता तठे 'हिराबाबू'
साप उताऱ्याले
गेला जयरामबोवा मरी
उपेग काय रे

काय चालीन मंतर
सापाले उतारे?
अरे उलटे मंतर
हिराबाबूवऱ्हे
गेलं चढीसनी ईख
सोताज लहरे
झडपला हिराबाबू
गेला रे प्यत
अन् मधीच पडला
सोंबारल्या शेतात
मौत जयराम बोवाची
गेली नाही हाटी
लोक आले रे पाह्याले
झाली तठी दाटी
देवमानूस शेवटे
देवाघरी गेला
जीव धोक्यात घातला
मुंजा वाचवला
देलं जयराम बोवानं
जीवाचं रे दान
आता मुंजासाठी लोक
देती त्याले मान
जारे 'बिढ्याच्या' वरते
'आसोद्याच्या' वाटे
"तठी वडाच्या खालते
जयराम बोवा भेटे."

बहिणाबाईंना जयरामबुवांमध्ये मानवधर्म दिसला. त्यामुळे बहिणाबाईंच्या मनात जयरामबुवांविषयी विशेष आदर आहे. त्याचे कारण सांगताना बुवांविषयीची एक दंतकथा बहिणाबाई या कवितेत सांगतात. बारा वर्षांच्या मुंजा मुलाचे प्राण बुवा आपला जीव गमावून वाचवतात. त्या मुलाला

होणारा सर्पदंश स्वतःवर ओढवून बुवा त्यांच्यातील मानवतेचे दर्शन देतात. या गोष्टीमुळे बहिणाबाई या कवितेतून जयरामबुवांविषयी कृतज्ञता व्यक्त करतात.

## ३२. खोकली माय

हिवायाचं थंड वारं
बोरी पिकल्या रानात
आली जयगावामधी
आली खोकल्याची सात

रस्त्यांवर वावरात
लोक खोकल्यात येडे
घरोघरी खोकलंनं
जसे वाजती चौघडे

अरे, घेतले औसद
नही राहे कुठे बाकी
तरी जायेना खोकला
सर्वे वैद्य गेले थकी

सर्वे वैद्य गेले थकी
आता जावं कुठे तरी?
करे मनात इचार
कोनी गावाचा कैवारी

अरे, गावाचा कैवारी
होता मोठा हिकमती
मेहेरूनच्या रस्त्यानं
जात व्हता कुठे शेती

“कसा आला रे खोकला
म्हने आवंदाच्या साली”
गावाच्याच शिववर
कोणी म्हातारी भेटली

तशी म्हातारी बोलली
“काही धर्म वाढ बापा
इडापीडा या गावाची
व्हई जाईन रे सपा”

तव्हा गावचा कैवारी
काय बोले म्हातारीले
“माझ्या गावचा खोकला
सर्वा दान केला तुले”

ऐकीसनी म्हातारी बी
तव्हा पडे भरमात
म्हने, ‘घेनंच पडीन
दान आलं जे कर्मात!’

मंग घेतला खोकला
सर्व गाव झाडीसनी
आन् बसे खोकलत
सदा गया खळ्ळीसनी

गेला गेला सर्वा निधी
गावामधल्या खोकला
असा खोकल्याचा वाटा
म्हातारीनं उचलला

खोक्ला निंधीजायासाठी
ध्रती म्हातारीचे पाय
हात जोडती रे लोक
खोक्ली माय खोक्ली माय

मेहेरूनच्या वाटेनं
जरा वयव रे पाय
तुले दिशीन रस्त्याले
तठे आता खोक्ली माय!

वरवर विनोदी असली तरी कारुण्याची झालर असलेली ही कविता आहे. जळगावात खोकल्याची मोठी साथ आली असता एक म्हातारी भिकारीण त्या गावात येते. ‘धर्म करा’ म्हणून गावापुढे हात पसरते. त्यावेळी गावचा एक कैवारी ‘गावातला सगळा खोकला तुला देऊन टाकला’, असे म्हणतो. गावातला सगळा खोकला जाऊन म्हातारी मात्र चोवीस तास खोकलत बसते. त्यानंतर ती ‘खोकली माय’ म्हणूनच प्रसिद्ध होते. आपला खोकला जावा म्हणून लोक

तिच्या पाया पडतात. अशाप्रकारे पदरात पडलेले असे त्रासदायक दानही ती निमूटपणे स्वीकारते आणि पुढेही गावातल्या भल्यासाठीच आशीर्वाद देते.

## ३३. अनागोंदी कारभार

भुजे सोनार मडकं
कुंभारानं केले तोडे
बंडी शिवतो सुतार
शिंपी लाकडाले घडे
शिये लव्हार वहाना
इय्या चांभार घडतो
चाले महाराची पोथी
ढोरं बाम्हन वढतो
बेलदार करे पेढे
हलवाई खुंदे गारा
पिंजे पाथरट रुई
पिंजरीन घडे चिरा
काय कामाची वाटनी
झाला गावाचा खैमाना
अरे असा कसा गाव
त्याले ठाव ना ठिकाना!

समाजव्यवस्था बिघडली तर माणसांचे जीवन उद्ध्वस्त होऊन जाते. याविषयी बहिणाबाईंची कविता म्हणजे 'अनागोंदी कारभार'. ज्याने त्याने आपले काम प्रामाणिकपणे करावे. शिंपी जर लाकूडतोड्या झाला, सोनार जर मडकी घडवू लागला किंवा लोहार चपला-जोडे शिवू लागला तर सगळीकडे अनागोंदी माजेल, अशी विविध उदाहरणे त्या देतात.

## ३४. नही दियामधी तेल

नही दियामधी तेल
कशी आंधारली रात
तेल मिये एकदाच
नेली उंदरानं वात!

वात केली चिंधुकाची
तेल दियात पडलं
सापडेना आकपेटी
घोडं आठी बी आडलं

सापडली आकपेटी
आग्या येतायाची लेक
आली आली हाती काडी
लाडानवसाची एक

शिलगावली रे काडी
जोत पेटली पेटली
आंधाऱ्याने ब्याहीसनी
मेली इझीसनी गेली

ग्रामीण जीवनात सर्वच गोष्टी प्रतिकूल असतात. लहानसहान गोष्टींसाठीही संघर्ष करावा लागतो. अंधार पडल्यावर दिवा लावण्यासाठी तेल मिळत नाही. तेल मिळाले तर वात उंदराने नेली. चिंधीची वात केली तर आगपेटी सापडत नाही. आगपेटी सापडली तर त्यात लाडानवसाची एकच काडी. ती पेटवली तर अंधाराला भिऊन ती विझूनही गेली. एकूणच ग्रामीण लोकांच्या नशिबात मूठभर प्रकाशसुद्धा नाही.

## ३५. काय घडे आवगत

उचलला हारा
हारखलं मन भारी
निजला हाऱ्यात
तान्हा माझा शिरीहारी

डोक्यावर हारा
वाट मयाची धरली
भंवयाचा मया
आंब्याखाले उतरली

उतारला हारा
हालकलं माझं मन

निजला हाऱ्यात
माझा तानका 'सोपान'
लागली कामाले
उसामधी धरे बारे
उसाच्या पानाचे
हातीपायी लागे चरे
ऐक ये आरायी
'धावा धावा घात झाला
अरे, धावा लव्हकरी
आंब्याखाले नाग आला!'
तठे धावत धावत
आली उभी धाववर
काय घडे आवगत
कायजात चरचर!
फना उभारत नाग
व्हता त्याच्यामधी दंग
हारा उपडा पाडुनी
तान्हा खेये नागासंग
"हात जोडते नागोबा
माझं वाचव रे तान्हं
अरे, नको देऊ डंख
तुले शंकराची आन
आता वाजव वाजव
बालकिस्ना तुझा पोवा
सांग सांग नागोबाले
माझा आयक रे धावा"
तेवढ्यात नाल्याकडे
ढोरक्याचा पोवा वाजे
त्याच्या सूराच्या रोखानं
नाग गेजा वजेवजे
तव्हा आली आंब्याखाले

उचललं तानक्याले
फुकीसनी दोन्ही कान
मुके कितीक घेतले
देव माझा रे नागोबा
नही तान्ह्याले चावला
सोता व्हयीसनी तान्हा
माझ्या तान्ह्याशी खेयला
कधी भेटशीन तव्हा
व्हतील रे भेटी गाठी
येत्या नागपंचमीले
आणीन दुधाची वाटी

सोपानदेव लहान असताना घडलेल्या एका प्रसंगाचे वर्णन 'काय घडे आवगत' या कवितेत आलेले आहे. शेतात कष्टाला जाताना बहिणाबाई छोट्या सोपानला हाऱ्यात घालून नेत असत. मळ्यात पोचल्यावर आंब्याच्या झाडाखाली हारा उतरवून त्या कामाला जात. उसाच्या मळ्यात काम करताना त्यांना आरोळी ऐकू येते. काळजात चर्रऽऽ होते आणि त्या धावत आंब्याखाली जातात. लहानगे सोपानदेव नागासोबत खेळताना पाहून त्यांना सुचेनासे होते. बहिणाबाई नागाला हात जोडून विनवतात. नागोबाला शंकराची शपथ घालतात. नंतर श्रीकृष्णाला विनवतात. त्याला त्याचा पावा वाजवायला सांगतात. योगायोगाने त्याच वेळी एक ढोरकी आपला पावा वाजवतो आणि नाग त्या दिशेने निघून जातो. सगळे आश्चर्यचकित करणारे घडून जाते. तान्ह्या सोपानावरचे संकट टळलेले पाहून बहिणाबाईंना आनंद होतो. त्या त्याला जवळ घेतात. नागाने आपल्या मुलाला दंश केला नाही आणि जणू स्वतः तान्हा होऊन आपल्या तान्ह्याशी खेळला हे पाहून बहिणाबाईंना तो नाग देव वाटतो. पुढे प्रत्येक नागपंचमीला त्या नागासाठी दुधाची वाटी आणीन, असे सांगतात.

## ३६. आप्पा महाराज

नाम जपता जपता
'जे जे रामकृस्न हरी'

आप्पा महाराज गेले
गेले आज देवाघरी!
जसा पुत्रू ‘रामदास’
आन सून ‘सीतामाई’
तसा लोकावर जीव
मनी दुजाभाव नही
उभ्या गावाचे कैवारी
खरे रामाचे पुजारी
आप्पा महाराज गेले -
सोडीसनी देवाघरी
आसू लोकाचे गयाले
जशा पावसाच्या सरी
आप्पा महाराज गेले
गेले आज देवाघरी
आप्पाजीची दयामाया
किती पार नाही त्याले
तुम्ही इचारा इचारा
‘बाबजीच्या समाधीले’
तुकाराम, मुक्ता, जना
मरीसनी रे जगले
आता कसं म्हनू तरी
आप्पा महाराज मेले?
किती भजन कीर्तन
रामनामाची लहेर
केलं रामाचं मंदिर
संत लोकाचं माहेर
राम लक्षूमन सीता
बसवले रे मंदिरी
त्याले सोन्याचा कयस
जागा संगमरवरी
दरसाल दहा दिसा

येतो उच्छावाले भर
वहनांत बशीसनी
येती दहा अवतार

दाही सरता वहनं
आली एकदाशी मोठी
मंग सवारला रथ
झाली गावांमधी दाटी

चार फोडले नारय
अरे, चाऱ्ही चाकावरी
सर्व्या मयातले फुलं
चढवले रथावरी

रस्त्यावर शिपडल्या
लाखो पान्याच्या घागरी
रथ चाले घडाघडा
लागे चाकाले मोगरी

रथ चालता चालता
पुढे मानसाची थाप
रथावऱ्हले सारथी
तठे दादाजी सराप

सर्व्या बजाराचे केये
माझ्या रथाची वानगी
घरोघरी ऐपतीत
मिये पैशाची कानगी

लोक आले दर्सनाले
लोक झुंड्यावर झुंड्या
रथापुढती चालल्या
किती भजनाच्या दिंड्या

ज्यांनी केली कार्तिकीले
'जयगावाची' पंढरी
आप्पा महाराज गेले
गेले म्हनू कसं तरी?

संत रामदास किंवा सीतामाईसारखे आदर्श जीवन जगणारे आप्पा महाराज. त्यांच्या निधनाचा उल्लेख या कवितेत आला आहे.

आप्पा महाराजांचा मुलगा रामदास आणि सून सीतामाई यांच्यावर त्यांची अपार माया होती, तसेच गावातील लोकांच्या कल्याणासाठीही ते झटत होते.

त्यांच्या मृत्यूचे दुःख साऱ्या गावाला झाले. तुकाराम, मुक्ताबाई, जनाबाई हे जसे अमर झाले तसे आप्पा महाराजही अमर झाले, असे बहिणाबाई म्हणतात.

आप्पा महाराजांनी केलेली भजने, कीर्तने राम, लक्ष्मण, सीतेच्या प्रतिमांची प्रतिष्ठापना, जळगावात सुरू केलेला रथोत्सव अशा अनेक गोष्टींमुळे आप्पा महाराजांचा नावलौकिक सदैव राहिला. जळगावातला रथोत्सव दरवर्षी दहा दिवस चालतो. दहा दिवस, दहा अवतार, दहा वाहनांवर बसून आल्यावर मग मोठ्या एकादशीचा दिवस उजाडतो. हा कार्तिक महिन्यातील मोठ्या एकादशीचा उल्लेख आहे. सजविलेला रथ, रथावर चढवलेली फुले, लाखो घागरींनी शिंपडले जाणारे पाणी आणि लोकांची गर्दी असे सगळे वर्णन बहिणाबाई करतात.

## ३७. माझी मुक्ताई

माझी मुक्ताई मुक्ताई
दहा वर्साचं लेकरू
चांगदेव योगीयानं
तिले मानला रे गुरू

..........

देख ग्यानियाच्या राजा
आदिमाया पान्हावली
सर्व्याआधी रे मुक्ताई
पान्हा पियीसनी गेली

..........

अरे संन्याशाची पोरं
कोन बोलती हिनई
टाकी देयेल पोरांचं

कधी तोंड पाहू नही

..........

अरे असं माझं तोंड
कसं दावू मी लोकाले
ताटी लावी ग्यानदेव
घरामधी रे दडले!

उबगले ग्यानदेव
घडे असंगाशी संग
कयवयली मुक्ताई
बोले ताटीचे अभंग

घेती हिरीदाचा ठाव
ऐका ताटीचे अभंग
एका एका अभंगात
उभा केला पांडुरंग

गह्यरले ग्यानदेव
डोये गेले भरीसन
असा भाग्यवंत भाऊ
त्याची मुक्ताई बहीन!

(अपूर्ण)

स्त्रीजीवनाशी संबंधित बहिणाबाईंची कविता 'माझी मुक्ताई'. या कवितेतल्याही बऱ्याच ओव्या सुटलेल्या आहेत. ज्ञानेश्वरांची धाकटी बहीण मुक्ताबाई हिचा बहिणाबाईंना अभिमान वाटतो. दहा वर्षांच्या या चिमुरडीला गुरू करावे असे दीर्घकाळ जगलेल्या योगी चांगदेव यांना वाटले, ही एका स्त्रीसाठी अभिमानाची बाब आहे. 'संन्याशाची पोरं' म्हणून हिणवल्या गेलेल्या ज्ञानदेवांच्या भावंडांना समाजाने छळले, विटाळात टाकले. माझे तोंड मी लोकांना कसे दाखवू, असे ज्ञानदेवांना वाटले आणि त्यांनी स्वतःला झोपडीत कोंडून घेतले. तेव्हा 'ताटी उघडा ज्ञानेश्वरा' म्हणत मुक्ताईची कविता जन्माला आली. दहा वर्षांची चिमुरडी मुक्ताई जणू ज्ञानदेवांची आई झाली आणि ओव्या म्हणू लागली. जणू पांडुरंग जागा झाला. ज्ञानदेवांच्या हृदयाचा ठाव या मुक्ताईच्या ओव्यांनी घेतला आणि त्यांना गहिवरून आले.

## ३८. आली पंढरीची दिंडी

दारी उभे भोये जीव
घरी पयाले पाखंडी
टायमुर्दुगाची धून
आली पंढरीची दिंडी

पुढे लाह्याची डालकी
बुक्का गुलालाची गिंडी
मधी चालली पालखी
आली पंढरीची दिंडी

दोन्ही बाजू वारकरी
मधी 'आप्पा महाराज'
पंढरीची वारी करी -
आली 'जयगावी' आज

अरे वारकऱ्या, तुले
नही ऊन, वारा, थंडी
झुगारत अवघ्याले
आली पंढरीची दिंडी

टायमुर्दुगाच्या वरी
हरीनाम एक तोंडी
'जे जे रामकिस्न हारी'
आली पंढरीची दिंडी

शिक्यावर बालकुस्ना
तठी फुटली रे हांडी
दहीकाला खाईसनी
आली पंढरीची दिंडी!

मोठ्या तट्ट्याच्या दमन्या
त्यात सर्व सामायन
रेसमाच्या कापडात
भागवत रामायन

आले 'आप्पा महाराज'
चाला दर्सन घेयाले

घ्या रे हाती परसाद
लावा बुक्का कपायाले
करा एवढं तरी ते
दुजा काय रे संसारी
देखा घडीन तुम्हाले
आज पंढरीची वारी
कसे बसले घरात
असे मोडीसन मांडी
चला उचला रे पाय
आली पंढरीची दिंडी

या कवितेत श्री आप्पा महाराज पंढरपूरहून दिंडीसह आल्याचा उल्लेख आहे. त्यांच्या आणि इतर वारकऱ्यांच्या दर्शनाची ओढ बहिणाबाईंना आहे. ही दिंडी गावात शिरते आणि पाखंडी लोक पसार होतात. भाविकांकरिता मात्र हा आनंदाचा सोहळा असतो. वारकऱ्यांच्या दर्शनानेही पुण्य घडू शकते ही त्यांची श्रद्धा. प्रत्यक्षात पंढरपूरला जाता आले नाही, तरी या वारकऱ्यांच्या दर्शनाने संसारी लोकांना जीवन सार्थक करून घेता येईल, असे बहिणाबाई सांगतात.

## ३९. **विठ्ठल मंदिर**

माझं इठ्ठल मंदिर
अवघ्याचं माहेर
मधी इठ्ठल रखुमाई
उभे इटेवर
टाय वाजे खनखन
मरदुंगाची धून
तठे चाललं भजन
गह्यारी गह्यारीसन
टायकऱ्याचा जमाव
दंगला दंगला
तुकारामाचा अभंग
रंगला रंगला

तुम्ही करा रे भजन
ऐका रे कीर्तन
नका होऊ रे राकेस
सुद्ध ठेवा मन

आता सरला अभंग
चालली पावली
'जे जे इठ्ठल रखुमाई
ईठाई माऊली'

शेतांमधी गये घाम
हाडं मोडीसनी
आता घ्या रे हरीनाम
टाया पिटीसनी

उभा भक्तीचा हा झेंडा
हरीच्या नावानं
हा झेंडा फडकावला
'झेंडुला बोवानं'

आता झाली परदक्षिना
भुईले वंदन
'हेचि दान देगा देवा'
आवरलं भजन

आता फिरली आरती
भजन गेलं सरी
बह्यना देवाचिया दारी
उभी क्षनभरी

सर्वांनाच माहेर वाटावे असे हे विठ्ठल-रुक्मिणी देवस्थान जुन्या जळगावात होते. माहेरची अपार माया, प्रेम, आत्मीयता, जिव्हाळा, मनाची शांती, समाधान हे सगळे या मंदिरात मिळते. या विठ्ठल मंदिराविषयी बहिणाबाईंना अभिमान आहे. या मंदिरातील टाळ-मृदंगाची धून, गहिवरलेल्या अंतःकरणांनी भाविकांचे चाललेले भजन, तुकारामांच्या अभंगात तल्लीन झालेले भक्त हे सर्व वर्णन बहिणाबाई समरसतेने करतात. भक्तीचा आनंद सर्वांनी घेण्याचे आवाहन त्या करतात.

पोटासाठी शेतात राबणाऱ्यांना टाळ्या वाजवून हरिनामाचा गजर करण्याचे आवाहन त्या करतात. या कवितेत ह.भ.प. झेंडुलाबुवाचा गौरवपूर्ण उल्लेख आढळतो. त्यांनीच भजनकीर्तनाची परंपरा आपल्या परिसरात सुरू केल्याचे त्या नमूद करतात. भजन सरते पण बहिणाबाई परमेश्वरी भक्तीत तल्लीन होऊन गेलेल्या असतात, लीन झालेल्या असतात.

## ४०. खरा देवामधी देव

अरे कानोड कानोड
सदा रुसते फुगते
आंगावरती लेयाले
सर्वे डागिने मांगते

अरे डागिने मांगते
हिची हौस फिटेनाज
अशी कशी नितातेल
तिले गान गाती रोज

माय कानोड कानोड
मानसाची जमे थाप
देखा वाजयी वाजयी
सर्वे फुटले रे डफ

अरे पाह्मा जरा पुढे
आली पंढरीची हुडी
पाहीसन झाली कशी
तुझी कानोड कानोडी!

मापा कानोड कानोड
काय देवाचं रे सोंग
खरा देवामधी देव
पंढरीचा पांडुरंग!

अरे, एकनाथासाठी
कसा चंदन घासतो
सावत्याच्या बरोबर
खुर्प हातात धरतो

बोधाल्याच्या शेतामधी

दाने देतो खंडी खंडी
झाला इठोबा महार
भरे दामाजीची हुंडी

कबिराच्या साठी कसा
शेले इने झटपट
जनाबाई बरोबर
देव चालये घरोट

कुठे तुझी रे कानोड
कुठे माझा रे इठोबा
कुठे निंबाची निंबोयी
कुठे 'बोरशाचा' आंबा

अरे इठोबासारखं
देवदेवतं एकज
चला घ्या रे दरसन
निंघा पंढरीले आज!

आसुरी लोकांच्या 'कानोड' या देवतेपेक्षा विठोबाराया श्रेष्ठ असून कानोडच्या उपासकांनी तिची पूजा सोडून विठ्ठलाची उपासना करावी असे बहिणाबाई सांगतात. रुसणारी, दागिने मागणारी हावरट देवता एकीकडे आणि भक्तांच्या मदतीला धावणारा पांडुरंग दुसरीकडे. एकनाथांसाठी त्यांच्या घरी राबणारा, चंदन घासून देणारा, सावता माळ्याबरोबर खुरपे हातात घेऊन निंदन करणारा, बोधल्याच्या शेतात खंडी-खंडीभर धान्य पिकवणारा, महाराचे रूप घेऊन दामाजीची हुंडी चुकविणारा, कबिराचे शेले विणणारा आणि जनाबाईबरोबर दळण दळणारा. या विठ्ठलासमोरा कानोड म्हणजे निंबाची निंबोयी. निंबोयी फार कडू तर बोरशाचा आंबा फार गोड. तशी विठोबा आणि कानोड यांच्यात तुलना होऊ शकत नाही. विठ्ठलावरील आत्यंतिक श्रद्धा बहिणाबाईंच्या या कवितेत जाणवते.

## ४१. देव दिसला, देव कुठे?

सदा जगाच्या कारनी
चंदनापरी घसला
अरे सोतामधी त्याले

देव दिसला दिसला!

सोता झाला रे दगड
घाव टाकीचा सोसला
अरे दगडात त्याले
देव दिसला दिसला!

डोये मिटले मिटले
सोतालेबी इसरला
अरे आंधाऱ्यात त्याले
देव दिसला दिसला!

माले कयालं गुपित
काय तुझी करामत
अरे आंधारानं केली
उजेडाच्या वऱ्हे मात!

देव कुठे देव कुठे?
तुझ्या बुबुयामझार
देव कुठे देव कुठे?
आभायाच्या आरपार!

माणसाच्या जगण्याचे सार्थक जगाच्या कल्याणासाठी चंदनाप्रमाणे झिजण्यात आहे. चंदनासारख्या परोपकारी व्यक्तीच्या अंतःकरणात परमेश्वर वास करतो. दगडाला छन्नी-हातोड्याचे घाव सहन करावे लागतात, तेव्हा परमेश्वराची मूर्ती साकारते, दगडाला देवत्व प्राप्त होते. असा हा देव कुठे आहे? ज्याने परमेश्वराला जाणले, तो निर्गुण, निराकार परमेश्वर भक्ताच्या डोळ्यांपुढे सतत असतो आणि जो या परमेश्वरी तत्त्वाला जाणूच शकला नाही, त्याच्याकरिता देव आभाळाच्या पल्याड असतो.

## ४२. मानूस

मानूस मानूस
मतलबी रे मानसा,
तुले फार हाव
तुझी हाकाकेल आशा

मानसा मानसा
तुझी नियत बेकार,
तुझ्याहून बरं
गोठ्यातलं जनावर

भरला डाडोर
भुलीसनी जातो सूद
खाईसनी चारा
गायम्हैस देते दूध

मतलबासाठी
मान मानूस डोलये
इमानाच्यासाठी
कुत्रा शेपूट हालये

मानसा मानसा,
कधी व्हशीन मानूस
लोभासाठी झाला
मानसाचा रे कानूस!

आज माणूस 'माणूसपण' हरवून बसला आहे, जनावर झाला आहे. गोठ्यातल्या गाईम्हशी चारा खाऊन दूधतरी देतात; पण माणूस खाऊनपिऊन बेइमान होतो. कुत्राही धन्याशी प्रामाणिक राहतो; पण माणूस स्वार्थापोटी प्रामाणिकपणा सोडतो. शेवटी त्या दुःखी अंतःकरणाने माणसाला विचारतात,

'मानसा मानसा
कधी व्हशीन मानूस
लोभासाठी झाला
मानसाचा रे कानूस!'

('मानूस', 'बहिणाईची गाणी', पृ. ७७)

## ४३. रायरंग

आला आला रायरंग
करे लोकाचं रंजन
हासवता हासवता
घाले डोयात अंजन

आला आला रायरंग
देखा याची सपातनी
भरे हिरीद काठोट
झरे डोयाची माथनी

रायरंग रे नाटक्या
याच्या पोटाचं गऱ्हानं
नका म्हनू रे गऱ्हानं
घडे देवाचं पुरान

कोन्ही म्हणे आलं दारी
रायरंगाचं रे सोंग
अरे त्याच सोंगामधी
माले दिसे पांडुरंग!

आला रायरंग दारी
याचं फेडा तरी रीन
अरे थकले भागले
त्याचा घालवतो शीन

नका म्हणू रे भिकारी
जरी तुम्ही नानावटी
करा गुनाची कदर
हात घाला कनवटी

समाजाचे मनोरंजन करणाऱ्या बहुरूप्याबद्दलही त्यांच्या मनातील कळवळा कवितेतून प्रगट होतो. बहुरूप्याचे सोंग घेऊन आलेल्या गरीब माणसात त्यांना पांडुरंग दिसतो. हाच रायरंग मनोरंजन करता करता समाजातील अपप्रवृत्तींचे दिग्दर्शन करताना चुकणाऱ्यांच्या डोळ्यात अंजन घालतो. बहिणाबाईंची सूक्ष्मनिरीक्षणशक्ती विलक्षण आहे. त्याचबरोबर समाजाला दिशा देणारी व्यक्तिचित्रे त्या उत्तमरीतीने हेरतात आणि त्यांच्या सोप्या लयबद्ध भाषेत मांडतात.

## ४४. पिलोक

पिलोक पिलोक
आल्या पिलोकाच्या गाठी

उजाडलं गाव
खया-मयांमधी भेटी
        पिलोक पिलोक
        जीव आला मेटाकुटी
        भाईर झोपड्या
        गावामधी मसनवाटी
पिलोक पिलोक
कशाच्या रे भेटीगाठी!
घरोघरी दूख
काखाजागामधी गाठी
        पिलोक पिलोक
        आता नशिबात ताटी
        उचलला रोगी
        अन् गाठली करंटी

'पिलोक' ही कविता प्लेग ह्या रोगामुळे गावाला कशी मरणकळा प्राप्त होते, याचे वर्णन करणारी आहे. प्लेगच्या साथीत काखेत आणि जांघेत गाठी येऊन लोक पटापटा मरतात. त्यामुळे गावातील लोक गावाबाहेर झोपड्या बांधून राहतात. एरवी चैतन्यमय दिसणारे गाव स्मशानवत भासू लागते. पुढे मृत्यूकडेच हा प्रवास होतो, असे वर्णन या कवितेत केले आहे.

## ४५. **चुल्हा पेटता पेटेना**

घरी दाटला धुक्कय
कसा हटता हाटेना
माझे डोये झाले लाल
चुल्हा पेटता पेटेना
        कसा पेटता पेटेना
        चुल्हा किती फुका फुका
        लागल्या रे घरांमधी
        अवघ्याले भुका भुका
आता सापडेना हाती
कुठे फुकनी बी मेली

कुठे पट्टवकरीन –
‘नूरी’ पयीसन गेली
आता गेल्या सरीसनी
पेटीमधल्या आक्काड्या
सर्व्या गेल्या बयीसनी
घरामधल्या संकाड्या
पेट पेट धुक्कायेला,
किती घेसी माझा जीव
आरे इस्तवाच्या धन्या!
कसं आलं तुले हीव!
तशी खाबांशी फुकनी
सापडली सापडली
फुकी – फुकीसनी आग
पाखडली पाखडली!
आरे फुकनी फुकता
इस्तो वाजे तडतड
तव्हा धगला धगला
चुल्हा कसा धडधड
मंग ठाकला उसासा
थोडा घेतला इसावा
एकदाचा आदयला
झट चुल्ह्यावर तावा
आता रांधते भाकर
चुल्ह्यावर ताजी ताजी
मांघे शिजे वजेवजे
भांग चुल्हीवर भाजी
खूप रांधल्या भाकरी
दुल्ळी गेली भरीसनी
मंग हात धोईसनी
इस्त्यावर पडे पानी
इस्त्यावर पडे पानी

आली वाफ हात लासे
तव्हा उचलता तावा
खसा खदखदा हासे!

पूर्वीच्या काळी स्त्रिया चुलीवर स्वयंपाक करीत असत. हीच चूल वेळेवर पेटली नाही, तर स्त्रियांची धांदल उडत असे. आधीच कष्टमय असलेले जीवन, त्यात चुलीचा आडमुठेपणा, त्यामुळे बहिणाबाई चुलीवरच वैतागतात. डोळे लाल झालेले, घरच्यांना भुका लागलेल्या, न सापडणारी फुंकणी, आगपेटीच्या संपलेल्या काड्या अशा सगळ्या संकटांवर मात करत एकदाची चूल पेटते आणि टोपलीभरून ताज्या ताज्या भाकरी रांधल्या जातात. स्त्रियांचा हा त्रास पाहून तवा मात्र खदखदा हसत असतो. गरम तव्यावर पाणी टाकले असता त्याचा तड्तड आवाज होतो, त्याला बहिणाबाईंनी तव्याच्या हसण्याची उपमा दिली आहे.

## ४६. मी कोन?

अरे मी कोन, मी कोन?
आला मानसाले ताठा
सर्व्या दुनियात आहे
माझ्याहून कोन मोठा?

अरे मी कोन, मी कोन?
बोले भुकेलं मीपन
तव्हा तोंडातला घास
म्हने, "तू कोन, तू कोन?"

अरे मी कोन, मी कोन?
जव्हा लागली तहान
तव्हा पान्याचा घुटका
म्हने, "तू कोन, तू कोन?"

अरे मी कोन, मी कोन?
लागे ठसका जोरानं
तव्हा घशातला सास
म्हने, "तू कोन, तू कोन?"

अरे मी कोन, मी कोन?
माझ्या मुखी हरिनाम!
“तुझ्या जिभेले इचार”
मधी बोले आत्माराम

साऱ्या दुनियाचा राजा
म्हने, “तू कोन, तू कोन?”
अशा त्याच्या मीपनाले
मसनात सिव्हासन!

अरे मी कोन, मी कोन?
मीपनाची मरीमाय
देखा इची कशी तऱ्हा
सोता सोतालेच खाय!

माणसाच्या अहंकारी वृत्तीवर प्रकाश टाकणारी ‘मी कोन? (अहंकार)’ ही कविता. या जगात माझ्याहून कोणी श्रेष्ठ नाही, असा गर्व माणूस करतो. श्रेष्ठत्वाचा टेंभा मिरवणारा माणूस भुकेने कासावीस होतो, तेव्हा तोंडातला घास श्रेष्ठ ठरतो. त्याला जेव्हा तहान लागते, तेव्हा पाण्याचा घोट श्रेष्ठ ठरतो आणि जेव्हा त्याला ठसका लागतो, तेव्हा केवळ एका श्वासापुढे त्याला अगतिक व्हावे लागते. जेव्हा माणसाला हरिनाम मुखोद्गत करण्याचा अहंकार होतो, तेव्हा जीभ म्हणते की तीच प्रत्यक्ष आत्मारामाचा हुंकार असते.

अहंकाराने मनुष्य स्वतःचेच नुकसान करून घेतो आणि स्वतःचाच नाश करून घेतो. स्वतःच स्वतःला खाऊन टाकणाऱ्या मीपणाच्या मरिमायची ही कल्पना मानवाच्या ‘मीपणा’च्या प्रवृत्तीवर चपखल बसते.

## ४७. पर्सुराम बेलदारा

जाय आता पंढरीले
“पर्सुराम बेलदारा”
माटीमधी टाकी पानी
किती खुंदशी रे गारा

इटा पाडल्या पाडल्या
पजाब बी गेला भरी

तुझ्या इटाच्या रे भट्ट्या
किती लावशीन तरी
अरे साऱ्या जगामधी
तूने कधी ना देखली
अशी देख एक ईट
इठ्ठलाच्या पायाखाली
भट्टीतल्या इटांवरी
तुझ्या संसाराचा रंग
तठी एका इटेवरी
देख उभा पांडुरंग!
आता तरी जाय बापा
एकदाचा पंढर्पुरा
मुखी पांडुरंगहरी
कर नामाच्या गजरा

आता पंढरपूरला जाऊ, पुढच्या वर्षी जाऊ असे म्हणत वारी पुढे ढकलणारा विटांच्या भट्टीवाला पर्सुराम. त्याला उद्देशून ही कविता बहिणाबाईंनी लिहिली. पंढरीच्या विठोबाचे आणि त्या अलौकिक विटेचे महात्म्य बहिणाबाई पर्सुरामाला पटवून देतात. त्याने एकदा तरी त्याचे दर्शन घेण्यासाठी पंढरपूरला जावे म्हणून विनवतात.

## ४८. धरत्रीले दंडवत

काया काया शेतांमधी
घाम जिरव जिरव
तव्हा उगलं उगलं
कायामधून हिरवं!
येता पिकाले बहार
शेताशेता हिर्वय
कसं पिकलं रे सोनं
हिर्व्यामधून पिवंय!
अशी धरत्रीची माया
अरे, तिले नही सीमा

दुनियाचे सर्व पोटं
तिच्यामधी झाले जमा

शेतांमधी भाऊराया
आला पीक गोंजारत
हात जोडीसन केला
धरत्रीले दंडवत

शेतामधी भाऊराया
खाले वाकला वाकला
त्यानं आपल्या कपायी
टिया मातीचा लावला

अशी भाग्यवंत माय
भाऊरायाची जमीन
वाडवडीलांचं देवा,
राखी ठेव रे वतन!

काळ्या आईवरची श्रद्धा व्यक्त करणारी 'धरत्रीले दंडवत' ही कविता. या कवितेत बहिणाबाईंच्या माहेरच्या शेतीचे वर्णन आढळते. शेतीत राबल्याने काळ्या मातीतून हिरवे पीक येईल. दाणे पूर्ण भरल्यावर हिरव्याचे पिवळे सोने होईल, ही सगळी किमया धरती मातेची आहे. तिच्या मायेला सीमा नाही. या मातेवरील श्रद्धा बहिणाबाईंचा भाऊरायाही व्यक्त करतो आणि धरित्रीला दंडवत करतो. खाली वाकून मातीचा टिळा आपल्या कपाळाला लावतो.

असा हा बहिणाबाईंच्या कवितांचा थोडक्यात परिचय आहे. बहिणाबाईंनी रंगविलेली काही व्यक्तिचित्रे, इतर काही कविता, स्फुट ओव्या आणि म्हणी सोपानदेवांना आढळून आल्या होत्या. त्यांचा थोडक्यात परिचय पुढे करून देण्यात आला आहे.



# बहिणाबाईंच्या कवितेतून प्रगटणारे व्यक्तिगत जीवन

बहिणाबाईंची कविता ही त्यांच्या जीवनाचा आरसा आहे. त्यांच्या बऱ्याचशा कवितांमधून त्यांचे व्यक्तिगत जीवन प्रगटलेले आहे. 'लपे करमाची रेखा', 'आता माझा माले जीव', 'काय घडे आवगत' अशा काही कविता उदाहरण म्हणून घेता येतील. ऐन तारुण्यात पतीचे निधन झाल्यावर बहिणाबाईंना 'लपे करमाची रेखा' ही कविता सुचली असावी. वैधव्याची आपत्ती कोसळल्यावर भविष्याचा वेध त्या घेतात; पण त्यांची पद्धत निराळी.

'लपे करमाची रेखा
माझ्या कुंकवाच्या खाली
पुशीसनी गेलं कुंकू
रेखा उघडी पडली'

('लपे करमाची रेखा', 'बहिणाईची गाणी', पृ. २१)

पती गेल्यावर धनाचा झराही आटला. कष्टांना सीमा राहिली नाही.

'देवा, तुझ्याबी घरचा
झरा धनाचा आटला
धन-रेखाच्या चऱ्यानं
तयहात रे फाटला'

('लपे करमाची रेखा', 'बहिणाईची गाणी', पृ. २१)

या कवितेत तिसऱ्या कडव्यापासून बहिणाबाईंनी ही कविता ज्योतिष्याला उद्देशून रचली असावी, असे वाटते. ग्रामीण भागात घराघरात जाऊन भविष्य सांगणारे ज्योतिषी असतात. बहिणाबाई ज्योतिष्याला स्पष्ट सांगतात,

'बापा, नको मारू थापा
असो खऱ्या असो खोट्या
नही नशीब नशीब
तयहाताच्या रेघोट्या'

('लपे करमाची रेखा', 'बहिणाईची गाणी', पृ. २१)

'तुझ्या या थापा खऱ्या असतील किंवा खोट्या असतील, तळहाताच्या रेघोट्यांवरून नशीब ओळखता येत नाही. माझ्या भविष्याची मला जाणीव

आहे.' आपली दोन्ही मुले सुखात राहोत, हेच त्यांचे परमेश्वराला मागणे आहे. म्हणून शेवटी त्या ज्योतिष्याला म्हणतात,

'नको नको रे ज्योतिषा
नको हात माझा पाहू
माझं दैव माले कये
माझ्या दारी नको येऊ!'

('लपे करमाची रेखा', 'बहिणाईची गाणी', पृ. २१)

इथे बहिणाबाईंची कणखर वृत्ती जाणवते. खोट्या आशेच्या आहारी न जाता कष्टावर, वास्तवावर त्यांचा विश्वास आहे. आपले नशीब जाणण्यासाठी त्यांना ज्योतिष्याची गरज वाटत नाही.

पतीच्या निधनानंतर बहिणाबाईंना जे दुःख झाले त्याचे वर्णन 'आता माझा माले जीव' या कवितेत येते.

'अरे रडता रडता
डोये भरले भरले
आसू सरले सरले
आता हुंदके उरले'

('आता माझा माले जीव', 'बहिणाईची गाणी', पृ. २२)

पती गेल्यावर रडून रडून त्यांची झालेली अवस्था येथे वर्णन केलेली आहे.

'सांग सांग धर्ती माता
अशी कशी जादू झाली
झाड गेलं निंघीसनी
मांघे सावली उरली'

('आता माझा माले जीव', 'बहिणाईची गाणी', पृ. २२)

धरतीमातेला बहिणाबाई विचारतात, की अशीकशी ही जादू झाली? पती म्हणजे झाड, पत्नी म्हणजे त्याची छाया. झाडावाचून सावलीला अस्तित्वच नाही. आपल्या जीवनात आता आधार उरला नाही; पण या दुःखातही स्वतःचे सांत्वन स्वतःच करताना आपल्या मुलांसाठी आपण जगले पाहिजे, याची जाणीव त्यांना होते.

'देव गेले देवाघरी
आठी ठेयीसनी ठेवा

डोयापुढे दोन लाल
रडू नको माझ्या जीवा!

रडू नको माझ्या जीवा
तुले रडाची रे सव
रडू हासव रे जरा
त्यात संसाराची चव'

('आता माझा माले जीव', 'बहिणाईची गाणी', पृ. २२)

दुःखात गुरफटून राहणारा, दुःखाचे रडगाणे गात राहणारा माणसाचा स्वभाव. पण हे रडणे हसण्यात बदलले तर संसारात गोडी निर्माण होते.

बहिणाबाईंचा आत्मविश्वास दांडगा आहे.

'जरी फुटल्या बांगड्या
मनगटी करतूत
तुटे मंगयसूतर
उरे गयाची शपत'

('आता माझा माले जीव', 'बहिणाईची गाणी', पृ. २२)

जीवनसाथी निघून गेला असला तरी मनगटात जोर असल्याचे, म्हणजे मुलांसाठी कष्ट करून जगण्याची हिंमत असल्याचे त्या सांगतात आणि सांत्वन करणाऱ्या आयाबायांना आपली कीव न करण्याविषयी स्पष्ट सांगतात.

'नका नका आयाबाया
नका करू माझी कीव
झालं माझं समाधान
आता माझा माले जीव'

('आता माझा माले जीव', 'बहिणाईची गाणी', पृ. २३)

'लक्ष्मीबाई आणि बहिणाई दोघींनाही वैधव्याचे दुःख भोगावे लागले; पण ते सांगण्याच्या दोघींच्या पद्धती किती वेगळ्या आहेत! ह्या दोघींत बहिणाईंची पद्धत जास्त भावार्द्र आणि काव्यात्म अशी आहे. तशा दुःखातून त्या स्वतःला सावरतात. आचरायला अतिशय असा अवघड उपदेश मनाला करतात.'[१]

सोपानदेव लहान असताना घडलेल्या एका प्रसंगाचे वर्णन 'काय घडे आवगत' या कवितेत आलेले आहे. शेतात कष्टाला जाताना बहिणाबाई छोट्या सोपानला हाऱ्यात घालून नेत असत. मळ्यात पोचल्यावर आंब्याच्या

झाडाखाली हारा उतरवून त्या कामाला जात. उसाच्या मळ्यात काम करताना त्यांना आरोळी ऐकू येते.

‘ऐकू ये आरायी,
‘धावा धावा घात झाला
अरे धावा लव्हकरी
आंब्याखाले नाग आला!’ ’

(‘काय घडे आवगत’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. ६३)

ही आरोळी ऐकून बहिणाबाईंच्या हृदयाचे ठोके क्षणभर थांबतात. काळजात चर्रऽ होते आणि त्या धावत आंब्याखाली जातात.

‘फना उभारत नाग
व्हता त्याच्यामधी दंग
हारा उपडा पाडूनी
तान्हं खेये नागासंग’

(‘काय घडे आवगत’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. ६३)

लहानगे सोपानदेव नागासोबत खेळताना पाहून त्यांना सुचेनासे होते.

‘हात जोडते नागोबा
माझं वाचव रे तान्हं
अरे नको देऊ डंख
तुले शंकराची आन’

(‘काय घडे आवगत’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. ६४)

बहिणाबाई नागाला हात जोडून विनवतात. नागोबाला शंकराची शपथ घालतात. नंतर श्रीकृष्णाला विनवतात. त्याला त्याचा पावा वाजवायला सांगतात. योगायोगाने –

‘तेवढ्यात नाल्याकडे
ढोरक्याचा पोवा वाजे
त्याच्या सुराच्या रोखानं
नाग गेला वजेवजे’

(‘काय घडे आवगत’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. ६४)

नेमका त्याच वेळी एक ढोरकी आपला पावा वाजवतो आणि नाग त्या दिशेने निघून जातो. सगळे आश्चर्यचकित करणारे घडून जाते. तान्ह्या

सोपानावरचे संकट टळलेले पाहून बहिणाबाईंना आनंद होतो. त्या त्याला जवळ घेतात.

'देव माझा रे नागोबा
नही तान्ह्याले चावला
सोता व्हयीसनी तान्हा
माझ्या तान्ह्याशी खेयला!'
'कधी भेटशीन तव्हा
व्हतील रे भेटीगाठी
येत्या नागपंचमीले
आणीन दुधाची वाटी'
('काय घडे आवगत', 'बहिणाईची गाणी', पृ. ६४)

नागाने आपल्या मुलाला दंश केला नाही आणि जणू स्वतः तान्हा होऊन आपल्या तान्ह्याशी खेळला हे पाहून बहिणाबाईंना तो नाग देव वाटतो. पुढे प्रत्येक नागपंचमीला त्या नागासाठी दुधाची वाटी आणीन, असे सांगतात.

अशा काही कवितांमधून बहिणाबाईंचे व्यक्तिगत जीवन प्रगटते. त्यांच्या कवितांमध्ये उतरलेले त्यांच्या जीवनातील वेगवेगळे अनुभव पाहता स्वतःपेक्षा इतरांना त्यांनी अधिक महत्त्व दिल्याचे जाणवते.

'बहिणाबाईंचे जीवन आणि कविता या दोन वेगळ्या नव्हेतच; त्या एकरूपच आहेत. याचा अर्थ असा की जीवनसंघर्षाकडे समंजसपणे पाहण्याची वृत्ती आणि जन्मजात प्रतिभा यांमधून अशा व्यक्तिमत्त्वाचे साहित्य फुलत जाते. बहिणाबाईंचेही असेच आहे. किंबहुना असे म्हणता येईल की दुःख हलके करण्याचा एक मार्ग म्हणजे त्यांची कविता होती. आत्माभिव्यक्तीएवढी समाधान देणारी दुसरी कोणती गोष्ट असते?'[२]



## संदर्भ :

१. किर्लोस्कर, मालती, 'बहिणाई काव्यदर्शन', बहिणाईची गाणी, बहिणाबाई चौधरी, सातवी आवृत्ती, सुचित्रा प्रकाशन, मुंबई, १९९९, प्रा.पृ. ३८.
२. कोत्तापल्ले, (डॉ.) नागनाथ, 'स्वागत', बहिणाओची गाणी : एक अभ्यास, प्रमिला भिरुड, प्रथमावृत्ती, व्यंकटेश प्रकाशन, जळगाव, २००३, पृ. २.



# बहिणाबाईंच्या सामाजिक आशयपर कविता

बहिणाबाई चौधरींचा लेवा पाटीदार हा समाज मूळचा गुजरातमधील आहे. सुमारे तीनशे वर्षांपूर्वी हा समाज तापी नदीच्या काठाकाठाने स्थलांतरीत झाला. जिथे जिथे त्यांना चांगल्या जमिनी आढळल्या, तिथे तिथे ते स्थायिक झाले. शेती हा त्यांचा मुख्य व्यवसाय. कुणबी समाजाच्या चालीरीतींशी लेवा पाटीदार समाजाच्या चालीरीती बऱ्याच प्रमाणात जुळतात. हा समाज ज्या जळगाव, धुळे जिल्ह्याच्या परिसरात स्थायिक झाला, तो प्रदेश खान्देश. पूर्व खान्देशात जळगाव, रावेर, भुसावळ, यावल, एदलाबाद, एरंडोल, अंमळनेर, चाळीसगाव इत्यादी तालुके तर पश्चिम खान्देशात धुळे, साखरी, सिंदखेड, शिरपूर, शहादे, नंदुरबार, अकराणी इत्यादी तालुके येतात. हा समाज काही प्रमाणात अमरावती, बुलढाणा, वर्धा, नागपूर, चंद्रपूर या भागातही आढळतो.

या समाजाच्या भाषेचा उल्लेख वऱ्हाडी खान्देशी किंवा अहिराणी खान्देशी असा केला जातो. वास्तविक या दोन्ही स्वतंत्र बोली आहेत. अहिराणी ही बोली गुजराती, हिंदी, मराठीचे मिश्रण असलेली तर वऱ्हाडी मराठी प्रमाणभाषेला जवळची आहे.

बहिणाबाईंची खान्देशी बोली ही तापी नदीच्या अलीकडच्या किनाऱ्यावर बोलल्या जाणाऱ्या अहिराणीशी जवळीकता साधणारी आहे.

बहिणाबाईच्या सामाजिक आशयपर कवितांचा अभ्यास करताना भौगोलिक स्थिती आणि भाषा यांची वैशिष्ट्ये लक्षात घ्यावी लागतात. त्या काळातील समाजाचे हुबेहूब प्रतिबिंब बहिणाबाईंच्या कवितेत पडलेले आहे. एकत्र कुटुंबपद्धती, शेतीचा मुख्य व्यवसाय, रीतीभाती-भाऊबंदकी, लग्नाच्या पद्धती, कष्टाचे जीवन हे सगळे त्यांच्या कवितेतून उमटते.

संसार हा काय असतो, ते समजून घ्यावे ते बहिणाबाईंकडून. सुखाला नकार आणि दुःखाला होकार देणारा हा संसार कसा आहे?

‘अरे संसार संसार<br>
जसा तवा चुल्ह्यावर<br>
आधी हाताला चटके<br>
तवा मियते भाकर!’

(‘संसार’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. ११)

मंदिराचा कळस लोट्याच्या साच्यात घालून घडवतात म्हणून त्याला लोटा म्हणू नये. ओढाळ ढोरं पळून जाऊ नये म्हणून त्यांच्या गळ्यात लोढणे

बांधतात; पण वरवधू एकमेकांना वरताना हार घालतात, याची जाणीव असली म्हणजे ते लोढणे वाटत नाही. खिरा-काकडी कापताना तोंडावरचा थोडा भाग कापून तो काकडीवर फिरवला म्हणजे कडूपणा निघून जातो, काकडी गोड लागते तसा संसार सुरुवातीला क्लेषदायक वाटला तरी नंतर तो गोड वाटू लागतो.

सागरगोट्यांच्या वेलींना वरून काटेरी फुले आणि आत मात्र चिकने सागरगोटे असतात तसा हा संसार.

'देखा संसार संसार
शेंग वरतून काटे
अरे, वरतून काटे
मधी चिक्ने सागरगोटे!'

('संसार', 'बहिणाईची गाणी', पृ. ११)

हा संसार दोन जीवांचा विचार असतो. एकमेकांसाठी दुःखाला होकार दिला आणि वैयक्तिक सुखाला नकार दिला तर संसार सुखमय होतो.

'देखा संसार संसार
दोन्ही जीवांचा सुधार
कधी नगद उधार
सुख दुःखाचा बेपार!'

('संसार', 'बहिणाईची गाणी', पृ. १२)

असे हे संसारी जीवन. त्यात सुखदुःखांचा नगद-उधारीचा व्यापार सुरू असतो. जीवनातील अडीअडचणींना न घाबरता दुःखाला सामोरे जाऊन सुखाचा शोध घेतला पाहिजे, कटुत्व दूर करून गोडवा चाखण्याचा प्रयत्न केला पाहिजे, हा मंत्र त्यांनी दिला आहे.

संसाराची वाट कशी बिकट आहे, हे त्यांच्या 'वाटच्या वाटसरा' या कवितेतूनही जाणवते.

'वाटच्या वाटसरा, वाट बिकट मोठी
नशिबी दगड गोटे, काट्याकुट्याचा धनी
पायाले लागे ठेचा, आलं डोयाले पानी'

('वाटच्या वाटसरा', 'बहिणाईची गाणी', पृ. २४)

पण जीवनाची वाटचाल करणाऱ्या या वाटसराला त्या धीर देतात, उपदेश करतात.

‘जानंच पडीन रे, तुले लोकाच्यासाठी
वाटच्या वाटसरा, वाट बिकट मोठी
दिवस ढयला रे, पाय उचल रे झट
असो नसो रे तठी, तुझ्या लाभाची गोठ’

(‘वाटच्या वाटसरा’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. २४)

जीवनात चढउतार असायचेच; पण तू आता भूतकाळाला मागे सारून पुढे चालायला हवे. तुझी जीवननौका तुलाच पार लावावी लागेल. सगळे भाऊबंद मतलबाचे धनी असतात. वाऱ्याचे ‘वाहादनं’ (वावटळ) आले तरी वाट चुकू नको. संकटाच्या दऱ्या असल्या तरी छोट्या झुडुपांना धरून घट्ट रहा.

‘वाऱ्याचं वाहादन, आलं आलं रे मोठं
त्याच्यात झुकीसनी, चुकू नको रे वाट
दोन्ही बाजूनं दऱ्या, धर झुडूप हाती
सोडू नको रे धीर, येवो संकट किती’

(‘वाटच्या वाटसरा’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. २५)

प्रतिकूल परिस्थितीतही धीराने उभे राहून संकटाचा सामना करण्याचा सल्ला त्या या ‘वाटेच्या वाटसरा’ला म्हणजे संसारी लोकांना देतात. जीवनाची लढाई लढण्याची हिंमत देतात.

तत्कालीन स्त्रीजीवनाचा आरसा म्हणून बहिणाबाईंनी रचलेल्या ‘माहेर’ आणि ‘माहेरची वाट’ ह्या दोन कविता बघाव्या लागतात. स्वतःच्या माहेरचे वर्णन त्या करतात. बापाजीच्या हवेलीचे वैभव वर्णन करतात.

‘बापाजीच्या हायलीत
येती शेट शेतकरी
दारी खेटराची रास
घरी भरली कचेरी’

(‘माहेर’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. ४)

बहिणाबाईंचे वडील गावचे महाजन होते. गावात त्यांचा दबदबा होता. तसेच स्वतः उन्हात तापून इतरांना आंब्याच्या सावलीप्रमाणे थंडगार सावली देणारी आई भीमाई; पण आईचे आईवडील, भाऊ सारे देवाघरी गेल्याने आपल्या आईला माहेर नाही, या जाणिवेने बहिणाबाईंचे भावनाप्रधान मन गहिवरते.

‘तुझे भाऊ देवाघरी
नही मायबाप तुले
तुले कशाचं माहेर
लागे कुलूप दाराले’

(‘माहेर’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. ४)

बहिणाबाई आपल्या भावंडांच्या सहवासातले दिवस वर्णन करतात. रस्त्यातल्या लौकी नदीचे वर्णन करतात. लौकी नदी तापी नदीप्रमाणे मोठी नाही; पण तिच्या नितळ पाण्याला अमृताची गोडी आहे. माहेरचे हे बहिणाबाईंचे प्रेम या कवितेच्या शेवटच्या ओळींनी तर बहरून गेल्यासारखे वाटते.

‘माहेरून ये निरोप
सांगे कानामंधी वारा
माझ्या माहेराच्या खेपा
‘लौकी’ नदीले इचारा!’

(‘माहेर’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. ५)

माहेरी येण्याचा निरोप सांगणारा वारा, तोही कानात सांगतो आणि किती वेळा त्या माहेरी गेल्या, हे सांगणारी लौकी नदी. निसर्गाशी भावनिक नाते साधणाऱ्या भूमिकेतून बहिणाबाई येथे जाणवतात.

मग ही माहेराची वाट कशी आहे? त्या वाटेवर त्यांना काय काय दिसते? नागवेलीचे मळे, त्यांचा मालक, त्याने कातरलेली पाने, वेचणारी मालकीण, मध्येच लागणारे आगगाडीच्या रुळांवरील फाटक; पण हे फाटक बहिणाबाईंना ‘आटक’ म्हणजे अडथळा करीत नाही, तर थांबवते.

‘माझ्या माहेराच्या वाटे
रेलवाईचे फाटूक
आगगाडीचं येनंजानं
तिले कशाची आटक?’

(‘माहेराची वाट’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. ६)

रेल्वे येण्याच्या वेळेवर रुळावर लोकांनी जाऊ नये आणि आगगाडीला आटक करणे (अडवणे) शक्य नाही, म्हणून हे फाटक लावलेले.

वाटेवरची लौकी नदी (किंवा ओढा?) वाटसरूंची तहान भागवते, तर वाटेवरची पिवळी चिकण खारी गावातील धाब्याधाब्यावर टाकली जाते. त्यामुळे

पावसापासून रक्षण होते. बकुळीचे लाकूड चुलीत, लहाडीत जाळण्यासाठी वापरले जाते. लहाड म्हणजे जमीन खणून केलेली मोठी चूल, जी लग्नवगैरे समारंभात स्वयंपाकासाठी तयार केली जाते. काही ठिकाणी त्याला 'चर खणणे' असा शब्दप्रयोगही केला जातो. अशा कितीतरी परोपकाराच्या गोष्टी या वाटेवर आढळतात!

पाण्याच्या डाबांमध्ये (डबक्यांमध्ये) डुंबणाऱ्या म्हशी पाहून बहिणाबाईंना 'वरमाई' आठवतात. रस्त्याच्या बाजूने दिसणारे उसाचे मळे. बुधवारी हा ऊस बाजारात जातो. अजूनही आसोद्याचा काळा ऊस तितकाच प्रसिद्ध आहे. रस्त्यावरील बैलगाड्यांच्या बैलांच्या गळ्यातील घुंगरांच्या किंवा घंट्यांच्या माळांचा नाद, त्याबरोबर धुरकऱ्याने बैलांना घातलेली साद, गाड्यांमध्ये भरलेली धान्यांची पोती, त्यातून गळणारे धान्य म्हणजे पाखरांची मेजवानी.

'मांघे पोत्यातून गये
गव्हा-जवारीची धार
पाखरांचा जमे बेत
दाने खाई झाले गार'

('माहेराची वाट', 'बहिणाईची गाणी', पृ. ७)

मनसोक्त धान्य या पाखरांना खायला मिळते. भिकारी आला तर त्याची झोळी धान्याने भरून जाईल. वाटेने जाणारी भिल्लीण बायजासुद्धा येणाऱ्याजाणाऱ्याला पाटीतलं कटेलं (कर्टुले- एक फळभाजी) घेण्याचा आग्रह करील.

अशी ही वाट. या वाटेने जाताना पायाला फोडही झाले तरी चालतच राहावे वाटते, अशी माहेरची ओढ. जर चालताना दगडाची ठेच लागली, तर दगडालाही वाचा फुटेल आणि तो प्रेमाने म्हणेल,

'नीट जाय मायबाई
नको करू धडपड
तुझ्याच मी माहेरच्या
वाटंवरला दगड!'

('माहेराची वाट', 'बहिणाईची गाणी', पृ. ८)

बहिणाबाईंना येताना पाहून जणू माहेरची साळुंकी भराऱ्या मारीत जाते आणि त्यांच्या आगमनाचा निरोप आईला देते.

'ऊठ ऊठ भीमामाय
काय घरात बसली
कर गुरमय रोट्या
लेक बहिनाई आली'

('माहेराची वाट', 'बहिणाईची गाणी', पृ. ८)

सर्वच सासुरवाशिणींच्या भावभावनांना वाचा फोडणारी ही कविता. दगडमाती, पशुपक्षी सगळ्यांशीच प्रेमाचे नाते जोडणाऱ्या बहिणाबाईंच्या भावनिक नात्यांची उत्तुंग झेप इथे जाणवते.

'कशाले काय म्हनू नही' ही एक संस्कारक्षम कविता. नकारात्मक भाव दूर सारून सकारात्मक बाजू मनावर ठसविणारी जीवनदृष्टी देणारी कविता.

ज्यातून कापूस उमलत नाही त्या कपाशीच्या बोंडाला काही अर्थ नसतो. माणसाचे तोंड जर हरिनाम घेत नसेल तर काय कामाचे? वाऱ्याने हलत नाही ते पान नाही, हरिनाम ऐकत नाही ते कान नाहीत. विहिरीवरचे पाट वाहत नसतील तर मळा फुलणार नाही आणि जे देवदर्शन घेत नाहीत, ते डोळे नाहीत. दानासाठी आखडतो तो हात नाही. मदतीची हाक ऐकून धावत नाही ते पाय नाहीत. श्रीकृष्णाच्या बासरीचा आवाज ऐकून जी धाव घेत नाही म्हणजेच कान्ह्याला ओळखत नाही ती गाय नाही. मुलाला पाहून पान्हा फुटत नाही, ती माय नाही.

'दुधावर आली बुरी, तिले साय म्हनू नही
जिची माया गेली सरी, तिले माय म्हनू नही'

('कशाले काय म्हनू नही', 'बहिणाईची गाणी', पृ. १०)

दुधावरची साय आणि बुरशी यातला फरक कळायला हवा. जिची मुलांप्रती माया संपली किंवा मुलांवर जी प्रेम करत नाही, ती माय ठरेल का?

उपदेशाबरोबरच समाजस्थितीचे दर्शन बहिणाबाई अशा रचनांतून घडवतात. जिथे भाव नाही ती भक्ती कामाची नाही आणि अन्यायाविषयी चीड नाही ती शक्ती कामाची नाही.

बहिणाबाईंचे 'घरोट्या'शी नाते अगदी जवळचे. अगदी समाधी अवस्थेप्रमाणे या जात्याची लयबद्ध घरघर ऐकताना अंतर्मुख होऊन त्या या घरोट्याशी, संसाराशी आणि देवाशी केव्हा हितगुज करू लागतात ते कळतही नाही.

ज्याच्यातून पीठ येते, त्याला जाते का म्हणावे? असा प्रश्न त्या करतात. या जात्याला दोन दाढा, दोन ओठ आहेत. मूठ-मूठ दाणे खाऊन त्याच्या ओठातून पीठ बाहेर पडते. मात्र त्याला ज्वारीचाच घास मिळतो. सणासुदीला गव्हाचा घास, काही वेळा बाजरीचा घास.

'अरे घरोटा घरोटा
घास माझा जवारीचा
तुले सनासुदी गहू
कधी देते बाजरीचा'

('घरोट', 'बहिणाईची गाणी', पृ. १६)

पहाटे पहाटे घरागणिक जात्याची घर घर सुरू व्हायची. गावातल्या स्त्रिया दळू लागायच्या. त्याबरोबरच त्यांच्या मुखातून ओव्याही बाहेर पडायच्या. दळणाचे कष्ट जाणवू नयेत म्हणून त्या ओव्यांचे गायन. बहिणाबाईंच्या ओव्यांमध्ये तर विचारांची पेरणीच. घरोट्यालाच त्या म्हणतात,

'अरे घरोटा घरोटा
माझे दुखता रे हात
तसं संसाराचं गानं
माझं बसते मी गात

अरे घरोटा घरोटा
तुझ्यातून पडे पिठी
तसं तसं माझं गानं
पोटातून येते होटी'

('घरोट', 'बहिणाईची गाणी', पृ. १६)

बहिणाबाईंच्या काव्यनिर्मितीचे रहस्य इथे उलगडते.

ग्रामीण भागातले स्त्री जीवन म्हणजे कष्टांचा डोंगर. जणूकाही चोवीस तास राबणारे यंत्र. सतत काम करणाऱ्या या यंत्राला उसंत नसतेच. सणासुदीला कष्टातूनही जो आनंद मिळतो, तेच एक समाधान. एक सण 'आखजी'. ह्या अक्षयतृतीयेच्या सणाला मुलींना माहेरी जाण्याची संधी मिळते. लिंबाच्या झाडाला दोर बांधून झोपाळे तयार केले जातात. माहेरवाशिणी एकत्र येतात. कामातून तात्पुरती सुटका झाल्याचा आनंद मनवतात. गौराई मांडून सजवतात. झोके, फुगडी, झिम्मा, पिंगा असे खेळ खेळतात; पण हा आनंद थोड्याच अवधीचा.

'गेला झोका गेला झोका
चालला माहेराले जी
आला झोका आला झोका
पलट सासराले जी'

('आखजी', 'बहिणाईची गाणी', पृ. ४१)

माहेरात चार दिवस विसाव्याचे; पण या माहेरवाशिणी खेळत राहतात. पुढे मृग नक्षत्र लागले की पेरण्या सुरू होतात. म्हणून शेतीची मशागत करून ठेवावी लागते. शेतीचं काम 'उद्या करू' म्हणून चालत नाही. म्हणून आखजी सरताच मैत्रिणी निरोप घेताना म्हणतात.

'सन सरे आस उरे
आखजी गेली व्हयी जी
सांग सई सांग सई
आखजी आता कही जी?'

('आखजी', 'बहिणाईची गाणी', पृ. ४२)

आता ही आखजी पुन्हा कधी येणार असा गहिवरल्या अंतःकरणाने निरोप घेणाऱ्या या सख्या बहिणाबाईंनी भावपूर्ण वर्णिल्या आहेत.

सासुरवासाचे वर्णन बहिणाबाईंच्या काव्यातही आहे. 'सासुरवाशीण' ही कविताही तत्कालीन सामाजिक स्थितीवर प्रकाश टाकते. मध्यरात्रीच कामाला सुरुवात करावी लागे. जात्यातून दळण दळणे, कोंबडे आरवताच पाणी आणण्यास जाणे, मग स्वयंपाक करणे, शेतीकामावर जाणे. बहिणाबाई येथे या सासुरवाशिणीला म्हणतात--

'ऊठ सासुरवाशीन बाई
ऊठ जानं, शेतीकामाचा किती घोर
तू गोठ्यामधलं ढोर'

('सासुरवाशीन', 'बहिणाईची गाणी', पृ. ४३)

असे ढोराप्रमाणे या सासुरवाशिणीला राबावे लागते. आणि वरून सासू कातावलेली. तिची वटवट सुरूच; पण बहिणाबाई या सासुरवाशिणीला 'पूस डोयामधले आसू' असे सांगून त्या 'घे सोशीसन घे, घालू नको वो वाद, कर माहेराची याद' अशी माहेरच्या सुखाची आठवण करून देतात. तिच्या कष्टावर, त्रासावर मायेची हळुवार फुंकर घालतात.

'पोळा' हा शेतकरी जीवनातला महत्त्वाचा सण. त्याचे वर्णन 'पोया' मध्ये बहिणाबाईंनी हुबेहूब केले आहे. बैलाचे कौतुक करण्याचा, त्याला विश्रांती देण्याचा हा दिवस. बैलांना अंघोळ घालून, शिंगे रंगवून पुरणपोळीचा नैवेद्य दाखवला जातो. घरोघरी बैलांना जेवणाची आमंत्रणे असतात. या कवितेत शेवटी बहिणाबाई एक मागणी करतात.

'कसे बैल कुदाळता, आदाबादीची आवड
वझं शिंगाले बांधता, बाशिंगाचं डोईजड
नका हेंडालू बैलाले, माझं ऐका रे जरासं
व्हते आपली हाऊस, आन बैलाले तरास'

('पोया', 'बहिणाईची गाणी', पृ. ४६)

आपल्या हौसेसाठी बैलांची स्पर्धा लावून, त्यांच्या शिंगाला ओझे बांधून त्यांना छळू नका, बहिणाबाईंची मुक्या जनावरांबद्दलची ही हळहळ मनाला चटका लावते. बैलांचे ऋण फेडण्याचा हा दिवस आहे, असे त्या सांगतात.

बहिणाबाईंच्या अशा कितीतरी कवितांतून, स्फुट ओव्यांतून तत्कालीन समाजजीवनातील चालीरीती, जीवनमान, मनोव्यापार या सगळ्यांचे दर्शन घडते. 'एखाद्या निरक्षर, अपढीक व्यक्तीने काव्य रचावे, ही घटनाच प्रथम आपल्याला अवाक् करते; पण हे आश्चर्य काही काळानंतर ओसरणार, हे उघडच आहे. ही काही ट ला ट जुळविणारी, जात्यावर बसल्यावर ओवी रचणारी सर्वसाधारण गृहिणी नव्हे. बायकांच्या जुन्या ओव्यांत कधीकधी चमकदार कल्पना असतात, नाही असे नाही. एवढ्या मर्यादित अर्थाने बहिणाईंच्या कवितेला थोरपणा मिळालेला नाही. ही काव्यरचना इतकी श्रीमंत, इतकी अर्थगर्भ, इतकी सफाईदार आणि सर्वात म्हणजे इतकी मधुर आहे की भल्याभल्यांनी तोंडात बोट घालावे आणि या बाईंच्या व्यक्तित्वाची बारव किती खोल आहे, गहिरी आहे, याबद्दल कल्पना लढवाव्यात.'[१]



## संदर्भ :

१. लोकूर, पद्मा, 'जागेपणचे स्वप्न', बहिणाईची गाणी, बहिणाबाई चौधरी, सातवी आवृत्ती, सुचित्रा प्रकाशन, मुंबई, १९९९, प्रा.पृ. ४३–४४.



# मौलिक विचारप्रधान कविता / जीवनविषयक तत्त्वज्ञानपर कविता

बहिणाबाईंच्या प्रत्येक कवितेला वैचारिक अधिष्ठान आहे. त्यांचे जीवनविषयक तत्त्वज्ञान ओळीओळीतून जाणवते. प्रत्येक कविता काहीतरी उपदेश देऊन जाते.

जीवनाचा अर्थ प्रकट करणारी कविता 'संसार'.

'अरे संसार संसार
जसा तावा चुल्ह्यावर
आधी हाताले चटके
तव्हा मियते भाकर!'

('संसार', 'बहिणाईची गाणी', पृ. ११)

सदैव सुखाची अपेक्षा करणाऱ्या माणसाला सहजासहजी सुख मिळत नसते, असे बहिणाबाई सांगतात. हाताला चटके बसतात तेव्हा चुलीवरची भाकर तयार होते आणि खायला मिळते. तद्वत जीवनात कष्टाशिवाय सुख प्राप्त होत नाही.

ज्यांना हा संसार खोटा वाटतो, मिथ्या वाटतो, त्यांना बहिणाबाई सांगतात,

'अरे संसार संसार
खोटा कधी म्हनू नही
राऊळाच्या कयसाले
लोटा कधी म्हनू नही'

('संसार', 'बहिणाईची गाणी', पृ. ११)

मंदिरावरील कळसाला जसे आपण लोटा म्हणत नाही, त्याप्रमाणे संसाराला मिथ्या म्हणू नये. संसार हा गळ्यातला रत्नहार आहे. त्याला लोढणे किंवा पायातला अडसर समजू नये.

'देखा संसार संसार
शेंग वरतून काटे
अरे, वरतून काटे
मधी चिक्ने सागरगोटे!'

('संसार', 'बहिणाईची गाणी', पृ. ११)

वर वर दुःखद वाटणारा संसार आतून अतिशय सुखावह असतो. दोन जीवांच्या विचारांनी चालणारा हा संसार कधी कधी मात्र सुखाला तो नकार देतो आणि दुःखाला जवळ करतो. बहुधा बहिणाबाईंना इथे स्वतःचे वैधव्याचे जीवन आठवत असावे.

‘ऐका संसार संसार
दोन्ही जीवांचा इचार
देतो दुःखाले होकार
अन् सुखाले नकार’

(‘संसार’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. ११)

हा संसार ‘कधी नगद उधार, सुखदुःखाचा बेपार’ असतो. जन्ममृत्यूचे चक्र फिरतच असते. संसार हा मानण्यावर असतो. सुखदुःखाच्या व्यापाराची उपमा त्या या जीवनाला देतात.

स्वाभाविक कर्माची जाणीव करून देणारी कविता ‘कशाले काय म्हनू नही’.

‘बिना कपाशीनं उले
त्याले बोंड म्हनू नही
हरी नामाईना बोले
त्याले तोंड म्हनू नही’

(‘कशाले काय म्हनू नही’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. ९)

ज्यातून कापूस निघत नाही, त्याला बोंड म्हणू नये आणि जे हरिनाम घेत नाही, इतर सारे बोलते, त्याला तोंड म्हणू नये. वाऱ्याने हलत नाही, त्याला पान म्हणू नये, हरिनाम ऐकत नाही, त्याला कान म्हणू नये. ज्या शेतात वाहणारे पाणी नाही, त्याला मळा म्हणू नये आणि जे देवाचे दर्शन घेत नाही, त्यांना डोळे म्हणू नये. भुकेल्या पोटी निजवते, तिला रात्र म्हणू नये आणि दान देताना आखडतो, त्याला हात म्हणू नये. ज्याच्यात पाणी नाही त्याला हाय (गुरांना पाण्यासाठी केलेला हौद - हाळं) म्हणू नये आणि मदतीचा धावा ऐकू येऊनही जो धावून जात नाही, त्याला पाय म्हणू नये. विहिरीतून रिकामी येते, तिला मोट म्हणू नये आणि स्वतःचीच भरती करणाऱ्याला म्हणजे स्वार्थाने जगणाऱ्याला पोट म्हणू नये.

‘नाही वळखला कान्हा
तिले गाय म्हणू नही

जिले नही फुटे पान्हा
तिले माय म्हनू नही'

('कशाले काय म्हनू नही', 'बहिणाईची गाणी', पृ. ९)

श्रीकृष्णाला ओळखत नाही ती खरी गाय नव्हे आणि लेकराला पाहून पान्हा फुटत नाही, ती माय नव्हे. वाटेवरच्या दोरीला साप म्हणू नये, तर पोटच्या पोरीला विकतो त्याला बाप म्हणू नये. दुधावर बुरी आली तर तिला साय म्हणू नये आणि जिची माया आटली तिला माय म्हणू नये.

'ज्याच्यामधी नही भाव
त्याले भक्ती म्हनू नही
ज्याच्यामधी नही चेव
त्याले शक्ती म्हनू नही'

('कशाले काय म्हनू नही', 'बहिणाईची गाणी', पृ. १०)

भाव नाही जिच्यात, तिला भक्ती म्हणू नये आणि जिच्यात चैतन्य नाही, तिला शक्ती म्हणू नये.

बहिणाबाईंची ही कविता म्हणजे एखाद्या तत्त्ववेत्त्याचे सुविचार असावेत असे वाटते. त्यांची निरीक्षणशक्ती किती सूक्ष्म आहे, त्यांचा दृष्टिकोन किती विशाल आहे, हे स्पष्ट होते.

'माझ्या जीवा' ह्या कवितेत त्या स्वतःशीच संवाद साधतात. ईश्वराच्या इच्छेनेच सर्वकाही सुरू असते, असे त्यांना वाटते.

'जीव देवानं धाडला
जल्म म्हने 'आला आला'
जव्हा आलं बोलावनं
मौत म्हने 'गेला गेला' '

('माझ्या जीवा', 'बहिणाईची गाणी', पृ. १३)

जन्ममरणाचे चक्र सतत फिरत असते. जगण्यात आणि मरण्यात किती अंतर असते?

'आला सास, गेला सास
जीवा तुझं रे तंतर
अरे जगनं-मरनं
एक सासाचं अंतर!'

('माझ्या जीवा', 'बहिणाईची गाणी', पृ. १३)

शेवटचा श्वास सोडला की खेळ संपतो. जगण्यात आणि मरण्यात केवळ एका श्वासाचे अंतर असते, असे बहिणाबाई सांगतात.

अशा ह्या क्षणभंगुर जीवनात माणसाने जगावे तर कसे?

'जग जग माझ्या जीवा
असं जगनं तोलाचं
उच्च गगनासारखं
धरत्रीच्या रे मोलाचं'

('माझ्या जीवा', 'बहिणाईची गाणी', पृ. १४)

जीवनाबद्दल किती विशाल, किती व्यापक दृष्टिकोन आहे हा बहिणाबाईंचा?

पण आज माणूस 'माणूसपण' हरवून बसला आहे, जनावर झाला आहे. 'मानूस' कवितेत त्या म्हणतात,

'मानसा मानसा
तुझी नियत बेकार
तुझ्याहून बरं
गोठ्यातलं जनावर'

('मानूस', 'बहिणाईची गाणी', पृ. ७७)

गोठ्यातल्या गाईम्हशी चारा खाऊन दूधतरी देतात; पण माणूस खाऊनपिऊन बेइमान होतो. कुत्राही धन्याशी प्रामाणिक राहतो; पण माणूस स्वार्थापोटी प्रामाणिकपणा सोडतो. शेवटी त्या दुःखी अंतःकरणाने माणसाला विचारतात,

'मानसा मानसा
कधी व्हशीन मानूस
लोभासाठी झाला
मानसाचा रे कानूस!'

('मानूस', 'बहिणाईची गाणी', पृ. ७७)

अशा वेळी बहिणाबाईंना मानवी मनाचा शोध घ्यावासा वाटतो.

'मन वढाय वढाय, उभ्या पिकातलं ढोर
किती हाकला हाकला, फिरी येतं पिकावर'

('मन', 'बहिणाईची गाणी', पृ. १८)

मानवी मनाचे एक एक पैलू त्या सादर करतात. उभ्या पिकाकडे सतत धाव घेणाऱ्या, हाकलूनही परत येणाऱ्या वढाय (ओढाळ) ढोराप्रमाणे मन असते. त्याला एखाद्या गोष्टीची ओढ लागली की त्यापासून परावृत्त करणे कठीणच!

'मन मोकाट मोकाट
त्याले ठायी ठायी वाटा
जशा वाऱ्यानं चालल्या
पान्यावऱ्हल्यारे लाटा'

('मन', 'बहिणाईची गाणी', पृ. १८)

हे मोकाट मन कुठेही धावते. जशा पाण्यावरच्या लाटा पळत असतात, तसे हे मनही पळते. ते लहरी असते. वाऱ्यावादळाप्रमाणे झेपावत राहते. त्याला रोखता येत नाही. ह्याच मनाचे आणखी एक रूप त्या प्रकट करतात.

'मन जह्यरी जह्यरी
याचं न्यारं रे तंतर
अरे, इचू, साप बरा
त्याले उतारे मंतर!'

('मन', 'बहिणाईची गाणी', पृ. १८)

विंचवाचं, सापाचं विष मंत्राद्वारे उतरवता येतं; पण मनाच्या जहरीपणावर कोणताही मंत्र चालत नाही. एखाद्याविषयी कलुषित झालेले मन सहजासहजी निर्मळ होत नाही.

हेच मन खसखशीच्या दाण्याइतके छोटे असते तर कधी आभाळात न मावण्याइतके मोठे होते. ही मनाची संकुचित आणि उदात्त प्रवृत्ती बहिणाबाई वर्णन करतात.

'मन पाखरू पाखरू
त्याची काय सांगू मात?
आता व्हतं भुईवर
गेलं गेलं आभायात'

('मन', 'बहिणाईची गाणी', पृ. १८)

पाखराप्रमाणे आकाशात भरारी मारणारे हे मन वीजेप्रमाणे चपळ असते. असे हे मन या परमेश्वराने घडवले तरी कसे?

'देवा आसं कसं मन
आसं कसं रे घडलं
कुठे जागेपनी तुले
असं सपन पडलं!'

('मन', 'बहिणाईची गाणी', पृ. १९)

मनाची ही जडणघडण परमेश्वराला जागेपणी पडलेलं जणू स्वप्नच. परमेश्वराची ही किमया त्यांना विलक्षण वाटते. मनाचे स्वरूप बहिणाबाईंनी आणखी उलगडून दाखवले आहे, ते 'हिरीताचं देनं घेनं' ह्या कवितेत.

'नको लागू जीवा
सदा मतलबापाठी
हिरीताचं देनं घेनं
नही पोटासाठी'

('हिरीताचं देनं घेनं', 'बहिणाईची गाणी', पृ. २०)

माणसाने सतत स्वार्थी विचार करू नये. शेतातल्या पिकाचे उदाहरण देताना त्या म्हणतात,

'उभे शेतामधी पिकं
ऊन वारा खात खात
तरसती कव्हा जाऊ
देवा, भुकेल्या पोटात'

('हिरीताचं देनं घेनं', 'बहिणाईची गाणी', पृ. २०)

ऊन, वारा सहन करीत शेतात उभे पीक कोणाच्या तरी पोटात जाऊन त्याची भूक शमविण्यासाठी तरसत असते. त्याचप्रमाणे माणसानेही स्वार्थ सोडावा, असे बहिणाबाईंना वाटते; पण माणूस स्वार्थाचे खोटेनाटे व्यवहार सोडत नाही, असे त्यांच्या कवितेतून जाणवते.

'पाहीसनी रे लोकाचे
यवहार खोटेनाटे
तव्हा बोरी बाभयीच्या
आले आंगावर काटे'

('हिरीताचं देनं घेनं', 'बहिणाईची गाणी', पृ. २०)

बोरीबाभळीच्या अंगावर आलेले काटे हे माणसांचे खोटेनाटे व्यवहार किंवा त्यांची भयानक कृत्ये पाहून आलेले आहेत. याच काट्यांचा उपयोग

शेताभोवती कुंपण म्हणून होतो. काटेही परोपकारी होतात; पण माणूस स्वार्थ सोडत नाही. शेवटी त्या म्हणतात,

‘गेली देही निंधीसनी
नाव रे शेवटी
नको लागू जीवा
सदा मतलबापाठी’

(‘हिरीताचं देनं घेनं’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. २०)

शेवटी हा नश्वर देह जगातून निघून जातो. माणसाने चांगली कामे केली असतील तर मृत्यूनंतरही त्याला कोणी विसरणार नाही; म्हणून माणसाने परोपकारासाठी जगले पाहिजे, स्वार्थासाठी नाही.

सुगरण आपल्या पिलांसाठी खोपा करते. तिच्या नराला खोपा विणता येत नाही. तो गवताच्या काड्या आणून देतो. या खोप्यात सुगरणीची पिले निजतात.

‘पिलं निजली खोप्यात
जसा झुलता बंगला
तिचा पिलांमध्ये जीव
जीव झाडाले टांगला!’

(‘खोप्यामधी खोपा’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. ३७)

पिलांवर पक्षिणीची माया असते. खोप्यातील पिलांमध्ये सुगरणीचा जीव टांगला असतो. हा छोटासा पक्षी छोट्याशा चोचीने इतका सुंदर खोपा तयार करू शकतो, तर दोन हात, दहा बोटे असलेल्या माणसाचे सामर्थ्य सुगरणीपेक्षा अधिकच असायला हवे ना?

‘तिची उलूशीच चोच
तेच दात, तेच ओठ
तुले देले रे देवानं
दोन हात दहा बोट’

(‘खोप्यामधी खोपा’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. ३७)

अशी ही माणसाच्या कर्तृत्वाला जागृत करणारी ‘खोप्यामधी खोपा’ कविता.

माणसाच्या अहंकारी वृत्तीवर प्रकाश टाकणारी ‘मी कोन? (अहंकार)’ ही कविता.

'अरे मी कोन, मी कोन?
आला मानसाले ताठा
सर्व्या दुनियात आहे
माझ्याहून कोन मोठा?'

('मी कोन?', 'बहिणाईची गाणी', पृ. ८२)

या जगात माझ्याहून कोणी श्रेष्ठ नाही, असा गर्व माणूस करतो; पण -

'अरे मी कोन, मी कोन
बोले भुकेलं मीपन
तव्हा तोंडातला घास
म्हने, "तू कोन, तू कोन?" '

('मी कोन?', 'बहिणाईची गाणी', पृ. ८२)

श्रेष्ठत्वाचा टेंभा मिरवणारा माणूस भुकेने कासावीस होतो, तेव्हा तोंडातला घास श्रेष्ठ ठरतो. त्याला जेव्हा तहान लागते, तेव्हा पाण्याचा घोट श्रेष्ठ ठरतो आणि जेव्हा त्याला ठसका लागतो, तेव्हा केवळ एका श्वासापुढे त्याला अगतिक व्हावे लागते. जेव्हा माणसाला हरिनाम मुखोद्‌गत करण्याचा अहंकार होतो, तेव्हा जीभ म्हणते की तीच प्रत्यक्ष आत्मारामाचा हुंकार असते.

'अरे मी कोन, मी कोन?
माझ्या मुखी हरिनाम
"तुझ्या जिभेले इचार"
मधी बोले आत्माराम'

('मी कोन?', 'बहिणाईची गाणी', पृ. ८२)

अशा ह्या अहंकाराने मनुष्य स्वतःचेच नुकसान करून घेतो आणि स्वतःचाच नाश करून घेतो.

'अरे मी कोन, मी कोन?
मीपनाची मरिमाय
देखा इची कशी तऱ्हा
सोता सोतालेच खाय!'

('मी कोन?', 'बहिणाईची गाणी', पृ. ८२)

स्वतःच स्वतःला खाऊन टाकणाऱ्या मीपणाच्या मरिमायची ही कल्पना मानवाच्या 'मीपणा'च्या प्रवृत्तीवर चपखल बसते.

माणसाच्या जगण्याचे सार्थक जगाच्या कल्याणासाठी चंदनाप्रमाणे झिजण्यात आहे, हे सांगताना 'देव दिसला, देव कुठे?' ह्या कवितेत बहिणाबाई म्हणतात,

'सदा जगाच्या कारनी
चंदनापरी घसला
अरे सोतामधी त्याले
देव दिसला दिसला!'

('देव दिसला, देव कुठे?', 'बहिणाईची गाणी', पृ. ७६)

अशा चंदनासारख्या परोपकारी व्यक्तीच्या अंतःकरणात परमेश्वर वास करतो. दगडाला छन्नी-हातोड्याचे घाव सहन करावे लागतात, तेव्हा परमेश्वराची मूर्ती साकारते, दगडाला देवत्व प्राप्त होते. असा हा देव कुठे आहे?

'देव कुठे देव कुठे?
तुझ्या बुबुयामझार
देव कुठे देव कुठे?
आभायाच्या आरपार!'

('देव दिसला, देव कुठे?', 'बहिणाईची गाणी', पृ. ७६)

ज्याने परमेश्वराला जाणले, तो निर्गुण, निराकार परमेश्वर भक्ताच्या डोळ्यांपुढे सतत असतो आणि जो या परमेश्वरी तत्त्वाला जाणूच शकला नाही, त्याच्याकरिता देव आभाळाच्या पल्याड असतो.

शाळेचे तोंडही न पाहणाऱ्या बहिणाबाईंनी जीवनाचे प्रत्येकच अंग त्यांच्या रचनांमध्ये सुंदर रेखाटले आहे. 'तुकारामाइतकी त्यांची कविता सहज वाटते. जीवनाचे वास्तव चित्रण करणारी वाटते. म्हणजेच पतीनिधनानंतरचे दुःख ही त्यांच्या कवितेची प्राथमिक अवस्था मानली, तरी निसर्ग, उपदेशपर, कूट, विनोदी व त्यानंतर आध्यात्मिक अशी रचना त्यांनी केली असली पाहिजे. म्हणजेच त्यांच्या कवितेचा विकास व्यक्तीपासून विश्वापर्यंत झाला आहे.''

'जीवन आणि काव्य यांचा मनोज्ञ संगम बहिणाबाईंच्या काव्यात झालेला दिसून येतो. त्यांनी जीवनातच काव्य पाहिलं, टिपलं आणि काव्यातून जीवन रंगविलं. बहिणाबाईंची काव्यसरिता त्यांच्या जीवनाच्या पात्रातून वाहात होती. तिच्यात आकाश प्रतिबिंबित झालं होतं. काठावरील वस्तुमात्राचे चेहरेमोहरे तिच्यात उमटले होते. चैतन्याची लय तिला साधली होती.

सुखदुःखाचे चढउतार तिने अनुभवले होते. संवेदनक्षमता आणि प्रतिभाशक्तीनं तिचं पात्र विस्तृत बनलं होतं. श्रद्धेचं बळ तिच्या प्रवाहाला लाभलं होतं. परमेश्वराचं रूपही तिला गवसलं होतं. भक्तीचं तंत्र साध्य झालं होतं.'[२]

बहिणाबाईंच्या कितीतरी कविता मौलिक विचारप्रधान आहेत. मानवी जीवनाचा आरसा त्यांच्या प्रत्येक ओवीतून दिसतो. त्यांनी कवितेतून मांडलेले तत्त्वज्ञान थक्क करणारे आहे.



## संदर्भ :

१. यादव, स.ग., 'काव्याचा विकास', <u>निसर्गकन्या बहिणाबाई चौधरी</u>, प्रचार प्रकाशन, कोल्हापूर, पहिली आवृत्ती, १९८२, पृ. ११६.

२. भिरुड, (डॉ.) प्रमिला, 'बहिणाबाई चौधरी : एक श्रेष्ठ कवयित्री', <u>बहिणाआीची गाणी : एक अभ्यास</u>, व्यंकटेश प्रकाशन, जळगाव, प्रथमावृत्ती, २००३, पृ. २४.



*बहिणाईच्या काव्यामध्ये असे एकेक लोकोत्तर गुण आहेत की त्यांची प्रशंसा करावी, तेवढी थोडीच आहे. पहिल्या आवृत्तीच्या कवितांच्या तेजस्वी कल्पनांवर नि शैलीदार दुसऱ्या आवृत्तीत समाविष्ट केलेल्या नवीन कवितांनी सुवर्णकळस चढविला आहे! आता बहिणाईच्या या काव्यसंग्रहाने अर्वाचीन मराठी साहित्याला प्राचीन मराठी साहित्याचे वैभव आणि प्रतिष्ठा प्राप्त करून दिलेली आहे, असाच उद्याच्या टीकाकारांना निर्वाळा द्यावा लागेल!*

(अत्रे, प्रल्हाद केशव, दुसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना, **<u>बहिणाईची गाणी</u>**, बहिणाबाई चौधरी, सातवी आवृत्ती, सुचित्रा प्रकाशन, मुंबई, १९९९, प्रा.पृ. २१—२२.)

# बहिणाबाईंच्या अध्यात्मपर कविता

जीवनात केव्हा ना केव्हा प्रत्येक मनुष्य काही प्रमाणात का होईना, अध्यात्माकडे वळतोच - कधी संकटात, कधी दुःखी अवस्थेत तर कधी अत्यानंदाच्या हिंदोळ्यावर असताना.

बहिणाबाई चौधरी मानवी मनाचा वेध घेत घेत ईश्वरापर्यंत पोचतात.

'मन जह्यरी जह्यरी
याचं न्यारं रे तंतर
अरे इचू साप बरा
त्याले उतारे मंतर'

('मन', 'बहिणाईची गाणी', पृ. १८)

मानवी मनाने दंश केला तर त्याला उताराच नाही. ही अशी रचना परमेश्वराने कशी केली?

'देवा आसं कसं मन
आसं कसं रे घडलं,
कुठे जागेपनी तुले
असं सपन पडलं!'

('मन', 'बहिणाईची गाणी', पृ. १९)

प्रगाढ पंडितांनाही कोड्यात टाकणारा प्रश्न बहिणाबाई करतात. परमेश्वरी निर्मितीचे त्यांना आश्चर्य वाटते, कौतुक वाटते आणि त्या सर्वशक्तिमानापुढे त्या विनम्र होतात. 'त्यांच्या श्रद्धादर्शी कवितांमध्ये त्यांची परमेश्वरावरील असीम श्रद्धा, मानवी जीवनावरील गाढ श्रद्धा, व्यक्तीविषयक नितांत आदर, कर्मयोगावरील दृढ श्रद्धा अशा विविध स्वरूपी श्रद्धेचं दर्शन घडतं.'[१]

सर्वसामान्यांना सहज कळतील असे दृष्टांत, उदाहरणे, उपमा, रूपके, यांचा मौलिक वापर करून सगुण भक्तीबरोबरच अद्वैताचा त्या पाठपुरावा करतात. ईश्वराकडे त्या पाहतात ते श्रमिक भूमिकेतून, निसर्गाच्या प्रतिमांमधून अभिव्यक्त करत असताना व्यवहार व भक्ती यांची मोहक सांगड त्या घालतात.

त्यांच्या आध्यात्मिक रचनांमध्ये आदिमाया, माझी माय सरसोती, देव अजब गारोडी, आली पंढरीची दिंडी, विठ्ठल मंदिर, खरा देवामधी देव इत्यादी कवितांचा समावेश होतो.

## १. येडीमाय (आदिमाया)

मुळात ही आदिमायेची आरती आहे. 'माझ्या सासूबाई कै. लीलादेवी सोपानदेव चौधरी, देवपूजेच्या शेवटी 'आदिमाया' देवीची आरती म्हणून गात असत.'[२] असे सोपानदेवांच्या सूनबाई सौ. सुचित्रा चौधरी यांनी नमूद केले आहे.

संतकाव्यात संतांचे परमेश्वराशी संवाद साधणे नवीन नाही. संत तुकाराम, संत जनाबाई तर प्रसंगी प्रेमातिरेकाने किंवा उद्वेगाने परमेश्वराला शिव्याही देतात. त्यांच्या त्या जवळीकतेच्या संबंधाने, भक्तीच्या अधिकाराने त्यांचा तो संवाद असतो. बाहिणाबाई मात्र परमेश्वराचे केवळ कौतुकच करताना आढळतात. प्रसंगी कुरबूर असते; पण दोष मात्र देत नाहीत.

'आशी कशी येळी वो माये, आशी कशी येळी?
बारा गाडे काजळ कुंकू
पुरलं नही लेनं
साती समदूराचं पानी
झालं नही न्हानं.'

('येडीमाय', 'बहिणाईची गाणी', पृ. १)

हे आदिमाये, तुझे सगळे वर्तन वेड्यासारखेच. बारा गाड्यांचे काजळ कुंकू तुला पुरत नाही. सात समुद्राचे पाणीही तुझ्या न्हाण्याला अपुरे पडते, साऱ्या पृथ्वीवरचे सोनेचांदी आणूनही तुला दागिन्यांची तूट पडते. आभाळाचे विशाल चोळी-लुगडेही तुला पुरत नाही. सगळे कसे तुझे वेगळेच तंत्र.

या आदिमायेने ब्रह्मा, विष्णू, महेश या तीनही देवांना कुशीत खेळवले. इडापिडा, नवग्रह तिच्यापुढे नगण्यच. गळ्यात नररुंडाच्या माळा असणारी अचाट सामर्थ्यशाली अशी ही आदिमाय.

नशिबाचे नऊ गिऱ्हे
काय तुझ्या लेखी?
गिऱ्ह्यानाले खाईसनी
कशी झाली सुखी?

('येडीमाय', 'बहिणाईची गाणी', पृ. १)

नऊ झनासी खाऊन गेली
सहज एक्या गोष्टी
दहाव्याशी खाशीन तव्हा

कुठे राहीन सुर्ष्टी?

('येडीमाय', 'बहिणाईची गाणी', पृ. २)

बहिणाबाई म्हणतात, नऊ ग्रह तर तू खाऊन टाकलेस, दहावा ग्रह खाशील तेव्हा सृष्टी कुठे राहील कोणजाणे? म्हणजेच बहिणाबाईंना हे अनाकलनीय वाटते. येथे त्यांच्या काव्याला परतत्त्व स्पर्श जाणवतो. त्या परंपरेशी नाळ जोडतात. नवी प्रज्ञाही दिसून येते.

## २. माझी माय सरसोती

ही कविता 'बहिणाईची गाणी'च्या दुसऱ्या आवृत्तीत समाविष्ट केली गेली. चराचराशी समरस होताना, दैवी अवताराशी जवळीक साधताना व्यापक स्वरूपाची अनुभूती जाणवते.

'माझी माय सरसोती
माले शिकवते बोली
लेक बहिनाच्या मनी
किती गुपितं पेरली!'

('माझी माय सरसोती', 'बहिणाईची गाणी', पृ. ३)

बहिणाबाईंना प्रतिभेचे वरदान कुठून लाभले, तर जणू साक्षात सरस्वतीचा वरदहस्तच त्यांच्यावर आहे आणि सोबत पांडुरंगाची कृपाही.

'माझ्यासाठी पांडुरंगा
तुझं गीता-भागवत
पावसात समावतं
माटीमधी उगवतं!'

('माझी माय सरसोती', 'बहिणाईची गाणी', पृ. ३)

पांडुरंगाचे गीता-भागवत पावसात सामावून मातीत उगवते. म्हणजेच चराचरात, नैसर्गिक क्रियाप्रक्रियांमध्ये बहिणाबाईंना गीता-भागवतातील तत्त्वज्ञानाची शिकवण मिळते आणि परमेश्वराचे दर्शन घडते.

परमेश्वराची चाहूल त्यांना पानापानामधून लागते. वाऱ्याच्या झुळुकेत ती जाणीव होते. श्रीरंग (श्रीकृष्ण) आभाळात जणू रंगांची उधळण करतो. धरतीचा परिमळ फुलाफुलात जाणवतो. अशा पातळीवरील बहिणाबाईंच्या या रचनेतून त्यांनी परमेश्वराशी जवळीकता साधल्याचे जाणवते. तुकारामशिष्या

संत बहिणाबाई यांचाही असाच एक अभंग आहे. विस्तारभयास्तव येथे त्याचे विवेचन टाळले आहे.

## ३. आली पंढरीची दिंडी

या कवितेत श्री आप्पा महाराज पंढरपूरहून दिंडीसह आल्याचा उल्लेख आहे. त्यांच्या आणि इतर वारकऱ्यांच्या दर्शनाची ओढ बहिणाबाईंना आहे. ही दिंडी गावात शिरते आणि पाखंडी लोक पसार होतात. भाविकांकरिता मात्र हा आनंदाचा सोहळा असतो. वारकऱ्यांच्या दर्शनानेही पुण्य घडू शकते ही त्यांची श्रद्धा.

'आले आप्पा महाराज, चाला दर्सन घेयाले
घ्या रे हाती परसाद, लावा बुक्का कपायाले.'
('आली पंढरीची दिंडी', 'बहिणाईची गाणी', पृ. ७१)

प्रत्यक्षात पंढरपूरला जाता आले नाही, तरी या वारकऱ्यांच्या दर्शनाने संसारी लोकांना जीवन सार्थक करून घेता येईल, असे बहिणाबाई सांगतात.

'करा एवढं तरी करा रे, दुजं काय रे संसारी
देखा घडीन तुम्हाले, आज पंढरीची वारी'
('आली पंढरीची दिंडी', 'बहिणाईची गाणी', पृ. ७१)

## ४. देव अजब गारोडी

बी-बियाणं पेरल्यानंतर त्यातून कोंब येणे, त्याची होणारी वाढ, बहरणारी पिके, डुलणारी कणसे आणि गाडी भरून घरात येणारे धान्य ही सगळी परमेश्वरी किमया पाहून हा देव एक अजब गारुडी आहे, असे बहिणाबाईंना वाटते.

'धरत्रीच्या कुशीमधी
बीयबियानं निजली
वऱ्हे पसरली माटी
जशी शाल पांघरली'
('देव अजब गारोडी', 'बहिणाईची गाणी', पृ. ३१)

येथपासून तर -

'कन्से वाऱ्यानं डोलती
दाने आले गाडी गाडी

दैव गेलं रे उघडी
देव अजब गारोडी!'

('देव अजब गारोडी', 'बहिणाईची गाणी', पृ. ३१)

या शेवटच्या कडव्यापर्यंत चिमुकल्या बी पासून गाडीभर धान्याच्या राशी निर्माण होईपर्यंत बहिणाबाईंनी केलेले वर्णन त्यांच्या अफाट कल्पनाशक्तीची साक्ष देतात.

त्यांची काव्यप्रतिभा निसर्गात रमणारी असली तरी तिच्या प्रतिमासृष्टीचे मूळ धरित्रीच्या कुशीमध्ये रुजले आहे, अध्यात्माशी जुळले आहे.

'ऊन वाऱ्याशी खेयता
एका एका कोंबातून
पर्गटले दोन पान
जसे हात जोडीसन
टाया वाजवती पानं
दंग देवाच्या भजनी
जसे करती कारोन्या
होऊ दे रे आबादानी'

('देव अजब गारोडी', 'बहिणाईची गाणी', पृ. ३१)

सुरुवातीला प्रत्येक कोंबातून दोन दोन पाने प्रगटतात, जणू ते हात जोडून असतात आणि वाऱ्यामुळे जेव्हा एकमेकांवर आपटतात, तेव्हा जणू टाळ्या वाजवून देवाचे भजन करतात आणि सर्वत्र समृद्धीची प्रार्थना करतात. अशी विलक्षण कल्पनाशक्ती बहिणाबाईंजवळ होती. कर्मयोगाला प्राधान्य देणाऱ्या बहिणाबाईंची परमेश्वरावर किती नितांत श्रद्धा होती, हे या कवितेतून जाणवते.

## ५. **विठ्ठल मंदिर**

'माझं इठ्ठल मंदिर
अवघ्याचं माहेर
मधी इठ्ठल-रखुमाई
उभे इटेवर'

('विठ्ठल मंदिर', 'बहिणाईची गाणी', पृ. ७२)

सर्वांनाच माहेर वाटावे असे हे विठ्ठल-रुक्मिणी देवस्थान जुन्या जळगावात होते. माहेरची अपार माया, प्रेम, आत्मीयता, जिव्हाळा, मनाची शांती, समाधान हे सगळे या मंदिरात मिळते. या विठ्ठल मंदिराविषयी बहिणाबाईंना अभिमान आहे. या मंदिरातील टाळ-मृदंगाची धून, गहिवरलेल्या अंतःकरणांनी भाविकांचे चाललेले भजन, तुकारामांच्या अभंगात तल्लीन झालेले भक्त हे सर्व वर्णन बहिणाबाई समरसतेने करतात. भक्तीचा आनंद सर्वांनी घेण्याचे आवाहन त्या करतात.

'शेतामंधी गये घाम
हाडं मोडीसनी
आता घ्या रे हरी नाम
टाया पिटीसनी'

('विठ्ठल मंदिर', 'बहिणाईची गाणी', पृ. ७२)

पोटासाठी शेतात राबणाऱ्यांना टाळ्या वाजवून हरिनामाचा गजर करण्याचे आवाहन त्या करतात. या कवितेत ह.भ.प. झेंडुलाबुवांचा गौरवपूर्ण उल्लेख आढळतो. त्यांनीच भजनकीर्तनाची परंपरा आपल्या परिसरात सुरू केल्याचे त्या नमूद करतात.

भजन सरते पण बहिणाबाई परमेश्वरी भक्तीत तल्लीन होऊन गेलेल्या असतात, लीन झालेल्या असतात.

'आता फिरली आरती
भजन गेलं सरी
'बह्यना' देवाचिया दारी
उभी क्षनभरी'

('विठ्ठल मंदिर', 'बहिणाईची गाणी', पृ. ७३)

## ६. खरा देवामधी देव

आसुरी लोकांच्या 'कानोड' या देवतेपेक्षा विठोबाराया श्रेष्ठ असून कानोडच्या उपासकांनी तिची पूजा सोडून विठ्ठलाची उपासना करावी असे बहिणाबाई सांगतात कारण -

'अरे कानोड कानोड
सदा रुसते फुगते
आंगावरती लेयाले

सर्वे डागिने मांगते'

('खरा देवामधी देव', 'बहिणाईची गाणी', पृ. ७४)

ही रुसणारी, दागिने मागणारी हावरट देवता एकीकडे आणि भक्तांच्या मदतीला धावणारा पांडुरंग दुसरीकडे. एकनाथांसाठी त्यांच्या घरी राबणारा, चंदन घासून देणारा, सावतामाळ्याबरोबर खुरपे हातात घेऊन निंदन करणारा, बोधल्याच्या शेतात खंडी-खंडीभर धान्य पिकवणारा, महाराचे रूप घेऊन दामाजीची हुंडी चुकविणारा, कबिराचे शेले विणणारा आणि जनाबाईबरोबर दळण दळणारा. या विठ्ठलासमोरा कानोड म्हणजे निंबाची निंबोयी.

'कुठे तुझी रे कानोड
कुठे माझा रे इठोबा
कुठे निंबाची निंबोयी
कुठे 'बोरशा'चा आंबा'

('खरा देवामधी देव', 'बहिणाईची गाणी', पृ. ७४)

निंबोयी फार कडू तर बोरशाचा आंबा फार गोड. तशी विठोबा आणि कानोड यांच्यात तुलना होऊ शकत नाही. विठ्ठलावरील आत्यंतिक श्रद्धा बहिणाबाईंच्या या कवितेत जाणवते.

## ७. आप्पा महाराज

आप्पा महाराजांच्या निधनाचा उल्लेख या कवितेत आहे.

'नाम जपता जपता
'जे जे रामकृस्न हरी'
आप्पा महाराज गेले
गेले आज देवाघरी!'

('आप्पा महाराज', 'बहिणाईची गाणी', पृ. ६५)

आप्पा महाराजांचा मुलगा रामदास आणि सून सीतामाई यांच्यावर त्यांची अपार माया होती, तसेच सर्व गावातील लोकांच्या कल्याणासाठीही ते झटत होते.

'जसा पुत्र 'रामदास'
आन सून 'सीतामाई'
तसा लोकावरी जीव

मनी दुजाभाव नाही.'

('आप्पा महाराज', 'बहिणाईची गाणी', पृ. ६५)

त्यांच्या मृत्यूचे दुःख साऱ्या गावाला झाले. तुकाराम, मुक्ताबाई, जनाबाई हे जसे अमर झाले तसे आप्पा महाराज त्यांच्या कर्तृत्वामुळे त्यांच्या स्मरणात राहतील.

'तुकाराम, मुक्ता, जना,
मरीसनी रे जगले
आता कसं म्हनू तरी
आप्पा महाराज मेले?'

('आप्पा महाराज', 'बहिणाईची गाणी', पृ. ६५)

आप्पा महाराजांनी केलेली भजने, कीर्तने राम, लक्ष्मण, सीतेच्या प्रतिमांची प्रतिष्ठापना, जळगावात सुरू केलेला रथोत्सव अशा अनेक गोष्टींमुळे आप्पा महाराजांचा नावलौकिक सदैव राहिला. जळगावातला रथोत्सव दरवर्षी दहा दिवस चालतो. दहा दिवस, दहा अवतार, दहा वाहनांवर बसून आल्यावर मग मोठ्या एकादशीचा दिवस उजाडतो. हा कार्तिक महिन्यातील मोठ्या एकादशीचा उल्लेख आहे. सजविलेला रथ, रथावर चढवलेली फुले, लाखो घागरींनी शिंपडले जाणारे पाणी आणि लोकांची गर्दी असे सगळे वर्णन बहिणाबाई करतात आणि ज्यांच्यामुळे जळगावाची ही पंढरी झाली ते आप्पा महाराज इहलोक सोडून गेले, हे बहिणाबाईंना पटत नाही.

'ज्यांनी केली कार्तिकीले
'जयगावा'ची पंढरी
आप्पा महाराज गेले
गेले म्हनू कसं तरी?'

('आप्पा महाराज', 'बहिणाईची गाणी', पृ. ६७)

## ८. पर्सुराम बेलदारा!

आता पंढरपूरला जाऊ, पुढच्या वर्षी जाऊ असे म्हणत वारी पुढे ढकलणारा विटांच्या भट्टीवाला पर्सुराम. त्याला उद्देशून ही कविता बहिणाबाईंनी लिहिली.

'अरे सर्व्या जगामंधी, तुनं कधी ना देखली
अशी देख एक ईट, इठ्ठलाच्या पायाखाली

भट्टीतल्या इंटांवरी, तुझा संसाराचा रंग
तठी एका इटेवरी, देख उभा पांडुरंग!'

('पर्सुराम बेलदारा!', 'बहिणाईची गाणी', पृ. १०३)

पंढरीच्या विठोबाचे आणि त्या अलौकिक विटेचे महात्म्य बहिणाबाई पर्सुरामाला पटवून देतात. त्याने एकदा तरी त्याचे दर्शन घेण्यासाठी पंढरपूरला जावे म्हणून विनवतात.

बहिणाबाईंच्या अनेक कवितांमध्ये अध्यात्माचा स्पर्श जाणवतो. त्यांच्या विचारांना आध्यात्मिक अधिष्ठान होते. शेतात कष्ट करतानाही परमेश्वरापासून त्या दूर जाऊ शकत नाही. त्यांच्या रोजच्या जीवनाचे अविभाज्य अंग म्हणजे परमेश्वर. त्याची प्रचिती देणाऱ्या काही ओळी -

१. देवा पाऊस पाऊस, तुझ्या डोळ्यातले आसं
('आला पाऊस', 'बहिणाईची गाणी', पृ. २८)
२. पेरनी पेरनी, देवा, तुझी रे करनी
('पेरनी', 'बहिणाईची गाणी', पृ. ३०)
३. माझी कापनी कापनी, देवा तुझी रे मापनी
माझ्या दैवाची करनी, माझ्या जीवाची भरनी
('कापनी', 'बहिणाईची गाणी' पृ. ३२)
४. रगडनी रगडनी, देवा, तुझी रे घडनी
दैवा तुझी झगडनी, माझी डोये उघडनी!
('रगडनी', 'बहिणाईची गाणी', पृ. ३४)
५. देवा, माझी उपननी, तुझ्या पायी इनवनी
दैवा, तुझी सोपवनी, माझ्या जीवाची कारोनी
('उपननी', 'बहिणाईची गाणी', पृ. ३५)
६. अरे पांडुरंगा तुझी, कशी भक्ती करू सांग
तुझ्या रूपाआड येतं, सावकाराचं रे सोंग
('स्फुट ओव्या', 'बहिणाईची गाणी', पृ. ८९)
७. आता वाजव वाजव, बालकिस्ना तुझा पोवा
सांग सांग नागोबाले, माझा आयक रे धावा
('काय घडे आवगत', 'बहिणाईची गाणी', पृ. ६४)
८. सनीदेवा सनीदेवा, तुले माझा दंडवत

फेऱ्या घालते मी बापा, नको पाडू रे फेऱ्यात
('घरापासून मळ्याकडे', 'बहिणाईची गाणी', पृ. ५०)
९. देवा आसं कसं मन? आसं कसं रे घडलं?
कुठे जागेपनी तुले रे असं सपान पडलं?
('मन', 'बहिणाईची गाणी', पृ. १९)
१०. देव कुठे देव कुठे, तुझ्या बुबुयामझार
देव कुठे देव कुठे, आभायाच्या आरपार!
('देव दिसला, देव कुठे?', 'बहिणाईची गाणी', पृ. ७६)

या व्यतिरिक्त 'बहिणाईची गाणी'च्या दुसऱ्या आवृत्तीत समाविष्ट केलेली पण बऱ्याच ओव्या सुटलेली 'माझी मुक्ताई' ही एक आध्यात्मिकतेला स्पर्श करणारी कविता. ज्ञानदेवांची कथा बहिणाबाईंनी ऐकली असावी. त्यांना झालेल्या आकलनातून त्यांनी ही रचना केली असावी.

'माझी मुक्ताई मुक्ताई
दहा वर्साचं लेकरू
चांगदेव योगीयानं
तिले मानला रे गुरू'
('माझी मुक्ताई', 'बहिणाईची गाणी', पृ. ६८)

बालवयात मुक्ताबाईंनी प्राप्त केलेला आध्यात्मिक अधिकार पाहून बहिणाबाईंना त्यांचा अभिमान वाटतो. जेव्हा 'संन्याशाची पोरं' म्हणून लोक हिणवतात, तेव्हा ज्ञानदेव ताटी लावून घेतात. त्या वेळी मुक्ताईने गायलेले ताटीचे अभंग हृदयाचा ठाव घेतात.

'घेती हिरीदाचा ठाव
ऐका ताटीचे अभंग
एका एका अभंगात
उभा केला पांडुरंग'
('माझी मुक्ताई', 'बहिणाईची गाणी', पृ. ६९)

याशिवाय बहिणाबाई चौधरी यांच्या 'हिरीताचं देनं घेनं', 'मोट हाकलतो एक', 'मी कोन' या कवितांनाही अध्यात्माचा स्पर्श आहे.

संतांच्या काव्याला जाणवणारा परतत्त्व स्पर्श बहिणाबाईंच्या काव्यालाही जाणवतो. त्यांच्या काव्याचा परंपरेशी धागा जुळलेला असतो. बहिणाबाईंचे आध्यात्मिक ज्ञान किंवा संतसाहित्याची जाण मंदिरातून होणाऱ्या कीर्तन-प्रवचनातून साकार झाली असावी. त्यांना मिळालेल्या प्रतिभेच्या वरदानामुळे शब्दांना धुमारे फुटतात आणि त्यांच्या आध्यात्मिक रचना रसिकांना स्तिमित करून जातात.

'बहिणाबाई ही साधी शेतकरी, कष्टकरी स्त्री; पण तिच्या व्यक्तिमत्त्वाचा विशेष हा की ती अंधश्रद्धेच्या आहारी जात नाही. तिचे पाऊल जिथे जिथे पडते, तिथे तिथे कवयित्रीला परमेश्वराचाच साक्षात्कार घडतो. परमेश्वराचा साक्षात्कार बहिणाबाईंना संपूर्ण चराचर सृष्टीत, पक्षी-प्राण्यांच्या, झाडाझुडपांच्या हालचालीत, आभाळातील रंगपंचमीत, कोसळणाऱ्या कृपामय जलधारांत, उगवणाऱ्या धनधान्यात, रंगीबेरंगी फुलझाडांत, रसपूर्ण विविध फळांत, भन्नाट वाहणाऱ्या वाऱ्यात, माहेराच्या ओढीत, सोपानाला डंख न करणाऱ्या नागोबात, बहुरूप्याच्या सोंगात आणि आजूबाजूला विविध रंग-रूपांत वावरणाऱ्या माणसांतही घडतो. तद्वतच माणसाने केलेल्या परोपकारात, हाताला पडलेल्या घट्ट्यात आणि स्वतःच्या अंतःकरणातही बहिणाबाईंना परमेश्वराचाच साक्षात्कार घडतो.'[३]



## संदर्भ :

१. भिरूड, प्रमिला, 'श्रद्धादर्शी' कविता, <u>बहिणाअीची गाणी : एक अभ्यास</u>, प्रथमावृत्ती, व्यंकटेश प्रकाशन, जळगाव,२००३, पृ. ६४.

२. चौधरी, स्नेहलता, 'आध्यात्मिक आशयाच्या कविता', <u>भूमिकन्या बहिणाबाई चौधरी : एक चिंतन</u>, द्वितीयावृत्ती, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, २००२, पृ. ७६.

३. चिडगोपकर, (डॉ.) अलका, 'कवितेतून प्रकटणारे बहिणाबाईचे व्यक्तिमत्त्व', <u>बहिणाबाईची गाणी : एक काव्यदर्शन</u>, प्रथमावृत्ती, स्नेहवर्धन पब्लिशिंग हाऊस, पुणे, २०००, पृ. ६२.



# बहिणाबाईंच्या कवितेतील माहेर व सासर

माहेरचे नाव घेताच प्रत्येक सासुरवाशिणीच्या चेहऱ्यावर हास्य फुलणारच. माहेरची ओढ कुणाला नसते? माहेरची एकूण एक गोष्ट सासुरवाशिणीला आवडते. तिच्या बालपणीच्या आठवणी, तिथे मिळालेली माया आणि लग्नानंतर दुरावलेली माहेरची माणसे या चक्रात तिला माहेर स्वर्गापेक्षा कमी वाटत नसते. बहिणाबाईंच्या काही कवितांमध्ये माहेरचे वर्णन आहे.

'माहेर' ह्या कवितेत बहिणाबाई सुरुवातीलाच वडिलांचे वर्णन करतात, घराचे वर्णन करतात.

'गावामधी दबदबा
बाप महाजन माझा
त्याचा काटेतोल न्याव
जसा गावामधी राजा'

('माहेर', 'बहिणाईची गाणी', पृ. ४)

बाप महाजन असल्याने घरीच कचेरी भरायची. लोकांची गर्दी तर विचारूच नका!

'बापाजीच्या हायलीत
येती शेट शेतकरी
दारी खेटरांची रास
घरी भरली कचेरी'

('माहेर', 'बहिणाईची गाणी', पृ. ४)

बहिणाबाईंची आई भीमाई फारच प्रेमळ. परिस्थितीवर मात करीत स्वतः दुःख झेलत तिने सर्वांचा सांभाळ केला.

'माय भीमाई माऊली
जशी आंब्याची साऊली,
आम्हाईले केलं गार
सोता उन्हात तावली'

('माहेर', 'बहिणाईची गाणी', पृ. ४)

आईच्या मायेला आंब्याच्या सावलीची उपमा मार्मिक आहे; परंतु या आईला माहेरचं कुणीही नव्हतं.

'तुझे भाऊ देवाघरी
नही मायबाप तुले

तुले कशाचं माहेर
लागे कुलूप दाराले'

('माहेर', 'बहिणाईची गाणी', पृ. ४)

माहेरचे कुणी नसले की स्त्रीला किती वेदना होतात ते ती स्त्रीच जाणे. बहिणाबाईंना मात्र तीन भाऊ होते. शेतात मशागत करणारा 'घमा' (घनश्याम), प्रभुभक्ती करणारा 'गना' (गणपत) आणि धुळ्याला शिकायला गेलेला 'धना' (धनाजी) हेही वर्णन याच कवितेत येते. प्रथमावृत्तीच्या शेवटच्या टीपांमध्ये धनाजी जळगावला नोकरी करत असल्याची आणि मुख्याध्यापक म्हणून निवृत्त झाल्याची माहिती मिळते. अहिल्या, सीता, तुळसा आणि बहिणा अशा त्या चार बहिणी होत्या. चारही बहिणी चांगल्या घरी पडल्याचे वर्णन येते.

माणसांबरोबरच माहेरच्या वाटेचे वर्णन बहिणाबाई करतात.

'लागे पायाले चटके
रस्ता तापीसनी लाल
माझ्या माहेराची वाट
माले वाटे मखमल'

('माहेर', 'बहिणाईची गाणी', पृ. ४)

पायाला चटके जरी लागत असले तरी सासुरवाशिणीला माहेरच्या ओढीमुळे ती वाट मखमलीसारखी मऊ वाटते. लौकी नदीचे वर्णन या कवितेत येते. तापी नदीसारखे तिचे मोठे पात्र नाही; पण तिच्या पाण्याला नितळ अमृताची गोडी आहे. शेवटच्या कडव्यात बहिणाबाई म्हणतात,

'माहेरून ये निरोप
सांगे कानामंधी वारा
माझ्या माहेराच्या खेपा
'लौकी' नदीले इचारा'

('माहेर', 'बहिणाईची गाणी', पृ. ५)

माहेरी येण्याबद्दलचा निरोप कानात सांगणारा वारा आणि सासुरवाशीण कितीदा माहेरी गेली हे सांगणारी लौकी नदी, हे बहिणाबाईंचे निसर्गाशी भावनिक संवाद साधणारे कौशल्य अप्रतिम आहे.

'माहेरची वाट' या कवितेत (बहुतेक जळगावपासून) आसोद्यापर्यंतचे वर्णन आहे. कसे आहे त्यांचे माहेर –

‘रातदिन गजबज
असं खटल्याचं घर
सदा आबादी आबाद
माझं ‘आसोद’ माहेर’

(‘माहेराची वाट’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. ६)

या माहेरच्या वाटेवर नागवेलीच्या पानांचे तांडे लागलेले आहे. या तांड्यांमध्ये बारी पानं कातरतो आणि बारीण ती गोळा करते. पुढे त्या म्हणतात,

‘माझ्या माहेरच्या वाटे
रेलवाईचे फाटुक
आग्गाडीचं येनंजानं
तिले कशाची आटक?’

(‘माहेराची वाट’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. ६)

त्याच वाटेवर रेल्वेचे फाटक आहे. रेल्वेला अडवणे शक्य नाही. लोकांनी थांबावे म्हणून हे फाटक. याच मार्गावरची लौकी नदी येणाऱ्या जाणाऱ्यांची तहान भागवते. पिवळी चिकण खारी गावातील धाब्यांवर टाकली जाते. मग लागते ते बाभळीचे बन. त्याचे लाकूड चुलीत जाळण्यासाठी कामाला येते. नंतर डबक्यांमध्ये बसलेल्या म्हशी पाहून बहिणाबाईंना वरमाई आठवतात. पुढे रस्त्यांच्या बाजूला उसाचे मळे दिसतात. बुधवारच्या बाजारात त्या मळ्यांमधला ऊस विक्रीला जातो. येणाऱ्या जाणाऱ्या बैलगाड्या, घंट्याघुंगरांचा नाद, धुरकऱ्यांची साद, पोत्यातून गळणारी गहू-ज्वारीची धार आणि त्यामुळे होते पाखरांची मेजवानी -

‘मांघे पोत्यातून गये
गव्हा-जवारीची धार
पाखरांचा जमे बेत
दाने खाई झाले गार’

(‘माहेराची वाट’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. ७)

या पाखरांना मनसोक्त धान्य खायला मिळते. कोणी भिकारी या वाटेवर आला तर त्याचीही झोळी भरून जाते. असे हे आसोद्याच्या श्रीमंतीचे, दिलदारपणाचे वर्णन बहिणाबाईंच्या कवितेत येते. दुधादह्याची रेलचेल, गाई म्हशींची खिल्लारं आणि कटुले विकणारी बायजा भिल्लीणही

त्यांच्या कवितेत येते. अशा या माहेरच्या वाटेवर चालताना पायाला फोड जरी आले तरी पर्वा नसते आणि चालताना जर एखाद्या दगडाला ठेचाळली तर तिच्याबद्दल वाटणाऱ्या कळवळ्याने जणू त्या दगडाला वाचा फुटते आणि तो म्हणतो,

'नीट जाय मायबाई
नको करू धडपड
तुझ्याच मी माहेराच्या
वाटंवरला दगड'

('माहेराची वाट', 'बहिणाईची गाणी', पृ. ८)

बहिणाबाईंच्या कल्पनेची ही भरारी माहेरचा जिव्हाळा, आणि कळवळा जाणवून देते. या माहेरच्या वाटेवर बहिणाबाईंना उचकी लागायला लागते; जणू एक साळुंकी बहिणाबाईंच्या माहेरी जाऊन निरोप देते आणि त्यांच्या आईला म्हणते -

'ऊठ ऊठ भीमामाय
काय घरात बसली
कर गुरमय रोट्या
लेक बहिनाई आली'

('माहेराची वाट', 'बहिणाईची गाणी', पृ. ८)

माहेरच्या प्रेमाचा सार्थ महिमा आणि ममता बहिणाबाई वर्णन करतात. सजीव आणि निर्जीव गोष्टींशी भावनिक नाते जुळते ते फक्त माहेराचे.

अक्षय्यतृतीयेच्या (आखजीच्या) सणाला मुलींना माहेरी आणले जात असे. लिंबाच्या झाडाला दोरांचे झोके करून वेगवेगळे खेळ खेळले जायचे. गौराई मांडून सजवली जायची.

'गेला झोका गेला झोका
चालला माहेराले जी
आला झोका आला झोका
पलट सासराले जी'

('आखजी', 'बहिणाईची गाणी', पृ. ४१)

हे चार दिवस माहेरवाशिणीला विसाव्याचे असतात; पण खेळून खेळून थकवा आला तरी खेळ थांबत नाही. मे महिन्यातल्या वैशाख शुद्ध

तृतीयेला हा अक्षय्यतृतीयेचा सण येतो आणि ७ जूनला मृग नक्षत्रात पेरण्या सुरू होतात. त्यापूर्वी जमिनीची मशागत करून ठेवावी लागते. म्हणून या स्त्रीला परत सासरी परतावे लागते आणि मग -

'सन सरे आस उरे
आखजी गेली व्हयी जी
सांग सई सांग सई
आखजी आता कही जी?'

('आखजी', 'बहिणाईची गाणी', पृ. ४२)

पुन्हा आपल्या भेटी व्हाव्यात म्हणून पुढची आखजी कधी येणार, असे ह्या मैत्रिणी एकमेकींना विचारतात.

'आई' म्हटली की माया असतेच. 'कशाले काय म्हनू नही' या कवितेत बहिणाबाई म्हणतात,

'दुधावर आली बुरी
तिले साय म्हनू नही
जिची माया गेली सरी
तिले माय म्हनू नही'

('कशाले काय म्हनू नही', 'बहिणाईची गाणी', पृ. १०)

'योगी आणि सासुरवाशीण' या कवितेत तर योग्याला बहिणाबाईंनी सांगितलेले तत्त्वज्ञान फार मोलाचे आहे. माहेरचे गाणे गाणाऱ्या सासुरवाशिणीमुळे त्याच्या ध्यानात अडथळा निर्माण होतो. 'माहेर माहेर करायचं होतं, तर सासरी आलीच कशाला?' असे विचारणाऱ्या योग्याला बहिणाबाई, 'लेकीच्या माहेरासाठी माय सासरी नांदते' असे समर्पक उत्तर देतात आणि -

'देव कुठे देव कुठे
भरीसनी जो उरला
अरे उरीसनी माझ्या
माहेरात सामावला'

('योगी आणि सासुरवाशीण', 'बहिणाईची गाणी', पृ. ४१)

असा हा माहेराचा महिमा वर्णन करतात. 'आईला सोडून आलेली लेक स्वतः आई होते, तेव्हा तिला स्वतःच्या आणि मातेच्या मातृत्वाच्या आणि मातृपदाच्या 'कळा' अधिक चांगल्या समजू लागतात. नऊ महिने पोटात

वागवून एक जीव पोसून जीवातून बाहेर येणे ही एक प्रचंड अनुभूती आहे! आणि तीही स्त्री जन्माला आली की त्या जन्मदात्रीच्या डोळ्यातून एकाच वेळी प्रेमाश्रू, दुःखाश्रू नकळत येतात. लोक म्हणतात, स्त्रियाच स्त्रियांना कमी लेखतात. मुली झाल्या तर बायकांना वाईट वाटतं. ते दुःख मुलगी झाल्याबद्दल नसतं. स्त्री म्हणून ज्या ज्या अनुभूतींतून मला जावे लागले, त्या साऱ्याच अनुभूतींतून हिलाही जावे लागेल, ही करुणा त्या माऊलीच्या मनात दाटून आलेली असते. तिला काय वाटते, ते शब्दांकित करता येत नाही. म्हणून स्त्रीबद्दल तिचे स्वतःचे आणि इतरांचेही समजापेक्षा गैरसमजच जास्त. पण बहिणाबाईंना मात्र स्त्रीजीवनाचे पायाभूत तत्त्वज्ञान चांगल्यारीतीने कळले होते.'[१] ते त्यांनी योगी महाराजांना ऐकवले.

बहिणाबाईंच्या काव्यात माहेरची व्यक्तिचित्रणेही येतात. आई भीमाईचे, त्यांच्या वडिलांचे, भावाबहिर्णींचे आणि इतरही काही व्यक्तींची वर्णने त्या करतात.

सासरच्या वर्णनांमध्ये बहिणाबाईंनी काही व्यक्तिचित्रे रेखाटली आहेत त्यात त्यांच्या सासूबाईंचेही चित्रण आहे.

'हिच्या अंगामधी देव
सभावानं देवगाय
माले सासरी मियाली
जशी जल्मदाती माय!'

('काही व्यक्तिचित्रे', 'बहिणाईची गाणी', पृ. ९३)

सासूबाईंनी बहिणाबाईंवर केलेल्या अपार मायेची त्यांना जाणीव आहे. बहिणाबाईंच्या सासूबाई स्वतः दुःख झेलून सर्वांवर मायेची पाखर घालीत. त्यांना बहिणाबाई देवगाय संबोधतात. जणू सासरी मला मायच मिळाली, असेही त्या सांगतात.

सुंदर नणदेबद्दल त्या म्हणतात,

'माझी ननद 'कासाई'
हिचा लोभ सर्व्यावरी
रूप देवानं घडलं
जशी इंदराची परी'

('काही व्यक्तिचित्रे', 'बहिणाईची गाणी', पृ. ९३)

इंद्राच्या परीप्रमाणे बहिणाबाईंची नणंद सुंदर होती. चमेलीच्या फुलाप्रमाणे नाजूक होती. राजाची राणी शोभावी अशी ही कासाई.

जाऊ म्हणजेच जेठानीबद्दल वर्णन करताना त्या म्हणतात,

'माझी जेठानी 'पानाई'
कशी मनातली गोट
हिरीतात शिरीहारी
तोंडामधी हरिपाठ'

('काही व्यक्तिचित्रे', 'बहिणाईची गाणी', पृ. ९३)

पानाई बहिणाबाईंना फार जवळची होती. देवावर श्रद्धा असणारी, तोंडाने सदैव हरिपाठ म्हणणारी, सर्वांशी गोड बोलणारी पानाई. ती स्वयंपाकातही सुगरण होती. बहिणाबाईंचे जेठ सदैव परमेश्वराचे नाव घेत. त्यांच्या मनात दुजाभाव नसे. जणू ही जोडी म्हणजे विठ्ठल-रुक्मिणीचीच, अशी उपमाही त्या देतात.

सीताई ही बहिणाबाईंच्या मोठ्या जाऊची सून. तिला वाहारी असे संबोधले आहे.

'माझी वाहारी 'सीताई'
हिचं मोठं मन देखा
देल्हा देवानं सभाव
खडीसाखरेसारखा'

('काही व्यक्तिचित्रे', 'बहिणाईची गाणी', पृ. ९४)

सीताई अत्यंत रूपवान, सडपातळ, उदार, प्रेमळ, खडीसाखरेप्रमाणे गोड स्वभावाची, खूप काम करणारी, सासरच्या, माहेरच्या सर्वांवर माया करणारी, लाखात एक अशी ती माऊली होती.

बहिणाबाईंची चुलतसासू भिवराई. सासूबद्दल सुनेचे चांगले मत क्वचितच असते. त्रास, छळवाद या दृष्टीनेच या नात्यांकडे बहुधा बघितले जाते; परंतु बहिणाबाईंच्या बाबतीत निराळाच प्रत्यय येतो. सासूबाईंच्या स्वभाववैशिष्ट्याचे येथे चित्रण आहे.

'माझी सासू 'भिवराई'
कसं गमतीचं बोलनं!
हाशीसन आवघ्याचं
पोट गेलं फुटीसन

नाव ठेये आवघ्याले
करे सर्व्याची नक्कल
हासवता हासवता
शिकवते रे अक्कल!'

('काही व्यक्तिचित्रे', 'बहिणाईची गाणी', पृ. ९४)

भिवराईचे बोलणे मोठे गमतीदार. त्या सगळ्यांना हसवायच्या आणि वागण्यावर टीकाही करायच्या. सगळ्यांची नक्कल करता करता, हसवता हसवता काहीतरी शिकविण्याचा त्यांचा प्रयत्न असायचा.

बहिणाबाईंच्या रचनांमध्ये सासरच्या व्यक्तींची अशी सुंदर वर्णने असली तरी शेवटी सासुरवाशिणींना सासुरवास माहेराप्रमाणे गोड वाटत नाहीच.

सासरी गोठ्यात बांधलेल्या ढोरासारखी बहुतेक सासुरवाशिणीची अवस्था असते. मध्यरात्र सरताच जात्यावरच्या दळणाने तिचा दिवस सुरू होतो. पहाटे डोईवर घडा घेऊन पाणी आणायला जावे लागते. त्यानंतर सर्वांसाठी स्वयंपाक करताना धुराने भरलेली चूल पेटवावी लागते. ते आटोपताच तिला शेतीच्या कामावर जावे लागते आणि ढोरासारखी मेहनत करावी लागते.

'ऊठ सासुरवाशीन बाई
ऊठ जानं शेती, कामाचा किती घोर
तू गोठ्यामधलं ढोर'

('सासुरवाशीन', 'बहिणाईची गाणी', पृ. ४३)

आणि असे कष्ट करूनही तिला सुखाचे दोन शब्द ऐकायला मिळत नाहीत. तेव्हा माहेरच्या आठवांनी हे कष्टांचे दिवस पुढे रेटण्याची सूचना बहिणाबाई स्वतःसोबतच इतर सुनांनाही देतात.

'ऊठ सासुरवाशीन बाई
घे सोशीसन घे, घालू नको वो वाद
कर माहेराची याद'

('सासुरवाशीन', 'बहिणाईची गाणी', पृ. ४३)

असे हे काळजाला स्पर्श करणारे सासुरवासाचे आणि माहेरच्या निर्मळ मायेचे भांडार उलगडून दाखविणारे वर्णन आणि स्त्रीजीवनातील

माहेर-सासर या दोन्ही पैलूंमधील नातेसंबंधांची आणि जिव्हाळ्याची सुरेख विण बहिणाबाईंच्या रचनांमध्ये ठायीठायी आढळते.



## संदर्भ :


१. चौधरी, स्नेहलता, 'जीवनविषयक तत्त्वज्ञान सांगणाऱ्या कविता', भूमिकन्या बहिणाबाई चौधरी : एक चिंतन, द्वितीयावृत्ती, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, २००२, पृ. ५१.




### निवडक शब्दांचे अर्थ

| | |
|---|---|
| पंचागन - पंचांग | पयी - पळून |
| परमय - परिमळ | पव्हरा - पोहरा |
| पाऊ - तळीच्यावरील जात्याचा दगड | |
| पाट्या - टोपल्या | पात - बैलाची दावण |
| पिडायेल - दुःखी | पिसनी - पिऊन |
| पेटई - पेटवून | |
| पोखरी - धान्यावरील बोंडे काढण्याचा झाडू | |
| पोपया - पपीहा, पावशा | पोवा - पावा |
| बिरान्याची - परक्याची | बुगडी - गावठी डूल |
| बुझारा - कंजूष | बैतन - सरपण, जळण |
| बुबुय - बुबुळ | बोरशा - खान्देशातील प्रसिद्ध आंबा |
| बोंबी - बेंबी | ब्याहीसनी - भिवून |
| भयाना - बावळा, व्यवहारशून्य | |
| भिलावा - बिबा | भीमफुल - बिब्याचे गोड फळ |
| मगदिल - मशगूल, मस्त | मदन - कणसे रगडून झालेला राडा |
| मया - माया, प्रेम | मरोट - मळवट |
| माकनी - जात्याच्या पाऊवर बसविलेले सच्छिद्र लाकूड | |
| मुकन्या - निःसत्त्व बी | मेढे- खळ्याच्या मध्यभागचा खांब |
| मोगरी - रथाला लावण्याचे लाकूड, चोपणीसारखे ब्रेक | |
| मोंढा - खाली शिंगे पडलेला | |

# शेतकरी जीवनाशी निगडित कविता

बहिणाबाईंचा जन्म शेतकरी कुटुंबात झाला. शेती हा त्यांचा परंपरागत व्यवसाय होता. शेतीत कष्ट करत असताना त्यांना अनेक कविता सुचत. 'ज्या काळ्या आईवर त्यांनी अपार प्रेम केले, त्याच काळ्या आईच्या दुधावर जोपासलेल्या माणसांवरही त्यांनी प्रेम केले. बरे-वाईट, सुष्ट-दुष्ट, कुरूप-खुजी, सृजन, साधूपुरुष अशा सर्व तऱ्हेच्या माणसांबद्दल त्यांना आपुलकी वाटे. त्या माणसांनी निर्माण केलेल्या मंदिरांवर, हवेलीवर, वाड्यावरही त्यांचा जीव जडला. धरित्रीवर तर त्यांचा अमाप जीव. तिच्या संगत राहण्यात त्यांना मनस्वी आनंद. तीच त्यांची आई, सखी, देवता. त्या धरित्रीच्या लेकरांवर, बोरी-बाभळीवर, आंब्यावर, नदीवर, दगडागोट्यांवर इतकेच काय पण जनावरांवर, पाखरांवर त्यांनी जितकी माया केली, तेवढी आजपर्यंत कुणी केली नसेल."[१]

शेती निसर्गावर अवलंबून असते. शेतीची कामे वेळच्या वेळी करायला हवीत, तरच शेतातून उत्पन्न चांगले मिळते. बहिणाबाई स्वतः शेतात राबत असल्यामुळे नांगरणी, वखरणी, कापणी या कामांप्रमाणेच शेती करताना उपयोगात येणारी अवजारे, पेरले जाणारे बी-बियाणे आणि त्यातून निघणारे उत्पन्न या सगळ्यांचा उल्लेख त्यांच्या काव्यात येतो.

'शेतीची साधने', 'आला पाऊस', 'पेरनी', 'देव अजब गारोडी', 'गाडी जोडी', 'कापनी', 'रगडनी', 'खोप्यामधी खोपा', 'पोया', 'धरत्रीले दंडवत' अशा अनेक कविता कृषी जीवनाशी संबंधित आहेत.

'शेतीची साधने' या कवितेत विविध अवजारांची माहिती व महत्त्व बहिणाबाई वर्णन करतात. कोयप, वखर, नांगर, तिफन, चाहूर, सरत, मोघडा, पाभर ही सारी अवजारे त्यांच्या कवितेत आढळतात. पेरणी सरत्याने करायची. पाभराने बियाण्यांवर माती पसरायची. कोयप्याने (कोयता, विळा) कोळपणी तर वखराने वखरायचे अशी प्रत्येक अवजारांची उपयुक्तता त्या वर्णन करतात. 'तिफन तिफन, व्हय शेताचं मापन' ('शेतीची साधने', 'बहिणाईची गाणी', पृ. २६) असे एक कडवे या कवितेत आहे. यावरून शेताचे मोजमाप तिफणमध्ये केले जाते, हे लक्षात येते.

'आला पाऊस' या कवितेत पावसाचे वर्णन आहे. -

'आता उगू दे रे शेतं
आला पाऊस पाऊस

वऱ्हे येऊ दे रे रोप
आता फिटली हाऊस'

('आला पाऊस', 'बहिणाईची गाणी', पृ. २७)

पाऊस आल्यानंतर शेतकरी पेरणीची तयारी करतो.

'पेरनी पेरनी
आभायात गडगड
बरस बरस
माझ्या उरी धडधड'

('पेरनी', 'बहिणाईची गाणी', पृ. २९)

काळे ढग आणि चमकणाऱ्या विजा, होणारा गडगडाट पाहून शेतकऱ्याच्या उरात धडधडायला लागते; पण पुष्कळदा पाऊस पडत नाही. तेव्हा बहिणाबाई म्हणतात,

'पेरनी पेरनी
भीज भीज धर्ती माते
बीय बियान्याचे
भरून ठेवले पोते'

('पेरनी', 'बहिणाईची गाणी', पृ. २९)

अवघ्या जगाचे पोट भरायचे, गुराढोरांना चारा मिळावा यासाठी शेती केली जाते आणि त्यासाठी आवश्यक असतो, तो पाऊस. पाऊस पाडणारा हा देव त्यांना 'अजब गारोडी' वाटतो.शेतातल्या प्रत्येक गोष्टीमध्ये त्यांना परमेश्वर दिसू लागतो. पेरलेले बियाणे जणू धरतीच्या कुशीत निजले आहे, वरून मातीची शाल पसरली आहे, असे वर्णन त्या करतात. जेव्हा एका एका कोंबातून दोन दोन पाने उमलतात, तेव्हा ती पाने दोन्ही हात जोडून जणू परमेश्वराची प्रार्थना करतात.

'टाया वाजवती पानं
दंग देवाच्या भजनी
जसे करती कारोन्या
होऊ दे रे आबादानी'

('देव अजब गारोडी', 'बहिणाईची गाणी', पृ. ३१)

मार्गशीर्ष महिन्यातील कापणीचे वर्णन त्या 'कापनी' ह्या कवितेत करतात.

‘शेत पिवये धम्मक
आली कापनी कापनी
आता धरा रे हिंमत
इय्ये ठेवा पाजवुनी’

(‘कापनी’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. ३२)

कापणीकरिता विळे पाजवून ठेवा, शेत पिवळे धम्मक झाले आहे म्हणजे पीक चांगले आलेले आहे. गोफणी खाली ठेवून कापणी करून पीक रचून ठेवण्याची वेळ आली आहे. त्यानंतर रगडणी (मळणी) होते. ते वर्णन ‘रगडनी’ या कवितेत येते. रगडणीसाठी खळे तयार करावे लागते.

‘केला पिकाचा रे साठा
जपीसन सर्व्याआधी
शेता शिवाराचं धन
आता आलं खयामधी’

(‘रगडनी’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. ३३)

गोलाकार पसरलेल्या पातेवरून बैलांच्या पायाने रगडल्यामुळे कणसाचे दाणे बाहेर पडतात. बहिणाबाई म्हणतात,

‘पाय उचल रे बैला
कर बापा आता घाई
चालू दे रे रगडनं
तुझ्या पायाची पुन्याई’

(‘रगडनी’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. ३३)

सर्व कणसांचा भुसा होतो. या भुशातून धान्य वेगळे करण्यासाठी उफणण्याची तयारी सुरू होते. त्याचे वर्णन ‘उपननी’ ह्या कवितेत येते. पाट्या घेऊन तिव्हारीवर उभे राहावे लागते. वाऱ्याची वाट बघावी लागते.

‘चल ये रे ये रे वाऱ्या
ये रे मारोतीच्या बापा
नको देऊ रे गुंगारा
पुऱ्या झाल्या तुझ्या थापा!’

(‘उपननी’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. ३९)

वाऱ्याची विनवणी केली जाते. झाडांची पाने हलतात. मनाला उभारी येते. कामाची गती वाढते.

‘वारा आला रे झन्नाट्या
झाडं झुडपं डोलली
धरा मदनाच्या पाट्या
खाले पोखरी चालली’

(‘उपननी’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. ३९)

शेतीला पाणी देण्यासाठी विहिरीतील मोट महत्त्वाची असते. मोट ओढताना बैल उतरणीवरून उतरतात, चढतात. या मार्गाला धाव म्हटले जाते.

‘दोन्ही बैलांचं ओढणं
दोन्हीमधी ओढ एक
उतरनी-चढनीचे
नाव दोन धाव एक
मोट हाकलतो एक
जीव पोसतो कितीक?’

(‘मोट हाकलतो एक’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. ३६)

येथे बहिणाबाईच्या अनेकत्वाकडून एकत्वाकडे होणाऱ्या प्रवासाकडे आपले लक्ष वेधले जाते. मोट हाकलणारा एकच असला तरी त्याच्या कष्टांमुळे अनेकांच्या पोटापाण्याचा प्रश्न सुटतो.

काळ्या आईवरची श्रद्धा व्यक्त करणारी ‘धरत्रीले दंडवत’ ही कविता. या कवितेत बहिणाबाईंच्या माहेरच्या शेतीचे वर्णन आढळते.

‘काया काया शेतामधी
घाम जिरव जिरव
तव्हा उगल उगल
कायामधून हिरवं!’

(‘धरत्रीले दंडवत’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. १०४)

शेतीत राबल्याने काळ्या मातीतून हिरवे पीक येईल. दाणे पूर्ण भरल्यावर हिरव्याचे पिवळे सोने होईल, ही सगळी किमया धरती मातेची आहे. तिच्या मायेला सीमा नाही. या मातेवरील श्रद्धा बहिणाबाईंचा भाऊरायाही व्यक्त करतो आणि धरित्रीला दंडवत करतो. खाली वाकून मातीचा टिळा आपल्या कपाळाला लावतो.

‘अशी भाग्यवंत माय
भाऊरायाची जमीन

वाडवडिलांचं देवा
राखी ठेव रे वतन!'

('धरत्रीले दंडवत', 'बहिणाईची गाणी', पृ. १०४)

आपल्या भाऊरायाची ही जमीन आपल्या वाडवडिलांचे हे वतन असेच कायम टिकावे, असे बहिणाबाईंना वाटते.

बहिणाबाईंनी 'गाडी जोडी' ह्या कवितेत लाल रंगाच्या बैलजोडीचे आणि गाडीचे वर्णन केले आहे. बैलांचा एक रंग, एकशिंगी जोडी, त्यांचे डौलदार खांदे आणि बांधे, हरणासारखी गती हे सर्व वर्णन ह्या कवितेत येते.

'पोया' ही कविता पोळा सणाशी संबंधित आहे. या सणाला बैलांना सजविले जाते. शिंगांना शेंदूर लावून घुंगरू बांधून अंगावर झूल टाकून रेशमाचे गोंडे बांधून, पायांत पैंजण घालून मिरविले जाते. पुरणाच्या पोळीचा नैवेद्य दिला जातो. हे सगळे वर्णन करीत असताना बहिणाबाईंना बैलांच्या कष्टांची जाणीव आहे. त्यांच्या भरवशावर शेती होते आणि वर्षातून एक दिवस त्यांना पोटभर पुरणाच्या पोळ्या खाऊ घालाव्या, असे कवयित्रीला वाटते. शेवटच्या कडव्यात त्या म्हणतात,

'आज पुंजा रे बैलाले
फेडा उपकाराचं देनं
बैला, खरा तुझा सन
शेतकऱ्या तुझं रीन!'

('पोया', 'बहिणाईची गाणी', पृ. ४६)

शेती जीवनाशी संबंधित असलेली अवजारे, शेतीतील कामे आणि सणासुदींचे वर्णन बहिणाबाईंच्या कवितेत अनेक ठिकाणी आढळते. वास्तव जीवनाशी निगडित असे हे वर्णन आणि त्यांच्या कल्पनेची भरारी उत्तुंग अशीच आहे.

'काळ्या आईजवळ बसून त्यांनी आपले सुखदुःख सांगितले. खडकातून पाझरणाऱ्या निर्मळ झऱ्यासारखी त्यांनी गाणी लिहिली. त्यांचं प्रत्येक गाणं एक संसार आहे, विचार आहे, अनुभव आहे. समाजाचे विविध दर्शन त्यांनी अनुभवले. त्या अनुभवाचा ठेवा म्हणजे काव्य. येथे कल्पनेपेक्षा अनुभवाला अग्रस्थान आहे. येथे मनोरंजन नाही, तर श्रमातून फुललेली गाथा आहे, एक व्यथा आहे.'[२]



## संदर्भ :


१. संत, इंदिरा, 'निसर्गकन्या माझी बहिणाई', बहिणाईची गाणी, बहिणाबाई चौधरी, सातवी आवृत्ती, सुचित्रा प्रकाशन, मुंबई, १९९९, प्रा.पृ. २३.

२. पवार, सुनील, बहिणाबाईंची सहस्रपदरी कविता — साहित्य स्पंदन, दै. देशोन्नती, अकोला, दि. १—११—२००२, पृ. ४.




### निवडक शब्दांचे अर्थ

बिरान्याची - परक्याची
बुगडी - गावठी डूल
बुझारा - कंजूष
बैतन - सरपण, जळण
बुबुय - बुबुळ
बोरशा - खान्देशातील प्रसिद्ध आंबा
बोंबी - बेंबी
ब्याहीसनी - भिवून
भयाना - बावळा, व्यवहारशून्य
भिलावा - बिबा
भीमफुल - बिब्याचे गोड फळ
मगदिल - मशगूल, मस्त
मदन - कणसे रगडून झालेला राडा
मया - माया, प्रेम
मरोट - मळवट
माकनी - जात्याच्या पाऊवर बसविलेले सच्छिद्र लाकूड
मुकन्या - निःसत्त्व बी
मेढे- खळ्याच्या मध्यभागचा खांब
मोगरी - रथाला लावण्याचे लाकूड, चोपणीसारखे ब्रेक
मोंढा - खाली शिंगे पडलेला
यवगी - योगी
येडजाना - निरक्षर, अडाणी
येहेर - विहीर
येळी - वेडी (विराट या अर्थाने)
राकेस - राक्षस
राखोयी - राखोळी, रक्षण करणारा
लढं - मोठा खटारा
लहाड - जमीन खणून केलेली मोठी चूल
लह्यान - धार्जिणा
लावनी पडीन - लावावी लागेल
लोडगे - रोडगे

# बहिणाबाईंच्या कवितेतील सण

बहिणाबाई चौधरी यांची कविता खानदेशातील ग्रामीण जीवनाचा आरसा आहे. शहरी जीवनाच्या तुलनेत ग्रामीण जीवनात सणासुदीला फार महत्त्व असते. 'आखजी' (अक्षय्य तृतीया), 'पोया' (पोळा), 'गुढी उभारनी' (गुढी पाडवा) असे अनेक प्रकारचे सण प्रामुख्याने साजरे केले जातात. बहिणाबाई या सणांच्या साजरीकरणावर प्रकाश टाकतात.

## आखजी (अक्षय्य तृतीया) :

'आखजी' ह्या कवितेत अक्षय्यतृतीयेच्या सणाचे वर्णन आहे. लग्न होऊन सासरी गेलेल्या नवीन नवऱ्या या सणाला माहेरी येतात. या माहेरवाशिणींच्या आनंदाला उधाण येते. झाडाझाडांवर झोके बांधले जातात.

'माझा झोका माझा झोका
चालला भिरभिरी जी
माझा झोका माझा झोका
खेयतो वाऱ्यावरी जी'

('आखजी', 'बहिणाईची गाणी', पृ. ४१)

माहेरच्या या झोक्यावर खेळताना सासरी लवकरच परत जावे लागणार, याची जाणीवही त्या मुलींना असते.

'गेला झोका गेला झोका
चालला माहेराले जी
आला झोका आला झोका
पलट सासराले जी'

('आखजी', 'बहिणाईची गाणी', पृ. ४१)

साधारणतः मे महिन्यात येणाऱ्या वैशाख शुद्ध तृतीयेला हा सण असतो. सात जूनच्या मृग नक्षत्रावर पाऊस येण्यापूर्वी शेतीची मशागत करून ठेवावी लागते; म्हणून लवकरच माहेरी आलेल्या विवाहितांना सासरी जावे लागते. या सणाला झोक्याबरोबरच अन्य खेळही खेळले जातात.

'आंगनात आंगनात
खेयती पोरीसोरी जी
झाल्या दंग झाल्या दंग

गाऊनी नानापरी जी'

('आखजी', 'बहिणाईची गाणी', पृ. ४१)

'झाला सुरू झाला सुरू
पहिला माझा पिंगा जी
फुगड्यांचा फुगड्यांचा
चालला धांगडधिंगा जी'

('आखजी', 'बहिणाईची गाणी', पृ. ४२)

मुली गाण्यात दंग होतात, गीते गातात, फुगड्या खेळतात, धांगडधिंगा करतात आणि आनंदाला उधाण येते.

नंतर बहिणाबाई वर्णन करतात गौराईचे. घरोघरी गौराई मांडल्या जातात, सजवल्या जातात.

'गवराई गवराई
सजव सजवल्या जी
संगातिनी संगातिनी
बोलव बोलवल्या जी'

('आखजी', 'बहिणाईची गाणी', पृ. ४२)

मैत्रिणींना बोलावले जाते. टिपऱ्या खेळल्या जातात. टिपऱ्यांचे घुंगरू वाजू लागतात. किती खेळावे आणि किती नाही, असे मुलींना होऊन जाते.

'किती खेय किती खेय
सांगू मी काय काय जी
खेयीसनी खेयीसनी
आंबले हातपायजी'

('आखजी', 'बहिणाईची गाणी', पृ. ४२)

शेवटी हातपाय आंबून जातात. सगळ्या सख्या थकून जातात; पण खेळतच राहावेसे वाटते. शेतीची मशागत करण्याचे दिवस जवळ येतात आणि मग –

'सन सरे आस उरे
आखजी गेली व्हयी जी
सांग सई सांग सई
आखजी आता कही जी?'

('आखजी', 'बहिणाईची गाणी', पृ. ४२)

आखजीचा सण संपतो. आनंदाने नाचणे-बागडणे सरते आणि सर्व सख्या पुन्हा हा सण केव्हा येईल म्हणून विचारत एकमेकींचा निरोप घेतात.

## गुढी उभारनी :

नववर्षाच्या आगमनाच्या सणाचे वर्णन या कवितेत आहे. गुढीपाडव्यापासून सुरू होणाऱ्या नवीन वर्षात सर्वांनी एकमेकांशी प्रेमाने वागावे, गेल्या वर्षीचा राग, आळस झाडून टाकावा.

'गुढीपाडव्याचा सन
आता उभारा रे गुढी
नव्या वरसाचं देनं
सोडा मनातली आढी'

('गुढी उभारनी', 'बहिणाईची गाणी', पृ. ३९)

या सणाला पहाटे उठून, झाडझूड करून घर सजवायचे, मग गुढी उभारायची.

'अरे, उठा झाडा आंग
गुढीपाडव्याचा सन
आता आंगन झाडुनी
गेली राधी महारीन'

('गुढी उभारनी', 'बहिणाईची गाणी', पृ. ३९)

राधी महारीण आंगण झाडून गेली आहे, तेव्हा आता आळस झटकून नव्या दिवशी, नव्या उत्साहाने कामाला लागा, हा संदेश त्या देतात. या कवितेत रामनवमीचाही उल्लेख आहे.

'चैत्राच्या या उन्हामधी
जीव व्हये कासाईस
रामनाम घ्या रे आता
रामनवमीचा दिस'

('गुढी उभारनी', 'बहिणाईची गाणी', पृ. ३९)

गुढी पाडव्याला गुढी उभारली जाते, पाडली जात नाही, मग आपण 'गुढी पाडवा' का म्हणायचे? 'गुढी उभारणी' म्हटले पाहिजे.

'पडी जातो तो 'पाडवा'
करा माझी सुधारनी

आता गुढी पाडव्याले
म्हना 'गुढी उभारनी' '
('गुढी उभारनी', 'बहिणाईची गाणी', पृ. ३९)

एवढेच नव्हे तर त्या पुढे म्हणतात,

'काय लोकाचीबी तऱ्हा
जसे भांग घोटा पेल्हे
उभा जमिनीच्या मधी
आड म्हनती उभ्याले
आसं म्हनू नही कधी
जसं उभ्याले आडवा
गुढी उभारतो त्याले
कसं म्हनती पाडवा?'
('गुढी उभारनी', 'बहिणाईची गाणी', पृ. ४०)

माणसाची अवस्था भांग प्यालेल्यासारखी झाली आहे; कारण ते उभ्याला आडवा म्हणतात. म्हणून मध्ये उभ्या व्यक्तीला जसे 'आडवा' म्हणू नये, तसे गुढी उभी करण्याला 'पाडवा' म्हणू नये.

## पोया (पोळा) :

ग्रामीण जीवनात पोळ्याच्या सणाला फार महत्त्व आहे. बैलांविषयीची कृतज्ञतेची भावना व्यक्त करण्याचा हा दिवस. शेतकऱ्यांवर असलेले बैलांचे ऋण उतरविण्याचा किंवा जपण्याचा हा दिवस. या सणाला बैलांना सजवले जाते, मढवले जाते.

'आता बांधा रे तोरन
सजवा रे घरदार
करा आंघोयी बैलांच्या
लावा शिंगाले शेंदूर'
('पोया', 'बहिणाईची गाणी', पृ. ४५)

तोरणे बांधून घर सजविले जाते. बैलांना आंघोळी घालून त्यांच्या शिंगांना शेंदूर लावला जातो. गळ्यात घंटाघुंगरू बांधले जातात. माथ्यावर रेशमाचे गोंडे, पायांत पैंजण, अंगावर झुली टाकून बैलांना पुरणाच्या पोळीचा नैवेद्य दाखवला जातो.

‘उठा उठा बह्यनाई
चुले पेटवा पेटवा
आज बैलाले निवद
पुरनाच्या पोया ठेवा’

(‘पोया’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. ४५)

या बैलांसाठी जितके करता येईल, तितके शेतकरी पोळ्याच्या दिवशी करतात; कारण -

‘वढे नागर वखर
नही कष्टाले गनती
पीक शेतकऱ्या हाती
याच्या जीवावर शेती!
उभे कामाचे ढिगारे
बैल कामदार बंदा
याले कहीनाये झूल
दानाचाऱ्याचाच मिंधा’

(‘पोया’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. ४५)

या बैलांच्याच भरवशावर शेतकऱ्यांचं जीवन असल्यामुळे किमान एक दिवस तरी बैलांच्या आनंदासाठी शेतकरी हे सर्व करतात.

‘खाऊ द्या रे पोटभरी
होऊ द्यारे मगदूल
बशीसनी यायभरी
आज करू द्या बागूल’

(‘पोया’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. ४६)

आज बैलांना पोटभर खाऊ द्या, कामाला जुंपू नका, श्रद्धेने त्यांची पूजा करा; पण एक गोष्ट बहिणाबाईंना पटत नाही.

‘कसे बैल कुदाळता
आदाबादीची आवड
वझं शिंगाले बांधता
बाशिंगाचं डोईजड
नका हेंडालू बैलाले
माझं ऐका रे जरासं

व्हते आपली हाऊस
आन बैलाले तरास'

('पोया', 'बहिणाईची गाणी', पृ. ४६)

पोळा भरवला जातो, बैलांना पळवले जाते, त्यांच्या शर्यती लावल्या जातात, मखर पेटविला जातो, या गोष्टी बहिणाबाईंना पटत नाहीत. आपल्या हौसेसाठी बैलांना त्रास होतो, याची त्यांना जाणीव आहे. तेव्हा बैलांच्या ऋणांतून मुक्त होण्यासाठी त्यांना त्रास न देता हा सण साजरा केला पाहिजे.

'आता पुंजा रे बैलाले
फेडा उपकाराचं देनं
बैला, खरा तुझा सन
शेतकऱ्या तुझं रीन!'

('पोया', 'बहिणाईची गाणी', पृ. ४६)

अशा विविध सणांचे वर्णन बहिणाबाईंच्या कवितेत येते. त्यातून मौलिक संदेश मिळतात आणि त्यांच्या उच्चप्रतीच्या प्रतिभेची जाणीव होते. आजच्या पिढीला सणांचे महत्त्व आणि त्याचे स्वरूप याची जाणीवही नसते, त्या अनुषंगाने तसेच संस्कृतीची जपणूक करण्याच्या दृष्टीनेही बहिणाबाईंच्या कवितेतील सण अत्यंत महत्त्वाचे ठरतात.



*'कलावंत हा जन्मालाच यावा लागतो, तो बनविता येत नाही' या उक्तीचे मूर्तिमंत उदाहरण म्हणजे बहिणाबाई!*

(किर्लोस्कर, (डॉ.) मालती, बहिणाई काव्यदर्शन, **बहिणाईची गाणी**, बहिणाबाई चौधरी, सातवी आवृत्ती, सुचित्रा प्रकाशन, मुंबई, १९९९, प्रा.पृ. ४१.)

# बहिणाबाईंच्या कवितेतील विनोद

बहिणाबाईंची कविता संसाराची विविध चित्रे दर्शविणारी, स्वानुभवावर निर्माण झालेली आहे. त्यामुळेच त्यांच्या काव्यात विनोदाचीही हळुवार पखरण आढळते. कै. प्र.के. अत्रे यांनी बहिणाबाईंच्या काव्यातील विनोदाला त्यांच्या प्रतिभेचा चमत्कार म्हटले आहे. ते म्हणतात, 'गडकरी आणि कोल्हटकर ह्यांच्यासारख्या प्रगल्भ विनोदपंडितांना शोभेल असा कोटिबाज आणि उपरोधिक विनोद बहिणाबाईंनी आपल्या काव्यात सहज केला आहे.'[1]

बहुतेक विनोदाचे दिग्दर्शन त्यांनी आपल्या व्यक्तिचित्रात्मक कवितांमधून केले आहे. 'भिवराई', 'ठमाबाई', 'छोटा भय्या', 'लालू मिय्या', 'धुडाबोय' अशा कवितांमधून उपरोधात्मक तसेच सुभाषितवजा विनोद त्यांना सहज जमले आहेत. सासू भिवराईच्या वर्णनात त्या म्हणतात,

'नाव ठेये आवघ्याले
करे सर्व्याची नक्कल
हासवता हासवता
शिकवते रे अक्कल'

('काही व्यक्तिचित्रे', 'बहिणाईची गाणी', पृ. ९४)

हसत हसत माणसाला शाहणे करावे हा विनोदाचा हेतू येथे सफल झालेला दिसतो. बहिणाबाईंच्या बहुतेक विनोदी कवितांमधून फक्त उपरोध नाही, तर सहानुभूती आणि कारुण्याचा झराही वाहताना दिसतो. प्रत्येकच स्त्रीला आपल्या माहेरचा अभिमान असतो. माहेरच्या श्रीमंतीचे कसे वर्णन खालील काव्यात दिसते, ते पहा. त्यातही त्यांनी म्हशीला वरमाईची उपमा देऊन विनोद साधला आहे.

'माझ्या माहेरच्या वाटे
डाबा पान्याच्या लागल्या
म्हशी बसल्या पान्यात
जशा वरमाई न्हाल्या.'

('माहेराची वाट', 'बहिणाईची गाणी', पृ. ७)

तारुण्यात भांडकुदळ, शिष्ट असलेली बाईदेखील वय वाढताच तिचा स्वभाव अनुभवाने बदलतो. त्याबद्दल विनोदी शब्दात बहिणाबाई म्हणतात,

'कडू बोलता बोलता
पुढे कशी नरमली

कडू निंबोयी शेवटी
पिकीसनी गोड झाली’
(‘स्फुट ओव्या’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. ८४)

शेतीच्या उफनणीच्या वेळी वाऱ्याची खूप आवश्यकता असते. त्या वाऱ्याला ‘मारोतीच्या बापा’ म्हणून बहिणाबाईंनी विनोद साधला आहे.

‘चल ये रे ये रे वाऱ्या
ये रे मारोतीच्या बापा
नको देऊ रे गुंगारा
पुरे झाल्या तुझ्या थापा!’
(‘उपननी’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. ३५)

शाब्दिक विनोदातूनही नात्याची जवळीक आणि दुरावा त्या सहज व्यक्त करतात.

‘माय म्हनता म्हनता
होट होटालागे भिडे
आत्या म्हनता म्हनता
केवढं अंतर पडे’
(‘स्फुट ओव्या’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. ९२)

किंवा

‘नही ऐके हरिनाम
त्याले कान म्हनू नही’
‘जिले नही फुटे पान्हा
तिले माय म्हनू नही’
(‘कशाले काय म्हनू नही’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. ९)

अशा प्रकारच्या कवितांमधून बहिणाबाईंनी सार्थ वर्णन विनोदी पद्धतीने केले आहे. ‘खोकली माय’ या कवितेतून व्यक्त होणारा विनोद हृदयाला पीळ पाडणारा आहे.

जोरात वारा सुटतो त्यावेळी छोटेसे बाभळीचे पान केळीच्या मोठ्या पानाला चिडवते, असाही विनोद खालील ओळीतून वाचायला मिळतो.

‘फाट आता टराटर
नही दया तुफानाले
हाले बाभयीचं पान

बोले केयीच्या पानाले!'

('स्फुट ओव्या', 'बहिणाईची गाणी', पृ. ८४)

अशी विविध विचार व्यक्त करणारी बहिणाबाईंची विनोदी कविता मुळातून वाचणे अधिक सार्थ ठरेल. भाषा व रचना अत्यंत सोपी आणि सरळ असल्याने त्यावर अधिक भाष्य केले नाही तरी त्यांच्या कवितेतील विनोद वाचकांना सहजगत्या उलगडतो.



## संदर्भ :

१. अत्रे, प्र.के., पहिल्या आवृत्तीची प्रस्तावना, बहिणाईची गाणी, सुचित्रा प्रकाशन, मुंबई, सातवी आवृत्ती, १९९९, प्रा.पृ. १२.



### निवडक शब्दांचे अर्थ

वटका - वटवट
वढाय - ओढाळ
वाहारी - सून
शाया - शाळा
शिकायी - शिंकाळी
शिकाळजी - शिकविती
शिदोळ - गांडूळ
सगर - पायवाट
सपन - स्वप्न
सपातनी - हावभाव, अभिनय
समदूर - समुद्र
सम्रीती - श्रीमंती
सरोसती - सरस्वती
सरील - शरीर
सवादते - स्वाद घेते
सव - सवय
साकूया - साखळ्या
सायंकी - साळुंखी
सावतर - सावत्र
सास - श्वास
सूद - शुद्ध
सोंबरली - समोरील
हाय - हाळ, गुरांना पाणी पिण्यासाठी केलेला हौद
हायली - हवेली
हारास - लिलाव
हासाळतो - हासवितो
हिनई - हिणवून
हिरीत - हृदय
हुर्पाटले - जोराने पळविले
हुसणे - हेवा करणे
हेंडालणे - बैलाची शेपटी पिळून जोरात पळविणे

# बहिणाबाईंच्या कवितेतील स्त्रीजीवन

बहिणाबाईंच्या काव्यात स्त्री जीवनाचे अनेक पैलू अलगद उलगडून दाखविल्याचे पदोपदी लक्षात येते. पूर्वापार चालत आलेल्या प्रथापरंपरांमुळे आतल्याआत अडकलेल्या स्त्रीच्या भावभावनांना प्रगटीकरणाची संधी लक्ष्मीबाई टिळकांप्रमाणेच बहिणाबाईंनी आपल्या रचनांमधून साधली आहे.

स्त्रीजीवन हे माहेर आणि सासर अशा दोन बाजूंनी बांधलेले असते. कुठे सुखद गारवा तर कुठे प्रखर दुःखाच्या झळा अशी काहीशी स्थिती बऱ्याच ठिकाणी आढळते; तर कधी सुखदुःखाच्या मिश्रणांनी हे स्त्रीजीवन तशाही परिस्थितीत समाधानी असल्याचे जाणवते. बहिणाबाईंच्या कवितेतील स्त्रीजीवन सुखःदुखाच्या झुल्यावर झुलताना तर दिसतेच; पण माहेरची ओढ, सासुरवाशीण म्हणून निर्माण होणाऱ्या भावना, त्यांच्याशी संबंधित सणसमारंभ, खेळ अशा अनेक वर्णनांनीही परिपूर्ण आहे.

बहिणाबाईंच्या कवितेतील स्त्रीजीवनाचे नाते सार्वकालीन युगाशी जोडता येते. त्यांनी रेखाटलेल्या स्त्रीजीवनाच्या सीमारेषा व्यापक झालेल्या दिसतात. स्त्रीच्या आनंदालाही कुठेतरी कारुण्याची झालर असते, हे त्यांच्या कवितेने दाखवून दिले. सुखाच्या सागरात डुंबतानाही कर्तव्य आणि जबाबदाऱ्यांनी पदोपदी होणारी जाणीव समग्र स्त्रीजातीच्या हृदयाच्या उत्तुंगतेची जाणीव करून देते. यंत्रयुगात तिच्या पदरी आलेले कष्ट, त्यातही तिचे समाधान, तिची छोटी छोटी स्वप्ने, इच्छा, आकांक्षा प्रसंगी कारुण्याचा स्पर्श यांमुळे बहिणाबाईंची कविता हृदयंगम ठरते.

त्यांची रचना रोजच्या बोलभाषेतील आहे. स्त्री बोलीतील रचना, रोजच्या जीवनातील उदाहरणे यांमुळे ती स्त्रियांना आपलीशी वाटते.

पूर्वीचे स्त्रियांचे जीवन आणि आजचे स्त्रियांचे जीवन यात थोडाफार फरक पडला आहे; पण आजही ग्रामीण स्त्रीवर सर्वाधिक प्रभाव असतो तो सणांचा. सतत घरी आणि शेतात राबणारी ही स्त्री सणासुदीला हरखून जाते. अक्षय्यतृतीयेला झाडाला झोपाळा बांधून त्यावर झुलणे, मोठाल्या झोक्यांचा आनंद घेणे, वाऱ्याबरोबर स्पर्धा करणे यांत ती रमून जाते. झोका घेतानाही माहेर-सासर यांचे द्वंद्व सुरू असतेच.

‘गेला झोका गेला झोका<br>चालला माहेराले जी<br>आला झोका आला झोका

पलट सासराले जी'

('आखजी (अक्षय तृतीया)', 'बहिणाईची गाणी', पृ. ४१)

मनाचा एक कप्पा सासरी आणि एक माहेरी असतो. झोक्याने वर-खाली हलणाऱ्या फांदीप्रमाणे मनही वर-खाली होत राहते.

अंगणात झिम्मा-फुगडीसारखे खेळ खेळले जातात. गाणी म्हटली जातात. घरोघरी गौराई मांडल्या जातात. खेळ खेळतानाच शेवटी कामांची आठवण होतेच.

'चार दिस, चार दिस
इसावल्या घरात जी
आहे पुढे आहे पुढे
शेतीची मशागत जी'

('आखजी (अक्षय तृतीया)', 'बहिणाईची गाणी', पृ. ४२)

आखजी आटोपल्यावर परत आता कधी भेटी होतील, अशी मनी राहते ती हुरहूर.

'सन सरे आस उरे
आखजी गेली व्हयी जी
सांग सई सांग सई
आखजी आता कही जी?'

('आखजी (अक्षय तृतीया)', 'बहिणाईची गाणी', पृ. ४२)

सासुरवाशिणीच्या कष्टांना बहिणाबाईंनी खूप रंगवले आहे. पहाटेपासून रात्रीपर्यंत राबणारी सासुरवाशीण इतरांच्या लेखी गोठ्यातील जनावरांपेक्षा वेगळे महत्त्व नसणारी असते.

'ऊठ सासुरवाशीन बाई, ऊठ जानं शेती
कामाचा किती घोर, तू गोठ्यामधलं ढोर'

('सासुरवाशीन', 'बहिणाईची गाणी', पृ. ४३)

असे असले तरी सासरला दूषण न देण्याचा सल्लाही बहिणाबाई देतात.

'घे सोशीसन घे घालू नको वाद, कर माहेराची याद'

('सासुरवाशीन', 'बहिणाईची गाणी', पृ. ४३)

आठवणींत सासरच्या कष्टांचा विसर पडावा, असे त्या सांगतात.

माहेरात अधिक रमणारी बहिणाबाईंची लेखणी वास्तवतेपासून दूर जात नाही. शेतात राबणाऱ्या स्त्रिया श्रमपरिहारासाठी गाणी म्हणताना येणाऱ्या माहेरच्या सारख्या उल्लेखाने एका साधू महाराजांना त्रास होतो. ते म्हणतात,

'माझं माहेर माहेर
सदा गानं तुझ्या ओठी
मंग माहेरून आली
सासराले कशासाठी?'

('योगी आणि सासुरवाशीण', 'बहिणाईची गाणी', पृ. ४४)

साधूचा हा प्रश्न बहिणाबाईंना समजतो. शेतातील मातीस डोहाळे लागतात आणि मातीचे गाणे त्यांच्या ओठांवर येते. हे साधू महाराजांना काय कळणार? डोहाळे लागण्याची प्रक्रिया स्त्रीलाच समजू शकते. पोटी येणाऱ्या लेकीचे डोहाळे साधूला कळणे शक्य नाही. 'माहेरचंच कौतुक होतं तर सासरी कशाला आली?' या साधूच्या प्रश्नाचे उत्तर बहिणाबाई फारच सुंदर देतात.

'देरे देरे योग्या ध्यान,
ऐक काय मी सांगते
लेकीच्या माहेरासाठी
माय सासरी नांदते'

('योगी आणि सासुरवाशीण', 'बहिणाईची गाणी', पृ. ४४)

बहिणाबाईंच्या गाण्यांतील संवाद विलक्षण आहेत. बहिणाबाईंना आणखी काही सांगावयाचे असावे; परंतु कदाचित रचनांच्या अनुपलब्धतेमुळे ते आपल्यापर्यंत पोचू शकले नाही, ही खंत रसिक वाचकांना नेहमीच वाटत राहील.

स्त्रीजीवनाशी संबंधित बहिणाबाईंची आणखी एक अपूर्ण कविता म्हणजे 'माझी मुक्ताई'. या कवितेतल्याही बऱ्याच ओव्या सुटलेल्या आहेत. ज्ञानेश्वरांची धाकटी बहीण मुक्ताबाई हिचा बहिणाबाईंना अभिमान वाटतो. दहा वर्षांच्या या चिमुरडीला गुरू करावे असे दीर्घकाळ जगलेल्या योगी चांगदेव यांना वाटले, ही एका स्त्रीसाठी अभिमानाची बाब आहे.

'माझी मुक्ताई मुक्ताई, दहा वर्साचं लेकरू
चांगदेव योगीयानं, तिले मानला रे गुरू'

('माझी मुक्ताई', 'बहिणाईची गाणी', पृ. ६८)

'संन्याशाची पोरं' म्हणून हिणवल्या गेलेल्या ज्ञानदेवांच्या भावंडांना समाजाने छळले, विटाळात टाकले. माझे तोंड मी लोकांना कसे दाखवू, असे ज्ञानदेवांना वाटले आणि त्यांनी स्वतःला झोपडीत कोंडून घेतले. तेव्हा 'ताटी उघडा ज्ञानेश्वरा' म्हणत मुक्ताईची कविता जन्माला आली. दहा वर्षांची चिमुरडी मुक्ताई जणू ज्ञानदेवांची आई झाली आणि ओव्या म्हणू लागली. जणू पांडुरंग जागा झाला. ज्ञानदेवांच्या हृदयाचा ठाव या मुक्ताईच्या ओव्यांनी घेतला आणि त्यांना गहिवरून आले.

अशा स्त्री जीवनाच्या अनेक पैलूंना बहिणाबाईंच्या काव्यात मोलाचे स्थान प्राप्त झाले आहे. वाचकांच्या हृदयाचा ठाव घेणाऱ्या त्यांच्या कवितेत स्त्रीजीवन विपुलतेने नटलेले आहे. दुःखातही सुख शोधणारी, कारुण्याच्या झालरीतही हास्य प्रकट करणारी, स्त्री जीवनाला मनापासून रंगवणारी बहिणाबाईंची रचना वाचकांना मंत्रमुग्ध करून टाकते.



*रचनेच्या आणि भाषेच्या दृष्टीने बहिणाईचे काव्य अत्यंत आधुनिक आहे. प्रत्येक काव्यामध्ये एक संपूर्ण घटना किंवा विचार आहे. त्याचा प्रारंभ आणि अखेर परिणामाच्या दृष्टीने नाट्यात्मक व्हावा, ह्याबद्दल त्यांचा कटाक्ष आहे. शब्दांचा किंवा विचारांचा फार विस्तार न करता थोडक्यामध्ये एखादी भावना जास्तीत जास्त प्रभावाने कशी व्यक्त करता येईल, ह्याकडे त्यांनी विशेष लक्ष दिलेले आहे. ह्या दृष्टीने मराठी भाषेवरचे त्यांचे प्रभुत्व केवळ अद्भुतच म्हटले पाहिजे.*

(अत्रे, प्रल्हाद केशव, 'परिमळ' पहिल्या आवृत्तीची प्रस्तावना, **बहिणाईची गाणी**, बहिणाबाई चौधरी, सातवी आवृत्ती, सुचित्रा प्रकाशन, मुंबई, १९९९, प्रा.पृ. १३.)

# बहिणाबाईंच्या कवितेतील ग्रामीण जीवन आणि निसर्ग

बहिणाबाईंपूर्वीच्या मराठी साहित्यात स्त्रियांचे शेतीकामातील कर्तृत्व किंवा निसर्गप्रेम सहसा आढळत नाही. अक्षरओळख नसली तरी धरतीमातेने जे धन दिले, त्याचे ऋण मानण्याचे अत्यंत मौलिक काम बहिणाबाईंनी कवितेतून केले आहे. स्वतः शेतीत राबल्यामुळे त्यांच्या कवितेतील चित्र अत्यंत अस्सल आणि जिवंत उतरले आहे.

'आला पह्यला पाऊस
शिपडली भुई सारी
धरत्रीचा परमय
माझं मन गेलं भरी'

('आला पाऊस', 'बहिणाईची गाणी', पृ. २७)

'बहिणाबाईंच्या निसर्ग कवितेचा विचार करताना या वर्णनाबरोबर एक गोष्ट स्पष्ट होते, ती म्हणजे प्रत्येक कवितेच्या अखेरीस स्वतःच्या दुर्भाग्याची त्यांना जाणीव होती. आपल्या घरात कर्ता पुरुष नाही. कुटुंब, शेतीची आपल्यावर मदार आहे, म्हणून त्या जणू कवितेच्या शेवटी स्वतःच्या दुःखात मग्न होतात, असे दिसते.'[१]

'देवा पाऊस पाऊस
तुझ्या डोयातले आंस
दैवा, तुझा रे हारास
जीवा तुझी रे मिरास'

('आला पाऊस', 'बहिणाईची गाणी', पृ. २८)

बहिणाबाईंच्या निसर्गकवितेतून मानवी भावभावनांचे जसे दर्शन घडते, तसेच शेतकऱ्याच्या कष्टमय जीवनाचे आणि स्त्रीमनाचेही दर्शन घडते. निसर्गाची सात्त्विक बाजू स्पष्ट होताना वाचकाला अध्यात्माचेही दर्शन घडते. 'देव अजब गारोडी' या निसर्गकवितेतून त्यांचे तत्त्वचिंतनही दिसते. जमिनीत बी रुजल्यानंतर कोंबातून सर्वप्रथम प्रगटणारी दोन पाने त्यांना ईश्वराचे भजन करणाऱ्या टाळ्याच वाटतात.

'ऊन वाऱ्याशी खेयता
एका एका कोंबातून

पर्गटले दोन पानं
जसे हात जोडीसन'

('देव अजब गारोडी', 'बहिणाईची गाणी', पृ. ३१)

शेतीतून भरपूर पीक निघाल्यावर बहिणाबाई म्हणतात,

'कसे वाऱ्यानं डोलती
दाने आले गाडी गाडी,
दैव गेलं रे उघडी
देव अजब गारोडी'

('देव अजब गारोडी', 'बहिणाईची गाणी', पृ. ३१)

शेतामध्ये बी पेरण्यापासून अनेक प्रकारचे कष्ट केल्यानंतर खळे सारवून ठेवणे, बैलाची पात धरणे, मेंडके रोवणे अशी शेतीकामातील अनेक सुंदर वर्णने बहिणाबाईंच्या ग्रामीण कवितेत दिसतात. त्या बैलाला विनंती करतात,

'आता चाल चाल बैला
पुढे आली उपननी
वारा चालला रे वाया
कसा ठेवू मी धरूनी'

('रगडनी (मळणी)', 'बहिणाईची गाणी', पृ. ३३)

शेतकऱ्याचे जीवन जसे पावसावर अवलंबून असते, तसे बैलावरही ते अवलंबून असते. बैलाला देव मानून पोळ्याच्या सणाबद्दल त्या म्हणतात,

'आज पुंजा रे बैलाले
फेडा उपकाराचं देनं
बैला खरा तुझा सन
शेतकऱ्या तुझं रीन!'

('पोया (पोळा)', 'बहिणाईची गाणी', पृ. ४६)

ऋग्वेदकाळातही निसर्गशक्तीला देवता मानून आर्य पूजा करीत असत. सूर्य, अग्नी, वायू, वरुण, इंद्र इत्यादींचे वर्णन ऋग्वेदातही आढळते. तशीच सुंदर वर्णने बहिणाबाईंनी आपल्या कवितेत केली आहेत.

ग्रामीण जीवन आणि निसर्ग ह्यांचा अन्योन्य संबंध आहे. बहिणाबाईंच्या कविता ग्रामीण जीवनाशी संबंधित असल्याने त्यात निसर्ग ओतप्रोत भरला आहे. ग्रामीण जीवन हे साधे व सरळ असते. घरात आणि

शेतात कष्ट करणारी, कष्टानंतर थकून भागून सुखाचे दोन घास मिळवून परमेश्वराच्या चिंतनात रममाण होणारी ग्रामीण भागातील माणसे साधी, सरळ, भोळीभाबडी, ईश्वरनिष्ठ आणि निसर्गावर निस्सीम प्रेम करणारी असतात.

दारिद्र्यावस्थेत जगतानाही समाधानात जगणारी ही माणसे नेमके कशावर प्रेम करतात? त्यांच्या ह्या समाधानाचे गुपित कशात आहे? याचे उत्तर शोधण्याचा प्रयत्न केल्यास लक्षात येते की त्यांची शेती, शेतातली माती, झाडेझुडपे, उभी पिके, पिकांचा बहर, त्यांची कापणी आणि गाडी गाडी बाजारात जाणारे धान्य या सगळ्यांमध्ये ते रमून जातात. आभाळातून कोसळणाऱ्या पावसाच्या सरी आणि शेतात गळणाऱ्या त्यांच्या घामाच्या धारा यांचा सुरेख मेळ जमतो. ग्रामीण भागातील ह्या कष्टकऱ्यांचे जीवन निसर्गाच्या ऋतुचक्रावरच अवलंबून असते. निसर्गाच्या सान्निध्यात कष्ट करताना, सुखदु:खाच्या क्षणांना कुरवाळताना ग्रामीण भागात साजरे केल्या जाणाऱ्या अनेक सण, उत्सवांमध्ये ही माणसे पूर्णतः गुंतून गेलेली दिसतात. ह्या सर्वांचे वर्णन बहिणाबाईंच्या कवितेत ठायी ठायी आढळते.

'ग्रामीण जनजीवनातूनच बहरू शकेल अशी बहिणाबाईंची कविता असल्याने तिला तिच्या जन्मकाळीच पृथगात्मकता लाभलेली आहे. विशेष म्हणजे ग्रामीण काव्यरचनेचा कोणताही आदर्श दृष्टीसमोर नसूनही बहिणाबाईने अत्यंत सहजतेने, आत्मविश्वासाने व अधिकारवाणीने ही कविता लिहिली. कवितेच्या या वाटचलीत तिला संतकाव्य जसे साह्यकारी ठरले, तसेच परंपरेने चालत आलेल्या खान्देशी, वऱ्हाडी लोकगीतांचीही सोबत लाभली. ही बोली सुजाण, चिंतनशील, मनातील काव्यात्म जाणिवा व्यक्त करण्याचे सामर्थ्य संपादून सिद्ध झालेली होतीच. तिला बहिणाबाईंसारख्या तरल, संवेदनशील व चिंतनशील मनाची जोड लाभली. त्याक्षणी वऱ्हाडी, खान्देशी भाषेचे, काव्याभिव्यक्तीचे सामर्थ्य एवढे उंचावले की सामान्य रसिकांनाच नव्हे तर चोखंदळ समीक्षकांनाही तिने आपले काव्यविषयक सिद्धांत पुन्हा एकदा तपासून घेण्यास भाग पाडले. समर्थ भाषेला समर्थ प्रतिभावंत लाभताच नवनिर्मितीचा जो चमत्कार घडून येतो, त्याची प्रतीती बहिणाबाईंच्या कवितेत येऊ शकेल. बहिणाबाई काव्यलेखन करताना कोठेही अडखळत असलेल्या, शब्दांसाठी थांबलेल्या अशा दिसत नाहीत. याचे कारण त्यांचे म्हणून जे एक अनुभवविश्व होते, आणि त्या अनुभवविश्वाची म्हणून जी काही भाषा होती, ती त्यांना पूर्णतः परिचित होती; नव्हे त्यावर त्यांचे प्रभुत्वच होते, म्हणूनच त्यांच्या

कवितेच्या हातात भाषा हवी तशी वागते, आकार घेते व अर्थाभिव्यक्ती साधते. या अर्थांनी बहिणाबाई ह्या भाषाप्रभूच ठरतात.'[२]

बहिणाबाईंचे जीवन हे ग्रामीण भागातच व्यतीत झाले. त्यांची नाळ या जीवनाशी जोडली गेली होती. ग्रामीण जीवन आणि निसर्ग यांना वेगळे करून चालत नाही. त्यांच्या रचना तरी यापेक्षा वेगळ्या कशा ठरणार? 'समुद्रावर पांढरे पक्षी तरंगत राहतात, तसे हे काव्य-पक्षी मनाच्या अंतःपटलावर तरंगत राहतात. आपल्या दिव्यचक्षूंनी जीवनाचा वेध घेऊन अशी कितीतरी चित्रमय शैलीने निवेदन केलेली ही बहिणाबाईंची काव्यरचना आहे. सतत शिव-मंगलाचा शोध घेणारी 'जीवा'चे बोट धरून त्याला धीर देत, त्याला सावरत शिवाकडच्या प्रवासाला निघालेली निसर्गकन्या कवयित्री बहिणाई!'[३]



## संदर्भ :

१. यादव, (डॉ.) स.ग., बहिणाबाईचा निसर्ग, निसर्गकन्या बहिणाई चौधरी, प्रथमावृत्ती, प्रचार प्रकाशन, कोल्हापूर, १९८२, पृ. ३०.

२. चिडगोपकर, (डॉ.) अलका, लोकगीतांचा बाज, बहिणाबाईंची गाणी : एक काव्यदर्शन, प्रथमावृत्ती, स्नेहवर्धन पब्लिशिंग हाऊस, पुणे, २०००, पृ. १५–१६.

३. चौधरी, स्नेहलता, 'एक होत्या बहिणाई', भूमिकन्या बहिणाबाई चौधरी : एक चिंतन, द्वितीयावृत्ती, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, २००२, पृ. ४.



# रामदास, तुकाराम, मुक्ताई, जनाई आणि बहिणाबाई

बहिणाबाई चौधरी यांच्या काव्यात असंख्य सुभाषिते आढळतात. जीवनाकडे पाहण्याचा त्यांचा दृष्टिकोन तत्त्वज्ञान्यांनाही लाजवेल एवढा प्रगल्भ आहे. मनाचे श्लोक रचणारे समर्थ रामदास म्हणतात,

'नको रे मना, वाद हा खेदकारी ।
नको रे मना, भेद नाना विकारी ।।
नको रे मना, सीकऊं पुडिलांसी ।
अहंभाव जो राहिला तुजपाशी ।।
अहंता गुणे सर्वही दुःख होते ।
मुखे बोलिले ज्ञान ते व्यर्थ जाते ।।
सुखी राहता, सर्व सुख आहे ।
अहंता तुझी तूंचि शोधूनि पाही ।।'

समर्थांनी मनाच्या अहंभावनेचे दुःख व्यक्त केले आहे तर बहिणाबाई म्हणतात,

'मन पाखरू पाखरू
त्याची काय सांगू मात?
आता व्हतं भुईवर
गेलं गेलं आभायात'

('मन', 'बहिणाईची गाणी', पृ. १८)

असे उदात्त विचार मनाच्या श्लोकांतही प्रभावीपणे सापडत नाहीत. रामदासांच्या तुलनेने बहिणाबाईंची भाषा अत्यंत सोपी आहे. जनसामान्यांना सहज आकलन होणारी आहे. मनाचे जहरीपणही त्यांनी मांडले आहे. त्या ईश्वराला थेट विचारतात,

'देवा आसं कसं मन
आसं कसं रे घडलं?
कुठे जागेपनी तुले
असं सपन पडलं!'

('मन', 'बहिणाईची गाणी', पृ. १९)

'हे मानवी मन म्हणजे ईश्वराचे जागेपणीचे स्वप्न' ही बहिणाबाईंची कल्पना अत्युच्च दर्जाची असून पंडितांनाही चकित करणारी आहे. रामदासांनी मनाला केलेला उपदेश आणि बहिणाबाईंनी केलेला मानवी मनाचा विचार यांत फरक इतकाच की रामदास एक धर्मसंस्थापक वाटतात, तर बहिणाबाई एक अडाणी पापभिरू वृत्तीची स्त्री असल्याचे जाणवते. आचार्य अत्रे म्हणतात, 'समर्थांनी मनावर श्लोकांचा एवढा डोंगर रचून ठेवला आहे पण..... भाषेचा अन् विचारांचा हृदयंगम मासला 'मनाच्या श्लोका'त कुठे आढळून येईल काय?'[१]

संत तुकारामांच्या अभंगात भारतीयांच्या जीवनमूल्यांना विशेष स्थान आहे. त्यांचे अभंग म्हणजे विश्वाचा जणू शांतीपाठच! बहिणाबाईंची गीते म्हणजे जीवनाचे अत्युच्च दर्शन होय. तुकारामांनी अभंग लिहिलेच नाहीत, तर ते अभंग जगले. बहिणाबाईंचे गाणे तुकोबांच्या भूमिकेपेक्षा वेगळे नाही. पहाटे जात्यावर दळण्यापासून रात्री झोपेपर्यंत बहिणाबाईंची कवितानिर्मिती सुरू असायची. तुकारामांप्रमाणे समाजातील सुखदुःखे, भावभावना त्यांच्या रचनांमधून प्रकटल्या आहेत. त्या विश्वव्यापक दर्शन घडवितात.

तुकारामांना जशी व्याकरणाची जाणीव नाही, तशीच निरक्षर बहिणाबाईंनाही त्याची तमा नव्हती. 'कविता म्हणजे काही व्याकरण नव्हे. 'काना, मात्रा, वायाविण तुका म्हणे बिंदुली' काना, मात्रा, अनुस्वार यांची जाणीव जसे तुकाराम ठेवत नाहीत, उपमा आणि अलंकाराने तो जीवनाचे तत्त्वज्ञान कथन करतात,तसेच बहिणाबाईंचे नाते आहे. जीवनाचे तत्त्वज्ञान व्यवहारी संकेतातूनच त्या बोलत राहतात.'[२]

संत साहित्याचा अभ्यास करताना विद्युल्लतेची उपमा दिल्या गेलेल्या मुक्ताईच्या व्यक्तिमत्त्वातील अध्यात्मिक तेजस्विता विचारात घेतली जाते, तशीच नामदेवांपुढे तिची कडाडलेली वाणीही स्मरली जाते. अध्यात्म तेजाबरोबरच आपल्यावर सहजकिरणांचा वर्षाव होतो आहे, असे बहिणाबाईच्या अध्यात्मिक कविता वाचताना जाणवते. त्यांच्या काव्यकर्तृत्वाची विशेष फडकलेली; पण तरीही दुर्लक्षित असलेली अभंगरचना उदाहरणादाखल लक्षात घ्यावी लागते.

'वात केली चिंधुकाची
तेल दियात पडलं
सापडेना आकपेटी

घोडं आठी बी आडलं'

('नही दियामधी तेल', 'बहिणाईची गाणी', पृ. ६२)

अशा कविता वाचकांना थक्क करून सोडतात. संसार करीत असतानाही प्रखर विरक्तीचा अनुभव आणून देतात. स्वतःचे आणि समाजाचे कठोर परीक्षण करतात.

सामाजिकता आणि परमार्थ यांचा संगम त्यांच्या रचनेत आढळतो.

'पहिली माझी ओवी। परतुनी पाहिले।।
दृष्टीने देखिले। निजरूप।।
दुसरी माझी ओवी। इजे नाही मनी।।
लक्ष तुझे चरणी। लागियेले।।'

या मुक्ताईच्या ओवीतील जसे दिव्यपण जाणवते. तसेच बहिणाबाईंच्या

'येरे येरे माझ्या जीवा
काम पडलं अमाप,
काम करता करता
देख देवाजीचं रूप'

('माझ्या जीवा', 'बहिणाईची गाणी', पृ. १३)

या ओळींतही आढळते. मुक्ताबाईंचे लक्ष देवाच्या चरणांजवळ तर बहिणाबाई काम करता करता देवाजीचे संपूर्ण रूप पाहतात. जगाचे दूषण सहन करीत जगणारी मुक्ताबाई आणि वैधव्यामुळे अगतिक जीवन जगणारी बहिणाबाई दोघींच्याही रचनेत व्याकुळता आढळते. उभयतांच्या दुःखाचा स्तर एकच आहे.

जनाबाईची कविता जशी दैनंदिन जीवनातून उमलून आली तशी बहिणाबाईंची कविताही रोजच्या जगण्यातूनच उगम पावली आहे. आपल्या दैनंदिन रूक्ष जीवनाचे त्या दोन्ही कवयित्रींनी कवितेतून सोने केले. दोघींच्याही काव्यजीवनाचा उगम त्यांच्या जीवनानुभूतीत आहे. जनाई आणि बहिणाई अशा दोघीही जगाच्या दृष्टीने अशिक्षित होत्या. जनाबाईची कविता स्वतः विठ्ठलाने लिहून ठेवली आहे, असे त्या म्हणतात तर साक्षात 'सरोसती' माझ्या मुखातून बोलते, असे बहिणाबाई म्हणतात. सोपानदेवांनी बहिणाईची कविता लिहून ठेवली नसती, तर ती आपल्यापुढे येऊ शकली नसती.

प्रतिभावंतांचे शिक्षण, भाषा, समाजातील दर्जा बघायचा नसतो. बहिणाबाई व जनाबाई यांनी आपले अनुभव त्यांना अवगत असलेल्या भाषेतून व्यक्त केले. दोघीही प्रतिभेच्या धनी होत्या. सामान्य ग्रामीण जीवन जगत होत्या. जनाबाई दासी होती तर बहिणाबाई शेतात आणि घरात अखंड राबणारी स्त्री. भारतीय पारंपरिक स्त्रीजीवनाची ती पाईक ठरते. आपल्या अवतीभवती घडणाऱ्या घटनांना, प्रसंगांना, नातेसंबंधांना त्यांनी आपल्या काव्यातून प्रकट करणाऱ्या ह्या दोघींचाही कालखंड वेगळा असला तरी विचारांत बहुतांश साधर्म्य निचितच लक्षात येते.

एकंदरीत मुक्ताबाई, जनाबाई, तुकाराम, रामदास अशी अनेक संतांच्या रचनांची नाळ बहिणाबाई चौधरींच्या रचनांशी कुठल्या ना कुठल्या दृष्टीने जोडता येते; पण वास्तविक बहिणाबाईंच्या रचनांना जो साधेपणा लाभला आहे किंवा सहज अवगत करता येईल अशी त्यांची रचना आणि रोजच्या जीवनातील विशेषतः शेतकरी वा ग्रामीण जीवनातील उदाहरणांची रेलचेल यांमुळे ती सरस वाटते.



## संदर्भ :

१. अत्रे, प्र.के., पहिल्या आवृत्तीची प्रस्तावना, बहिणाईची गाणी, सातवी आवृत्ती, सुचित्रा प्रकाशन, मुंबई, १९९९, प्रा.पृ. १०.
२. यादव, (डॉ.) स.ग., 'तुकारामाइतुकी सहजता', निसर्गकन्या बहिणाबाई चौधरी, प्रथमावृत्ती, प्रचार प्रकाशन, कोल्हापूर, १९८२, पृ. १०३.



# संत बहिणाबाई आणि बहिणाबाई चौधरी

महाराष्ट्रात बहिणाबाई चौधरींचे नाव माहीत नाही, असा एकही अभ्यासक सापडणार नाही. पण 'ज्ञानदेवे रचिला पाया, तुका झालासे कळस' ह्या वारकरी संप्रदायाच्या प्रवासाचा अभंग रचणाऱ्या संत बहिणाबाईंचे नाव मोजक्याच अभ्यासकांना माहिती आहे. संत बहिणाबाई आणि निसर्गकन्या बहिणाबाई ह्या वेगवेगळ्या आहेत, हे फार कमी लोकांना माहीत आहे.

सतराव्या शतकात संत तुकारामांच्या शिष्या म्हणून ओळखल्या जाणाऱ्या संत बहिणाबाईंच्या बाबतीत अनेक चमत्कारिक कथा प्रसिद्ध आहेत. शके १५५७ मध्ये जन्मलेल्या संत बहिणाबाईंनी आपले तेरा जन्म पुत्राला कथन केले होते आणि शके १६२२ मध्ये सांगून ठेवल्याप्रमाणे देह ठेवला.

निसर्गकन्या बहिणाबाई चौधरी यांचा जन्म इ.स. १८८० मध्ये नागपंचमीला जन्म झाला आणि १९५१ साली ३ डिसेंबरला विनोबांची गीताई श्रवण करीत असताना त्यांनी प्राण त्यागला.

दोन्ही कवयित्रींचा कालखंड, पार्श्वभूमी, परिस्थिती पूर्णतः वेगळी असली तरी आध्यात्मिक अनुभूतीमुळे काहीसे साम्य आढळते.

तुकोबांनी स्वप्नात येऊन आशीर्वाद दिला. कपाळाला स्पर्श केला आणि संत बहिणाबाईंच्या रचना फुलल्या. बहिणाबाई चौधरींनी प्रवचन, कीर्तनाच्या श्रवणातून, परमेश्वराच्या भक्तीत तल्लीन होऊन जीवनानुभूतीतून काव्यरचना केली. 'माझी माय सरसोती, माले शिकवते बोली' असे त्या सांगत. त्यांची गाणी संतसामान्यांना समजेल अशा सोप्या भाषेत आहेत. जात्यावर दळता दळता, शेतात घाम गाळताना सहजस्फूर्त ती त्यांच्या मुखावाटे बाहेर पडली आहेत.

या दोन्ही कवयित्रींना परमेश्वराच्या भेटीची ओढ होती. संत बहिणाबाई म्हणतात,

'पृथ्वीचा तो गंध । अदकीचा रस ।
तेजमाशी अंश । आत्मयाचा ।।
परी तो न दिसे । आत्मचक्षूवीण ।
पाहिजे अंजन । गुरुकृपा ।।
वायूमाजी ज्याचे । वसतसे रूप ।
नभी असे दीप । आत्मयाचा ।।
बहिणी म्हणे सर्व । सर्वांही आगळा ।

ज्ञानाचिया डोळा । पाहे पा रे ।।'

कवयित्री बहिणाबाई म्हणतात,

'तुझ्या पायाची चाहूल
लागे पानापानामधी
देवा तुझं येनं-जानं
वारा सांगे कानामधी
फुलामधी समावला
धरत्रीचा परमय
माझ्या नाकाले इचारा
नथनीले त्याचं काय?'

('माझी माय सरसोती', 'बहिणाईची गाणी', पृ. ३)

संतांचे वर्णन करताना संत बहिणाबाईंना चंदनाची आठवण येते. त्या म्हणतात,

'चंदन सर्वांगे झिजोनिया जाय । तेणेपरी तोष होय प्राण्या ।।
तैसे साधूजन, मने वाचे काये । सुख देता नोहे उदासीन ।।'

तर बहिणाबाई चौधरी म्हणतात,

'सदा जगाच्या कारनी
चंदनापरी घसला
अरे सोतामधी त्याले
देव दिसला दिसला'

('देव दिसला, देव कुठे?', 'बहिणाईची गाणी', पृ. ७६)

संतांचे लक्षण सांगताना 'स्वतः त्रास सोसून इतरांना सुख वाटणारा तो संत' अशी व्याख्या दोन्ही बहिणाबाईंच्या आशयातून व्यक्त होते. त्यांच्या या दृष्टिकोनावर काळाचा, कौटुंबिक पार्श्वभूमीचा, आर्थिक परिस्थितीचा प्रभाव पडून बदल झालेला नाही.

'प्रपंच व परमार्थ दोन्ही गोष्टी साध्य करण्यामागे संत बहिणाबाईंची झालेली ओढाताण, त्यांनी केलेले कष्ट, इच्छाशक्ती या सर्वच गोष्टी त्यांचे उच्च कोटीचे कर्तृत्व दर्शवितात. त्यांनी लिहिलेले सुमारे सव्वासातशे अभंग म्हणजे त्यांच्या सर्वस्पर्शी व्यक्तिमत्त्वाची ओळख आहे.''[१] दुसरीकडे बहिणाबाई चौधरी यांच्यावर वैधव्याची कुऱ्हाड कोसळल्याने संसारात त्यांनाही भरपूर कष्ट करावे लागले. मात्र परमार्थ हेच त्यांचे ध्येय नव्हते. संत बहिणाबाईंकरिता

परमार्थ हे साधन आणि साध्य होते तर बहिणाबाई चौधरींनी अध्यात्माकडे केवळ एक चिरंतन सत्य म्हणून पाहिले. अध्यात्म हा त्यांच्या जगण्याचा आधार होता, असे म्हणता येणार नाही; मात्र अध्यात्माला त्यांनी नाकारले नाही.

संत बहिणाबाई आणि बहिणाबाई चौधरी दोघीही कुटुंबवत्सल होत्या. एक मुलगी म्हणून आदर्श होत्या. एक पत्नी म्हणून आदर्श होत्या. त्या आदर्श माता होत्या. पुत्रांवर उत्तम संस्कार करून त्यांनी त्यांना घडविण्यामध्ये कुठलीही कसर ठेवली नाही.

वास्तविक दोन वेगवेगळ्या कालखंडातील वेगवेगळ्या परिघातील या कवयित्रींची तुलना शक्य नाही; पण अभिव्यक्तीत जरी वेगळेपणा असला तरी आशयात कुठेतरी साम्य जाणवते; कारण दोघींच्याही मनाला भावणारे अध्यात्म समान आहे. त्यांनी मराठी सारस्वताला दिलेली देण चिरंतन आहे.



## संदर्भ :

**१. मांडवकर, वीरा, भूमिका व ऋणनिर्देश, <u>संत बहिणाबाई : व्यक्ती आणि वाङ्मय</u>, संत गाडगेबाबा अमरावती विद्यापीठाच्या आचार्य पदवीसाठी सादर केलेला प्रबंध, २००६, पृ. ५.**



*'जे रम्य ते बघुनिया मन होय वेडे' ही उक्ती जर खरी असेल तर, 'बहिणाबाईची गाणी' वाचून मन वेडे झाल्याशिवाय राहणार नाही.*

(कऱ्हाडे, सदा, 'बहिणाबाईची गाणी' – एक चिंतन, **<u>बहिणाईची गाणी</u>**, बहिणाबाई चौधरी, सातवी आवृत्ती, सुचित्रा प्रकाशन, मुंबई, १९९९, प्रा.पृ. ६०.)

# बहिणाबाईंची मानवतावादी भूमिका

बहिणाबाईंच्या कवितांमध्ये 'माणूस' आणि 'मानवता' केंद्रस्थानी आहेत. त्यांच्या रचनांमध्ये जसे कारुण्य आहे, तशीच 'मानवता' ठायी ठायी भरली आहे. मात्र माणसाच्या कृतघ्नतेविषयी हल्लेही आहेत. माणसांचे स्वार्थ पाहून त्यांना जी चीड येते, ती त्या त्वेषाने मांडतात आणि त्याचप्रमाणे दीनदलितांविषयी, दुःखीकष्टी जनांविषयी कणवही व्यक्त करतात.

'माणसाने माणूस कसे व्हायचे, हीच प्रचंड समस्या मानव जातीपुढे आज उभी आहे. या समस्येला बहिणाबाईंनी स्पर्श केला आहे. या समस्येचा साक्षात्कार एका अडाणी स्त्रीला व्हावा, हा तिच्या प्रतिभासामर्थ्याचा पडताळा आहे. माणसाच्या कल्याणाचा कांगावा करण्याचाच प्रयत्न आजपर्यंत पुष्कळ कवींनी केला आहे. दुर्दैवाने नराचा नारायण करण्याच्या त्यांच्या या वल्गना ठरल्या आहेत. माणसाच्या जन्मास येऊन माणसासारखा वागत नाहीस, माणसा तू अजून पुरता माणूसही झाला नाहीस, हे मानवतेच्या व्याधीचे अचूक निदान या अपढीक कवयित्रीने केले आहे. आमच्या मनातील समाजवादाचा हा जाणीवरहित हा पुरस्कार नव्हे काय?"[१]

'मानूस'सारख्या कवितांतून बहिणाबाईंचा मानवतावादी दृष्टिकोन व्यक्त होतो. गोठ्यातली जनावरेसुद्धा खाल्ल्या मिठाला जागतात, माणसाच्या उपयोगी पडतात. कुत्रासुद्धा इमानाने माणसाच्या घराची राखण करतो; पण माणसे मात्र स्वार्थासाठी एकमेकांशी भांडत असतात. दुसऱ्याचा जीव घ्यायलाही कमी करत नाहीत. नराचा नारायण व्हावा, अशी अपेक्षा बहिणाबाई व्यक्त करतात. माणसाच्या कल्याणासाठी त्याने इतरांच्या कल्याणाचा विचार करावा, असे त्या आपल्या कवितेतून सुचवतात.

'मानसा मानसा,<br>
कधी व्हशीन मानूस<br>
लोभासाठी झाला<br>
मानसाचा कानूस!'

('मानूस', 'बहिणाईची गाणी', पृ. ७७)

समाजाचे मनोरंजन करणाऱ्या बहुरूप्याबद्दलही त्यांच्या मनातील कळवळा कवितेतून प्रगट होतो.

'नका म्हनू रे भिकारी<br>
जरी तुम्ही नानावटी

करा गुनाची कदर
हात घाला कनवटी'

('रायरंग', 'बहिणाईची गाणी', पृ. ७८)

बहुरूप्याचे सोंग घेऊन आलेल्या गरीब माणसात त्यांना पांडुरंग दिसतो. हाच रायरंग मनोरंजन करता करता समाजातील अपप्रवृत्तींचे दिग्दर्शन करताना चुकणाऱ्यांच्या डोळ्यात अंजन घालतो.

मानवता, माणुसकी हे बहिणाबाईंच्या काव्याचे अभिन्न अंग आहेत. 'माणसांच्या पोटात पडणारी आग ही बहिणाईंना माहीत होती आणि समाजाचं विषमतेनं भरलेलं विदारक चित्रही बहिणाई जाणत होत्या. ह्या वर्णनांच्या मागे होते, ते त्यांचे करुणामय मन आणि हृदय. म्हणूनच त्यांच्या प्रज्ञेला, प्रतिभेला शब्द सहज सापडत होते. झरा वाहत होता, मानवतेच्या प्रेमाचा. परिस्थितीच्या असहायतेचे दगडगोटे त्या प्रवाहात होते; परंतु ते प्रवाह अडवीत नव्हते, तर पुढेच नेत होते. कारण त्या दुःखाकडे त्या तटस्थतेने पाहत नव्हत्या, तर त्या दुःखाचा अनुभव, त्या अक्षरशः परकाया प्रवेश करून अनुभवावा, तसा अनुभवू शकत होत्या. वेळप्रसंगी शक्य ती मदत करून, प्रसंगी भाकरतुकडा पुरवून प्रत्यक्ष सहानुभूतीची, माणुसकीची फुंकरही त्या दुःखितांवर घालीत होत्या. शेतकऱ्यासारख्या राजाला ते शक्य असतं. ती बहिणाईंच्या मनाला लाभलेली होतीच. त्याचं प्रमुख कारण म्हणजे कुठल्याही पुस्तकी पांडित्याच्या अर्धवट ज्ञानाचा माणुसकी गोठवून ठेवणारा स्पर्श सुदैवाने त्यांना झालेला नव्हता.'[२]



## संदर्भ :

१. यादव, (डॉ.) स.ग., एक मानवतावादी भूमिका, निसर्गकन्या बहिणाई चौधरी, प्रथमावृत्ती, प्रचार प्रकाशन, कोल्हापूर, १९८२, पृ. १८.
२. चौधरी, स्नेहलता, 'बहिणाईंच्या गाण्याचे बहिरंग', भूमिकन्या बहिणाबाई चौधरी : एक चिंतन, द्वितीयावृत्ती, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, २००२, पृ. १२७.



# बहिणाबाईंची उपदेशपर कविता

जीवनात माणसे कशी वागतात, त्यांनी कसे वागावे किंवा कसे वागू नये, याविषयी बहिणाबाईंनी अनेक कवितांतून विश्लेषण केले आहे.

परस्त्रीकडे कामुक नजरेने पाहणाऱ्या पुरुषांना त्या म्हणतात,

‘रस्त्यानं चालली, मायबहीन आपली
मांघे फिरी पाह्यं, पाप्या, धरत्री कापली’

(‘स्फुट ओव्या’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. ८८)

माणसांच्या या वृत्तीबद्दल त्या टीका करतात.

कृतघ्न आणि स्वार्थी माणसांबद्दल त्या आपली चीड अनेकदा व्यक्त करतात.

‘मानसा मानसा,
तुझी नियत बेकार
तुझ्याहून बरं,
गोठ्यातलं जनावर’

(‘मानूस’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. ७७)

व्यवहारी माणसे नातीगोती विसरून स्वार्थी वृत्तीने वागतात, तेव्हा बहिणाबाई म्हणतात, ‘चारा खाऊ घालणाऱ्याला गाई, म्हशी दूध देतात. भाकर-तुकडा दिल्यास कुत्राही इमानदारीने घरादाराची राखण करतो; पण माणूस स्वार्थासाठी बेइमान होतो. पशुपक्षी जनावरांकडून माणसाने काही सज्जनता शिकावी’ असा उपदेश त्यांच्या ‘मानूस’सारख्या कवितेत आढळतो.

समाजव्यवस्था जर बिघडली तर माणसांचे जीवन कसे उद्ध्वस्त होऊन जाते, याविषयी बहिणाबाईंची कविता म्हणजे ‘ज्याने त्याने आपले काम प्रामाणिकपणे करावे. शिंपी जर लाकूडतोड्या झाला, सोनार जर मडकी घडवू लागला किंवा लोहार चपला-जोडे शिवू लागला तर सगळीकडे अनागोंदी माजेल.

‘काय कामाची वाटनी
झाला गावाचा खैमाना
अरे असा कसा गाव
त्याले ठाव ना ठिकाना!’

(‘अनागोंदी कारभार’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. ६१)

अडाणीपणा आणि दारिद्र्य यांमुळे गरिबांची झालेली दुर्दशा बहिणाबाईंना व्यथित करते. दुःख विसरण्यासाठी ते नशापाणी करतात. कोंबड्या-बकऱ्या मारून खातात. भुताखेतावर, मंत्रतंत्रावर विश्वास ठेवतात आणि त्यामुळेच त्यांची दुर्दशा ओढवते, असे त्या 'घरापासून मळ्याकडे'सारख्या कवितांतून पटवून देतात.

बहिणाबाईंच्या मते कोरा कागद अडाणीच असतो; पण त्यावर अक्षरे छापली की तो शाहणा ठरतो. तसेच शिक्षणाने सुसंस्काराने माणूस दुर्दशेवर मात करू शकेल, असा आशावाद त्यांच्या कवितेतून दिसतो.

'मानसापरी मानूस
राहतो रे येडजाना
अरे होतो छापीसनी
कोरा कागद शहाना!'

('घरापासून मळ्याकडे', 'बहिणाईची गाणी', पृ. ४९)

'क्षणाक्षणातून नि कणाकणातून विचारसौंदर्य, मानवी जीवनाबद्दलची त्यांची तळमळ व्यक्त करणारी त्यांची प्रतिभाशक्ती वाचकाला विस्मयचकित करते. कोरा कागदही छापखान्यात छापला जातो नि शाहणा होतो; पण माणूस, हा हाडामासाचा माणूस मात्र शाहणा होत नाही, जीवनाचं सार्थक करून घेत नाही, येडजानाच राहतो, येडाच राहतो हे शल्य बहिणाबाईंच्या मनात सलत राहते.हे सारे पाहून मग येथे असे म्हणावेसे वाटते की बहिणाबाईंचे मन म्हणजे एक चांगल्या विचारांचा छापखानाच होय!'[१]

सामान्य माणूस दारिद्र्याने किंवा संकटाने हतबल झाला की तो ज्योतिष्याचा आधार घेऊ पाहतो. त्याला स्वतःचे उदाहरण देऊन बहिणाबाई म्हणतात,

'नको नको रे जोतिषा,
नको हात माझा पाहू
माझं दैव माले कये
माझ्या दारी नको येऊ.'

('लपे करमाची रेखा', 'बहिणाईची गाणी', पृ. २१)

संकटसमयी माणसाने धीर न सोडता हिमतीने संकटावर मात केली पाहिजे. दैवाधीन न होता स्वतःच्या कर्तृत्वावर विश्वास ठेवला पाहिजे.

निराशा, आळस, अपप्रवृत्तींना झटकून आनंदाच्या गुढ्या उभारल्या पाहिजेत, असे त्या म्हणतात.

देवाचे नाव घेत नाही, त्याला तोंड म्हणू नये, चहाड्या, चुगल्या ऐकतो, त्याला कान म्हणू नये, दान करण्यास आखडतो, तो हात हातच नव्हे, दीनदलितांच्या मदतीला धावत नाही, त्यांना पाय म्हणू नये, बाळाच्या रडण्याने जिला पान्हा फुटत नाही, तिला आई म्हणून नये, भीतीपोटी अंधारात पडलेल्या दोरीला साप म्हणू नये, तसेच स्वार्थासाठी स्वतःच्या पोरीला विकणाऱ्याला बाप म्हणू नये.

'इमानाले इसरला
त्याले नेक म्हनू नही
जल्मदात्याले भोवला
त्याले लेक म्हनू नही'

('कशाले काय म्हनू नही', 'बहिणाईची गाणी', पृ. १०)

असे परखड विचार बहिणाबाईंच्या काव्यात प्रकर्षाने आढळतात.

दुःखाने भरलेल्या संसाराला कधी खोटा म्हणू नये; कारण -

'अरे संसार संसार
जसा तावा चुल्ह्यावर
आधी हाताले चटके
तव्हा मियते भाकर!'

('संसार', 'बहिणाईची गाणी', पृ. ११)

असे संसाराचे यथार्थ चित्रण त्या आपल्या काव्यातून करतात आणि सांसारिकांना उपदेश करतात.

'मी कोन? (अहंकार)' ह्या कवितेतूनसुद्धा माणसाने व्यर्थ गर्व करू नये, इतरांना तुच्छ लेखू नये, सगळ्यांना अखेरची गती एकच असते, हे पटविण्याकरिता त्या म्हणतात,

'सर्व्या दुनियाचा राजा
म्हने, "मी कोन, मी कोन?"
अशा त्याच्या मीपनाले
मसनात सिव्हासन!'

('मी कोन (अहंकार)', 'बहिणाईची गाणी', पृ. ८२)

सुगरण पक्षाचा खोपा पाहून त्याच्या कलाकुसरीचे कौतुक करताना बहिणाबाई मानवाला टोला हाणतात.

'तिची उलूशीच चोच
तेच दात, तेच ओठ
तुले देले रे देवानं
दोन हात दहा बोटं'

('खोप्यामधी खोपा', 'बहिणाईची गाणी', पृ. ३७)

आळशी, परावलंबी, निरुद्योगी माणसे पक्षापेक्षा कितीतरी सक्षम असूनही आपले कर्तव्य नीट पार पाडत नाहीत, अशी कानउघाडणी त्या कवितेतून करतात.

दुःखातही सुख शोधले पाहिजे. नेकीने जीवन जगले पाहिजे. आळस, निराशा, दुष्प्रवृत्तींचा धिक्कार करून धैर्याने संकटांचा मुकाबला केला पाहिजे. गोरगरिबांना मदत केली पाहिजे, अशी उपदेशाची अनेक उदाहरणे देऊन बहिणाबाईंनी आपली साधी, सोपी, सरळ कविता रचलेली दिसते.

'बहिणाबाईंच्या काव्यात एक मोठी गंमत अशी वाटते, की त्या सारे काही स्वतःच्या 'जीवा'शी बोलत असतात. दुसऱ्याला उपदेश करणे किंवा काही महान संदेश देणे हा त्यांचा मुळी हेतूच नाही; पण त्या जे काही स्वतःसाठी लिहितात, तोच इतरांसाठी संदेश असतो! त्यात जीवनदायी तत्त्वज्ञान आणि आध्यात्मिक संदेश ह्यांचा मधुर संगम असतो.'[२]



## संदर्भ :

१. भिरुड, (डॉ.) प्रमिला, 'बहिणाबाई चौधरी : एक श्रेष्ठ कवयित्री', बहिणाओीची गाणी : एक अभ्यास, प्रथमावृत्ती, व्यंकटेश प्रकाशन, जळगाव, २००३, पृ. ४३.

२. चौधरी, स्नेहलता, 'आध्यात्मिक आशयाच्या कविता', भूमिकन्या बहिणाबाई चौधरी : एक चिंतन, द्वितीयावृत्ती, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, २००२, पृ. ६७.



# बहिणाबाईंची करुणरसात्मक कविता

रसालंकाराच्या अपेक्षेने बहिणाबाईंची कविता निर्माण झालेली नाही. त्यांच्या रचनांमध्ये त्यांची अनुभूतीच रसरसलेली आहे. जसा आनंद तसे कारुण्यही आहे. 'त्यांच्या कवितेला बहिरंगाची फाजील जाणीव नाही. नटण्यामुरडण्याची हौस नाही. अलंकारांची अपेक्षाच नाही. रसासंबंधीची रसहीन जाणीव नाही. हे सारे तीत असूनही त्याहून ती वेगळी आहे. कारण तिला नकळत हे सारे काव्यगुण बहिणाबाईंच्या कवितेत उतरले आहेत.'[१]

बहिणाबाईंच्या कविता वाचताना प्रकर्षाने असे जाणवते की त्या कारुण्याची मूर्तिमंत प्रतिमा आहेत. गांजलेल्या दीन-दलितांबद्दल ममत्व, स्नेह, सहृदयता, सहानुभूती व्यक्त करणारी त्यांची लेखणी वाचकांनाही हेलावून सोडते. तरीही त्या स्वतः हतबल झालेल्या दिसत नाहीत. त्यांच्या विविध कवितांमधून निष्काम कर्मयोग स्पष्ट होतो.

'ऐक ऐक माझ्या जीवा
पीडायेलाचं कन्हनं
देरे गांजल्याले हात
त्याचं ऐकरे म्हननं'

('माझ्या जीवा', 'बहिणाईची गाणी', पृ. १३)

'माझी मुक्ताई'सारख्या कवितेतून त्यांनी ज्ञानदेवांचे चे जे दुःख व्यक्त केले आहे, ते हृदयाला स्पर्शून जाते.

'अरे असं माझं तोंड
कसं दावू मी लोकाले
ताटी लावी ग्यानदेव
घरामधी रे दडले'

('माझी मुक्ताई', 'बहिणाईची गाणी', पृ. ६८)

अतिशय कष्टमय जीवन जगत असतानाही बहिणाबाई आपली हिंमत हारत नाहीत. 'सासुरवाशीन' या कवितेत कवयित्री सूनबाईला किती कष्ट सोसावे लागतात, याचे वर्णन करून तिने धीर मात्र सोडू नये असे त्या सांगतात.

'ऊठ सासुरवाशीन बाई,
घे सोशीसन घे
घालू नको वो वाद

कर माहेराची याद'

('सासुरवाशीन', 'बहिणाईची गाणी', पृ. ४३)

स्वयंपाक करताना सासुरवाशीणीचे कसे हाल होतात आणि त्यातूनही ती मार्ग काढते आणि घरातील सर्वांसाठी भोजन तयार करते, हे स्वतःचे अनुभव व्यक्त करताना त्या म्हणतात,

'पेट पेट धुक्कयेला,<br>
किती घेसी माझा जीव<br>
आरे इस्तवाच्या धन्या,<br>
कसं आलं तुला हिव?'

('चुल्हा पेटता पेटेना', 'बहिणाईची गाणी', पृ. ८०)

त्यांच्या 'नही दियामधी तेल'सारख्या कवितांमधूनही कारुण्याचा आविष्कार जाणवतो. 'बहिणाबाईंनी जीवनातलं हे कारुण्य आपल्यासमोर अत्यंत प्रत्ययकारी, हृदयस्पर्शी शब्दांत मांडलं आहे. ह्या कवितेत कारुण्यगर्भ विनोदाचीही झालर आहे. आगकाडीला 'आग्यायेताळाची लेक' असं जेव्हा बहिणाबाई म्हणतात, तेव्हा त्यांच्या कल्पनेची, प्रतिभाशक्तीची उत्तुंग झेप मनाला भारावून टाकते. येथे एक विचार मनात येतो की प्रत्यक्ष आग्यायेताळाची लेकही ज्या अंधाराला घाबरते, तो अंधार, मानवी जीवनातला अंधार किती भयानक स्वरूपाचा असावा?'[२]

त्यांच्या कितीतरी कवितांमधून त्यांचे तत्त्वज्ञान, जीवनोपयोगी उपदेश जसे आढळतात, त्याचप्रमाणे ते व्यक्त करीत असताना कुठेतरी कारुण्याची झालर स्पर्शून जात असल्याचे निदर्शनास येते.



## संदर्भ :

१. चिडगोपकर, (डॉ.) अलका, 'बहिणाबाईंच्या काव्यातील प्रतिमासौंदर्य', बहिणाबाईंची गाणी : एक काव्यदर्शन, प्रथमावृत्ती, स्नेहवर्धन पब्लिशिंग हाऊस, पुणे, २०००, पृ. ४७–४८.

२. भिरूड, प्रमिला, 'इतर कविता', बहिणाअीची गाणी : एक अभ्यास, प्रथमावृत्ती, व्यंकटेश प्रकाशन, जळगाव, २००३, पृ. १५७.



# बहिणाबाईंच्या कवितेतील व्यक्तिचित्रणे

बहिणाबाईंच्या कविता एकप्रकारचे हितगुज असते. आपला आपणाशी आणि वाचकांशी जणू तो संवाद सुरू असतो. 'जयरामबुवाचा मान', 'गोसाई', 'परसुराम बेलदार', 'खोकली माय' अशा काही कविता व्यक्तिचित्रणात्मक आहेत.

जळगावलगत असोदा रस्त्यावर जयरामबुवाचे स्थान आहे. मुलांच्या दीर्घायुष्यासाठी शेतकरी तिथे नवस फेडायला येतात. रोडग्याचं जेवण देतात.

'बारा वरसाचा मुंजा
वाटसरू कोनी
टिस लागीसनी गेला
पेयालेज पानी'

('जयरामबुवाचा मान', 'बहिणाईची गाणी', पृ. ५५)

वाटेनं जाणाऱ्या एका बारा वर्षाच्या मुलाला तहान लागली म्हणून तो विहिरीवर पाणी प्यायला गेला. तर तिथे वडाच्या झाडाखाली जयरामबुवा ध्यान करीत बसले होते.

'जाये वडाच्या खालती
कोनी आर्वालया
तढी व्हता देवध्यानी
जयराम बोवा
म्हने जयराम बोवा
कोन तू पोरगा
अरे पेयाआधी
खाई घे लोडगा'

('जयरामबुवाचा मान', 'बहिणाईची गाणी', पृ. ५६)

जयरामबोवांनी चौकशी केली आणि त्याला रोडगा खायला दिला. त्यानंतर तो पाणी प्यायला विहिरीवर गेला. तेवढ्यात वडाखालून साप निघाला. जयरामबोवाने हे पाहिले. आता हा साप त्या मुलाला चावेल,

'तसा उठे जयराम बोवा
तीराच्या सारखा
देला सापावर पाय
सापावर देखा

साप चेंदता चेंदता
साप उलटला
अन् मुंजाच्या वाटचा
बोवाले डसला.'

('जयरामबुवाचा मान', 'बहिणाईची गाणी', पृ. ५७)

जयराम बोवाला साप चावल्याची बातमी त्या मुलाने पळत जाऊन गावात सांगितली.

'गेली गेली रे बातनी
आवघ्या गावाले
आला तठे हिराबाबू
साप उताऱ्याले.'

('जयरामबुवाचा मान', 'बहिणाईची गाणी', पृ. ५७)

हिराबाबू मांत्रिक आला; पण काही उपयोग झाला नाही.

'गेला जयरामबोवा मरी
उपेग काय रे
काय चालीन मंतर
सापाले उतारे?'

('जयरामबुवाचा मान', 'बहिणाईची गाणी', पृ. ५७)

त्यानंतर तो मंत्र हिराबाबूवरच उलटतो आणि हिराबाबू मध्येच शेतामध्ये मरून पडतो. पण या जयरामबोवांनी स्वतःचे प्राण गमावून मुलाचे प्राण वाचविले म्हणून लोक श्रद्धेने, भक्तिभावाने त्यांची पूजा करू लागले.

'देवमानूस शेवटे
देवाघरी गेला
जीव धोक्यात घातला
मुंजा वाचवला.'

('जयरामबुवाचा मान', 'बहिणाईची गाणी', पृ. ५८)

श्रद्धेने मान देणाऱ्या जयरामबोवांचे स्थान आजही असोद्याच्या वाटेवर आहे.

'जारे बिढ्याच्या वरते
आसोद्याच्या वाटे
तठी वडाच्या खालते

जयरामबोवा भेटे.'

('जयरामबुवाचा मान', 'बहिणाईची गाणी', पृ. ५८)

'गोसाई' या कवितेत एका गोसाव्याचं वर्णन आहे.

'तठे बसला गोसाई
धुनी पेटली शेतात
करे 'बं बं भोलानाथ'
धरे चिमटा हातात.'

('गोसाई', 'बहिणाईची गाणी', पृ. ५२)

गोसाव्याची बसण्याची जागा, हाती चिमटा धरून 'बं बं भोलानाथ'चा जप करणारा गोसावी आपल्यासमोर बहिणाबाई उभा करतात. रानात तो एकटाच राहायचा, चिलीम ओढायचा, जडीबुटीचे त्याला ज्ञान होते. लोकांना औषध देऊन त्यांचा रोग तो दूर करायचा. औषधासाठी त्याच्याकडे लोकांची गर्दी असायची; पण तो कोणाकडूनही पैसे घ्यायचा नाही. त्याच्याकडे चार गाई होत्या. त्यांच्या दुधाशिवाय तो दुसरा आहार घेत नसे.

गाईंमध्ये एक कपिला नावाची गाय होती. चरता चरता तिला वडाचे रोप दिसले.

'रोप वडाचं दिसलं
भूत बोले त्याच्यातून
'निंघ वढाय कुठली'
व्हय चालती आठून'

('गोसाई', 'बहिणाईची गाणी', पृ. ५३)

वडाच्या झाडातून भूत बोलले आणि तिला हाकलू लागले. तिला राग आला. ती गोसाव्याकडे गेली आणि शिंगाने माती उकरू लागली. गोसाव्याला सगळे समजले. तो वडाच्या रोपाजवळ गेला. पुन्हा भूत बोलले तेव्हा -

'टाके गोसाई मंतर
भूत पयीसनी गेलं
तसं वडाच्या रोपाचं
तठी जैऱ्ही रोप झालं.'

('गोसाई', 'बहिणाईची गाणी', पृ. ५३)

गोसाव्याच्या मंत्राने जहरी झालेले रोप वाढून तो विषारी वृक्ष होतो. गुरेही तिकडे फिरकत नाही. त्या झाडाचं नावही कुणाला माहीत नाही.

'काय झाडाचं या नाव?
नही मालूम कोन्हाले
आरे कशाचं हे झाड
पुसा गोसाई बोवाले!'

('गोसाई', 'बहिणाईची गाणी', पृ. ५४)

खोकल्याचे दान स्वीकारून सर्व गावाला खोकल्याच्या साथीतून मुक्त करणारी 'खोकली माय'. ह्या खोकल्या मायच्या नशिबात खोकल्याचे दान कसे आले, तो किस्सा सांगणारी कविता.

शेतात, रस्त्यावर, घरोघरी लोक खोकलू लागले. औषधाचाही फायदा होत नव्हता.

'सर्वे वैद्य गेले थकी
आता जावं कुठे तरी?
करे मनात इचार
कोनी गावाचा कैवारी'

('खोकली माय', 'बहिणाईची गाणी', पृ. ५९)

वैद्यांचाही इलाज चालत नव्हता. आता करावे तरी काय? असा विचार त्या गावचा कैवारी माणूस करत होता.

'कसा आला रे खोकला
म्हने आवंदाच्या साली
गावाच्याच शिववर
कोणी म्हातारी भेटली.
तशी म्हातारी बोलली
काही धर्म वाढ बापा
इडापीडा या गावाची
व्हई जाईन रे सपा.'

('खोकली माय', 'बहिणाईची गाणी', पृ. ५९)

त्या गावच्या कैवाऱ्याला ही म्हातारी काही धर्म करा म्हणून विनवते.

'तव्हा गावचा कैवारी

काय बोले म्हातारीले
माझ्या गावचा खोकला
सर्वा दान केला तुले'

('खोकली माय', 'बहिणाईची गाणी', पृ. ६०)

सर्व्या गावचा खोकला तो तिला दान करून टाकतो. हे ऐकून म्हातारी भ्रमात पडते; पण जे दान आपल्या पदरात पडले आहे, ते स्वीकारलेच पाहिजे असे ती म्हणते आणि ते दान स्वीकारल्याने गावातील लोकांचा खोकला दूर होतो; पण ती म्हातारी मग कायम खोकलत राहते.

'खोक्ला निंघीजायासाठी
धर्ती म्हतारीचे पाय
हात जोडती रे लोक
खोकली माय खोकली माय'

('खोकली माय', 'बहिणाईची गाणी', पृ. ६०)

तेव्हापासून सगळे लोक आपला खोकला निघून जाण्यासाठी तिचे पाय धरत आणि तिला 'खोक्ली माय' म्हणत. आजही 'मेहरूण'च्या वाटेवर तुम्हाला खोकली माय भेटेल, असे बहिणाबाई सांगतात. कर्माने पदरात जे पडले ते दैवाचे चमत्कारिक दान स्वीकारणारी ही म्हातारी बहिणाबाईंनी रंगवली आहे.

एक निखळ व्यक्तिचित्रणात्मक कविता म्हणजे 'पर्सुराम बेलदारा'. संसारासक्तीत गुंतलेल्या पर्सुराम बेलदाराची ही कहाणी. आता पंढरपूरला जाऊ, पुढच्या वर्षी जाऊ असे म्हणता म्हणता आषाढी कार्तिकीची वारी कित्येक वर्षे पुढे ढकलत आलेला विटांच्या भट्टीचा मालक पर्सुराम ह्याला उद्देशून ही कविता आहे.

'जाय आता पंढरीले,
पर्सुराम बेलदारा
माटीमध्ये टाकी पानी
किती खुंदशी रे गारा'

('पर्सुराम बेलदारा', 'बहिणाईची गाणी', पृ. १०३)

मातीमध्ये पाणी टाकून किती दिवस तू असा चिखल तुडविणार आहेस? कितीतरी विटा घडून झालेल्या आहेत. आतातरी तू पंढरीला जा.

'अरे सर्व्या जगामधी
तुने कधी ना देखली
अशी देख एक ईट
इठ्ठलाच्या पायाखाली'

('पर्सुराम बेलदारा', 'बहिणाईची गाणी', पृ. १०३)

एवढ्या विटा घडवल्या असल्या तरी विठ्ठलाच्या पायाखालची एक वीट तू अजून बघितली नाहीस.

'भट्टीतल्या इटांवरी
तुझ्या संसाराचा रंग
तठी एका इटेवरी
देख उभा पांडुरंग!'

('पर्सुराम बेलदारा', 'बहिणाईची गाणी', पृ. १०३)

बहिणाबाई विठ्ठलाच्या पायाखालच्या विटेचे व भक्तीचे महात्म्य पर्सुरामाला पटवून देतात. त्या विटेचे, पांडुरंगाचे दर्शन घेण्यासाठी पर्सुरामाने एकदा तरी जावे, असे त्या विनवतात.

'आता तरी जाय बापा,
एकदाचा पंढर्पुरा
मुखी पांडुरंगहरी
कर नामाच्या गजरा.'

('पर्सुराम बेलदारा', 'बहिणाईची गाणी', पृ. १०३)

अशा प्रकारे बहिणाबाईंची व्यक्तिचित्रणेही हृदयस्पर्शी आहेत. वाचकांच्या मनावर प्रभाव टाकणारी आहेत.



# काही व्यक्तिचित्रे

भोवतालचा परिसर आणि संपर्कात आलेल्या व्यक्तींचे सूक्ष्म निरीक्षण करून बहिणाबाईंनी ही व्यक्तिचित्रे शब्दबद्ध केली आहेत. 'काही व्यक्तिचित्रे' या शीर्षकाखाली 'बहिणाईची गाणी' या पुस्तकात १९ व्यक्तिचित्रे आहेत, त्यांचा हा क्रमशः आढावा -

१. पहिले व्यक्तिचित्र बहिणाबाईंच्या सासूबाईंचे आहे.

खटल्याचं घरामधी
देखा माझी सग्गी सासू
सदा पोटामधी माया
तसे डोयामधी आसू

हिच्या अंगामधी देव
सभावानं देवगाय
माले सासरी मियाली
जशी जल्मदाती माय!

('काही व्यक्तिचित्रे', 'बहिणाईची गाणी', पृ. ९३)

सासूबाईंनी बहिणाबाईंवर केलेल्या अपार मायेची त्यांना जाणीव आहे.

एकत्र कुटुंबात राहताना बहिणाबाईंच्या सासूबाईंना सर्व सांभाळावे लागे. स्वतः दुःख झेलून त्या सर्वांवर मायेची पाखर घालीत. सर्वांशी प्रेमळपणाने वागत. त्यांना बहिणाबाई देवगाव संबोधतात. जणू सासरी मला मायच मिळाली, असेही त्या सांगतात. सासू-सुनेचे नाते म्हणजे सासूने सुनेला छळण्याचे, त्रास देण्याचे असे चित्रण सर्वत्र आढळते. पण बहिणाबाईंनी सासूबाईंच्या प्रेमाची, मायेची, महती येथे गायली आहे.

२. सर्वांना जिच्याबद्दल जिव्हाळा वाटायचा, अशी बहिणाबाईंची नणंद कासाई.

माझी ननद 'कासाई'
हिचा लोभ सर्व्यावरी
रूप देवानं घडलं
जशी इंदराची परी

हिचं सरील नाजूक
चंबेलीच्या फुलावानी

देली सम्रीताच्या घरी
सोभे राजाचीच रानी!
(‘काही व्यक्तिचित्रे’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. ९३)

इंद्राच्या परीप्रमाणे बहिणाबाईंची नणंद सुंदर होती. चमेलीच्या फुलाप्रमाणे ती नाजूक होती. राजाची राणी शोभावी अशी ही कासाई. श्रीमंत सासरी तिला दिल्याचे बहिणाबाई सांगतात.

३. पानाई ही बहिणाबाईंची मोठी जाऊ. ग्रामीण भागात बऱ्याच समाजात जाऊला जेठानी म्हणतात. पानाईबरोबर बहिणाबाई कीर्तनाला जात असत.

माझी जेठानी ‘पानाई’
कशी मनातली गोट
हिरीतात शिरीहारी
तोंडामधी हरिपाठ

बोले तोंड भरीसनी
तसं हातभरी देनं
काम आंग मोडीसनी
सैपाकात सुगडीन

भरतार देवध्यानी
मनी दुजभाव नही
जसे वाड्यात सोभती
पांडुरंग रुखमाई!

(‘काही व्यक्तिचित्रे’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. ९३–९४)

ही पानाई बहिणाबाईंना फार जवळची होती. देवावर तिची श्रद्धा होती. तोंडाने ती सदैव हरिपाठ म्हणत असे. हृदयात जणू परमेश्वरच वास करायचा. सर्वांशी गोड बोलायची. स्वयंपाकातही सुगरण होती. बहिणाबाई जेठाचे म्हणजे पानाईच्या पतीचे वर्णन करताना म्हणतात, की तेही सदैव परमेश्वराचे नाव घेत. त्यांच्या मनात दुजाभाव नसे. जणू ही जोडी म्हणजे विठ्ठल-रुक्मिणीचीच, अशी उपमाही त्या देतात. जेठ-जेठानीप्रती त्यांच्या मनात अत्यंत आदराची भावना होती.

४. सीताई ही बहिणाबाईंच्या मोठ्या जाऊची सून. तिला वाहारी असे संबोधले आहे.

माझी वाहारी 'सीताई'
हिचं मोठं मन देखा
देल्हा देवानं सभाव
खडीसाखरेसारखा

तसं रूपबी घडलं
जशी बोरातली आयी
आन् कामामंधी बाकी
त्याले कुठे तोड नही

असो सासरी माहेरी
जशी आंब्याची सावली
झिजे अवघ्याच्यासाठी
अशी लाखात माऊली!

('काही व्यक्तिचित्रे', 'बहिणाईची गाणी', पृ. ९४)

सीताई अत्यंत उदार, प्रेमळ, खडीसाखरेप्रमाणे गोड स्वभावाची होती. ती रूपवान होती. सडपातळ होती. तिच्या काम करण्याला तोड नव्हती. सासरच्या, माहेरच्या सर्वांवर ती माया करायची. सर्वांसाठी कष्ट उपसायची. लाखात एक अशी ती माऊली होती.

५. बहिणाबाईंची चुलतसासू भिवराई. सासूबद्दल सुनेचे चांगले मत क्वचितच असते. त्रास, छळवाद या दृष्टीनेच या नात्याकडे बहुधा बघितले जाते; परंतु बहिणाबाईंच्या बाबतीत निराळाच प्रत्यय येतो. सासूबाईंच्या स्वभाववैशिष्ट्याचे येथे चित्रण आहे.

माझी सासू 'भिवराई'
कसं गमतीचं बोलनं!
हाशीसन आवघ्याचं
पोट गेलं फुटीसन

नाव ठेये आवघ्याले,
करे सर्व्यांची नक्कल
हासवता हासवता

शिकवते रे अक्कल!

('काही व्यक्तिचित्रे', 'बहिणाईची गाणी', पृ. ९४)

भिवराईचे बोलणे गमतीदार असायचे. त्या सगळ्यांना इतके हसवायच्या की पोट फुटायचे. त्या सर्वांच्या वागण्यावर टीका करायच्या. सगळ्यांची नक्कल करता करता, हसवता हसवता काहीतरी शिकविण्याचा त्यांचा प्रयत्न असायचा.

६. चिमाबोय नावाच्या स्त्रीचे वर्णन बहिणाबाईंनी केले आहे.

पाहिसनी उंदराले
अंगामधी भरे हिव
चिमाबोय चिव चिव
आल्या बोक्या गेला जीव

देखीसनी बेंडकोयी
कशी झाली धावाधाव
आता डरांव डरांव
आला साप गेला जीव!

('काही व्यक्तिचित्रे', 'बहिणाईची गाणी', पृ. ९४)

चिमाबोय अतिशय भित्री होती. उंदीरही दिसला तरी तिला हिव भरायचे. बेडूक दिसला तरी इकडून तिकडे धावत सुटायची. पण 'चिमाबोय चिवचिव, आला बोका गेला जीव' आणि 'आता डरांव डरांव, आला साप, गेला जीव!' या ओळींतून बहिणाबाई जीवनाच्या क्षणभंगूरतेची कल्पना देतात. चिमणीची चिवचिव कुठपर्यंत चालायची? बोका आल्यावर तिचा फडशा पाडणारच आणि बेडूकही कुठवर डरांव डरांव करणार? साप आला की त्याला खाणारच!

७. कोण्या एका ठमाबाईचे वर्णन बहिणाबाईंनी केले आहे. 'देखा देखा 'ठमाबाई', मोठी बोल्याले आगीन

देखा देखा 'ठमाबाई'
मोठी बोल्याले आगीन
डोये भोकराच्यावानी
जशी पाहाते वाघीन

कव्हा हाशीखुषीमधी
आयाबायात रमते
येता डोक्यामधी राग
जशी चुढेल घुमते
('काही व्यक्तिचित्रे', 'बहिणाईची गाणी', पृ. ९५)

ठमाबाई बोलायला फारच परखड होती. तिचे भोकरासारखे डोळे, वाघीणीसारखी मर्मभेदी नजर असणारी ठमाबाई कधी आनंदात असली तर आयाबायात रमायची; पण जर का एखाद्याचा राग डोक्यात शिरला तर चुडेल किंवा पिशाच्चिणीप्रमाणे ती घुमायची.

८. बहिणाबाईंची सून भीमा ही दिसायला इतकी सुंदर होती की तिच्या सौंदर्याने सगळे घर उजळून निघायचे.

भीमा साजरी वाहारी
हिनं उजयलं घर
अरे वाड्यामंधी वागे
सर्व्यांशी आदबशीर
आला मिर्गाचा पाऊस
पडे आंगावऱ्हे ईज
पडे धर्तीवर भीमा
लागे शेवटली नीज!
('काही व्यक्तिचित्रे', 'बहिणाईची गाणी', पृ. ९५)

सर्वांशी ही भीमा शालीनतेने नम्रतेने वागायची. सर्वांचा मान ठेवायची; पण पुढे दुर्दैवाने मृगाच्या पावसात तिच्या अंगावर वीज कोसळून तिचा मृत्यू झाल्याचे बहिणाबाईंनी नमूद केले आहे.

९. बहिणाबाईंचे सासरे मांगो यांची सर्व लहान मुलांवर फार माया होती. लहान मूल दिसलं की त्याला ते लगेच कडेवर उचलून घेत. त्यांच्या एका विशिष्ट लकबीचे वर्णन करताना बहिणाबाई म्हणतात,

'मांगो' बोवाजी तुमजा
लोभ पोरासोरांवर
घेता कव्हाबी उचली

पटकन कढ्यावरी

खांद्यावर आडी आठी

दोन्ही हात काठीवर

वाड्यातून जाती येती

जसे घालत पाखर

('काही व्यक्तिचित्रे', 'बहिणाईची गाणी', पृ. ९६)

दोन्ही खांद्यांवर आडवी काठी घेऊन त्यावर हात ठेवून ते चालायचे. वाड्यात त्यांची सतत ये-जा सुरू असायची. सर्वांवर ते पाखर घालायचे, म्हणजे सर्वांची काळजी घ्यायचे.

१०. गणपत खडके नावाच्या एका बाणेदार माणसाचे वर्णन बहिणाबाईंनी केले आहे. बहिणाबाईंनी त्यांना मोतीदाण्याची उपमा दिली आहे. गावात त्यांच्या शब्दाला मान होता. सत्यासाठी ते झगडायचे. सर्वांचे भले करायचे. त्यासाठी चंदनाप्रमाणे झिजायचे.

'गनपत' 'गनपत'

गावामधी मोतीदाना

याची जबान मोलाची

इमानाले इसरेना

खऱ्यासाठी झगड्याले

याची मोठी रे हिंमत

गनपत गनपत

साऱ्या गावामधी पत

आवघ्यालेज लह्यना

नही कोन्हाले पारखा

सग्यासायासाठी झिजे

जसा चंदनासारखा

('काही व्यक्तिचित्रे', 'बहिणाईची गाणी', पृ. ९६)

११. बहिणाबाईंचे सर्वात मोठे दीर/भासरे भानादाजी म्हणजे भानाजी चौधरी.

भानादाजी भानादाजी

घरामंधी लिखनार

कर्तेसवरते मोठे
यांच्या हाती कारभार
अरे हाती कारभार
गोड सम्द्याशी बोलनं
डोईवरती पगडी
वानीबाम्हनी चालनं
घरामधी दबदबा
तसं वागनं तोलाचं
सर्वे लोक देती मान
कसं बोलनं मोलाचं
('काही व्यक्तिचित्रे', 'बहिणाईची गाणी', पृ. ९६)

भानादाजी म्हणजे शिकलेले, कर्तेसवरते गृहस्थ. त्यांच्या हाती सर्व कारभार होता. सर्वांशी ते गोड बोलायचे. गावात त्यांना फार मान होता. डोक्यावर पगडी ठेवून ते वाणी-ब्राम्हणांप्रमाणे चालायचे. त्या काळात वाणी-ब्राम्हण हे श्रेष्ठ समजले जात. म्हणून बहिणाबाईंनी हा शब्दप्रयोग केला असावा. एक दिवस मात्र -

भाईरूनी येता घरी
तांब्याभरी पानी पेल्हे
माझी 'काशी' व्हती तान्ही
तिले घीसनी बसले
तिले ठेवलं रे खाले
छातीमधी कय आली
अरे कोन्हा दुस्मानानं
मूठ दाजीले मारली
('काही व्यक्तिचित्रे', 'बहिणाईची गाणी', पृ. ९७)

बाहेरून आलेल्या भानादाजींनी तांब्याभर पाणी प्यायले. बहिणाबाईंची लहान मुलगी काशी हिला जवळ घेतले. नंतर खाली ठेवले आणि छातीत कळ आली. त्यातच त्यांचा मृत्यू झाला. 'कोन्हा दुस्मानानं मूठ मारली' असे बहिणाबाई म्हणतात. मंत्रतंत्राने एखाद्याला मारणे म्हणजे मूठ मारणे असा शब्दप्रयोग ग्रामीण भागात केला जातो.

१२. गावातला कोणी एक <u>मारोती</u> - ज्याचे घराणे मराठ्याचे; पण तो नंतर मुसलमान झाला.

अरे मारोत्या, मारोत्या
तुझं मराठं घरानं
असा कसा झाला तरी
बाटीसनी मुसनमान

('काही व्यक्तिचित्रे', 'बहिणाईची गाणी', पृ. ९७)

तो छोट्या मुलांमध्ये खेळायचा. गरगर काठी फिरवायचा. गोळ्याप्रमाणे दगड फेकायचा. डोक्यावर कौल फोडून दाखवायचा. पण त्याच्या कर्मात भीक मागणेच होते.

पोरासोरांमधी नाचे
काठी फिरये गर्गर
फेके दगडाचा गोया
फोडे कौल डोक्यावर

आला घरदार सोडी
तुले कशाची फिकीर
तुझ्या कर्मामधी भीक
झाला दारचा फकीर

('काही व्यक्तिचित्रे', 'बहिणाईची गाणी', पृ. ९७)

शेवटच्या कडव्यात मात्र बहिणाबाई त्याला आपल्या दारी येऊ नकोस म्हणून सुनावतात.

आज मोठी एकादशी
नको करू दारी गिल्ला!
जाय तुझ्या तक्क्यामधी
तठी म्हन बिसमिल्ला!

('काही व्यक्तिचित्रे', 'बहिणाईची गाणी', पृ. ९८)

वैष्णवपंथीयांमध्ये कार्तिक महिन्यातील मोठ्या एकादशीला फार महत्त्व असते. सर्वांचा उपवास असतो. अशा पवित्र दिवशी मारोत्यासारख्या बाटलेल्या मुसलमानाने आपल्या दारी गोंधळ घालू नये, असे श्रद्धाळू बहिणाबाईंना वाटते. म्हणूनच त्याला त्या मुसलमान लोकांच्या बैठकीत जाऊन 'बिसमिल्ला' म्हणत बसायला सांगतात.

१३. घाण राहणाऱ्या एका स्त्रीचे वर्णन बहिणाबाई करतात.

'सदा अंगावर बुरा
डोकं कुंभाराचा आवा
नही डोक्यात अक्कल
पन बुचबुचू जुवा'

('काही व्यक्तिचित्रे', 'बहिणाईची गाणी', पृ. ९८)

कित्येक दिवस आंघोळ न केल्याने अंगाला बुरा आलेला. केस न विंचरल्याने तिचे डोके कुंभाराच्या आव्याप्रमाणे आणि डोक्यात अकलेऐवजी उवा भरलेल्या. अशा घाणेरड्या स्त्रीचे वर्णन करताना बहिणाबाईंनी मार्मिक विनोद साधला आहे.

'नही कामात उरक
खुळबुळते चेंगट
करे आदयआपट
आलं अंगात खेंगट
कधी कोनाचं ऐकेना
अशी आस्तुरी हाटेल
नहीं कोणाची जरब
भरतार गह्याटेल'

('काही व्यक्तिचित्रे', 'बहिणाईची गाणी', पृ. ९८)

ती अत्यंत आळशी होती. तिला कामाचा उरक नव्हता. जणू अंगात भूत संचारावे, तशी आदळआपट करायची. ती कोणाचे ऐकायची नाही. तिचा नवरा अत्यंत मिळमिळीत स्वभावाचा होता. तिला तर त्याचाही धाक नव्हता. वर्षानुवर्षे ती लुगडं धूत नसे.

'नही लुगड्याले पानी
वर्स गेले निंधीसन
जशी घरामंधी नांद
कुसुंब्याची घसोटीन'

('काही व्यक्तिचित्रे', 'बहिणाईची गाणी', पृ. ९८)

या तिच्या घाणेरडेपणाला पाहून बहिणाबाईंना कुसुंब्याची घसोटीन आठवते. कुसुंबे नावाच्या खेड्यात घसोटीन समाजाची वसती आहे. दारोदार

भीक मागणाऱ्या या स्त्रिया अतिशय घाण राहतात, असा उल्लेख 'बहिणाबाईंची गाणी'च्या प्रथमावृत्तीत पृ. १०२ वर आलेला आहे.

शेवटच्या दोन ओळीत मात्र बहिणाबाई परमेश्वराला विचारतात,

'कोन्ही बोल्याच्याच आंधी
करे बोंबलाबोंबल
हिले जल्म देता देवा
काय हाताले झुंबलं!'

('काही व्यक्तिचित्रे', 'बहिणाईची गाणी', पृ. ९८)

'हिला जन्म दिला तेव्हा काय तुझ्या हाताला काही चावलं होतं का देवा, म्हणून असं वेडंवाकडं रूप तू घडवलं?'

१४. एक खुजी म्हातारी धुडाबोय. तिचे मार्मिक वर्णन बहिणाबाईंनी समर्पक उपमांच्या साह्याने केले आहे.

धुडाबोय, धुडाबोय
धुडाबोय रे केवढी
म्हनू नका रे केवढी
भूई-रिंगनी एवढी!

एका हातात काडुक
दुज्या हातात भाकर
डोक्यामधी नाकतोडे
हिच्या पायाले चक्कर

हिच्या पायाले चक्कर
तोंडामधी किरकिर
दोन्ही डोयाले झांजर
नाकमधी तपकीर

खिजवती सम्देझनं
'धुडाबोय' कोनी 'धुडी'
हिच्या आवतीभंवती
पोराटोराच्या झुंबडी

हिले पाहिसन देवा
जीव पडे भरमात

कसा ‘धुडीले’ घडता
तुझा आखडला हात!

(‘काही व्यक्तिचित्रे’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. ९९)

धुडाबोय केवढी तर भुईरिंगणीएवढी. भुईरिंगणी म्हणजे भिंगरी. भिंगरीप्रमाणे सतत फिरत राहणारी. तिच्या एका हातात एक छोटीशी काठी आणि दुसऱ्या हातात भाकर असायची.‘डोक्यामधी नाकतोडे, हिच्या पायाले चक्कर’ या ओळींतून बहिणाबाईंनी तिच्या डोक्यात नाकतोडे म्हणजे उड्या मारणारे टोळ असायचे, असा उल्लेख केला आहे. म्हणजे तिच्या डोक्यात सतत उड्या मारणारे विचार असावेत. पायाला चक्कर म्हणजे ती सतत फिरत राहायची. चालताना बडबड करत, कुरकुर करत चालणारी, डोळ्यांवर झापडं आलेली आणि नाकात सदैव तपकीर ठेवणारी धुडाबोय. तिला कमी उंचीची म्हणून कुणी पोरंसोरं धुडी म्हणूनही चिडवत. तिला पाहून संभ्रमित बहिणाबाई देवाला विचारतात,

‘हिले पाहिसन देवा, जीव पडे भरमात
कसा ‘धुडीले’ घडता, तुझा आखडला हात!’

(‘काही व्यक्तिचित्रे’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. ९९)

देवा, तिला घडवताना तुझा हात का आखडला? का तिला खुजी निर्माण केलेस? बहिणाबाईंचे श्रद्धाळू मन शेवटी परमेश्वरालाच प्रश्न विचारते; कारण एखाद्याला रूप न देणे, बुटके बनविणे हे सगळे मानवाच्या हाती नसून परमेश्वराच्या हाती आहे, बहिणाबाईंचा ठाम विश्वास आहे.

१५. नगरपालिकेत मुनीर नावाचा शिपाई होता.

आला ‘मुनीर’ टेसात
कमेटीतला शिपायी
डोये वट्टारत पाहे
रस्त्यामधली सफाई

आला मुनीर शिपयी
याची खुरटेल दाढी
याच्या हातामधी छडी
आन तोंडामधी बिडी

याची नजर चेकानी

दोन्ही बुबुयं कुखडे?
एक ‘आव्हान्याच्या’कडे
एक ‘कान्हाकाई’कडे!

आला मुनीर शिपायी
याची पाहीसन छडी
पोरं गडरीवरले
घरामधी गेले दडी

अशी मुनीरदादाची
सर्व्यावर दहसत
हाती घेतला झाडना
भंगी पये घाबरत!

खेकसनं दमदाटी
याचं काम जाता सरी
मंग मारतो बैठक
‘झठू’ सोनाराच्या दारी

(‘काही व्यक्तिचित्रे’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. ९९, १००)

मुनीर शिपाई ऐटीत यायचा आणि डोळे वटारून रस्त्याच्या सफाईकडे बघायचा. खुरटलेली दाढी, हाती घडी आणि बिडी असा त्याचा अवतार असे. त्याचे डोळे तिरळे होते. त्याला पाहताच गटारीवर बसलेली पोरे घरात लपून बसत. सर्वांना त्याची भीती वाटायची. तो दिसताच भंगी झाडू हाती घ्यायचे. सर्वांना दटावणारा मुनीर शिपाई रंगवला आहे.

१६. हाती धुनुकनी घेऊन मुक्की पिंजारीण कापूस पिंजायला यायची. तिचे वर्णन बहिणाबाईंनी दोन कडव्यांत केले आहे.

आली मुक्की पिंजारीन
आली कापूस पिंज्याले
हातामधी धुनुकनी
तोंडी वटवट चाले

हिले येयेना बोलता
काय मुक्याचं बोलनं?
समजनं समजी घ्या

जसं ताताचं वाजनं!

'मुक्की पिंजारीण' मुकी होती. पण तिची वटवट सदैव चाले. बहिणाबाई म्हणतात, कशी? तर तातीच्या वाजण्यासारखी.

१७. भोजा नावाचे एक पात्र बहिणाबाईंनी रंगविले आहे.

चाले गान गात गात
'भोजा' फुटका फुटका
जाता येता वाड्यातून
सदा करतो वटका

मोठं बोलनं गमती
सांगे गानं गाईसन
आवघ्याले हासाळतो
याचं सुरू सदा गानं!

डोळ्यांनी अंध असलेला भोजा नेहमी गाणे म्हणत चालायचा. वाड्यातून येता-जाता त्याचे ओरडणे सुरू असायचे. त्याला जे काही सांगायचे, तो ते गाण्यातून सांगायचा. सर्वांना हसवायचा. असा हा भोजा बहिणाबाईंनी वर्णिला आहे.

१८. एक गमतीदार व्यक्तिमत्त्व म्हणजे छोटू भैय्या.

छोटू भैय्या, छोटू भैय्या,
तुझी कानटोपी लाल
दिसे चाकीवानी तोंड
तुझे थुलथुले गाल

तुझे डोये सदा लाल
त्याच्यातून गये पानी
तुझ्या नाकाची ठेवन
भज्या - गुलगुल्यावानी

पोट माथनीसारखं
वऱ्हे बोबींचे झांकन
व्होट पोपटाची चोच
पुढे तुयशीरामायन

('काही व्यक्तिचित्रे', 'बहिणाईची गाणी', पृ. १०१)

छोटू भैय्या लाल रंगाची कानटोपी घालायचा, चकरीसारखे गरगरीत तोंड, थुलथुळीत गाल, लाल डोळ्यांचा छोटू भैय्या. त्याच्या डोळ्यांतून सदैव पाणी यायचे. त्याच्या नाकाची ठेवण भजासारखी होती. पोट माठाप्रमाणे होते, जणू वर बेंबीचे झाकण होते. ओठ म्हणजे जशी पोपटाची चोच. मात्र तो तुलसीरामायण जपायचा. असा हा छोटू भैय्या.

१९. लालू मिय्या (लालखूमिय्या) हा गावातला अवलिया. त्याच्या अंगावर फार घाण असायची; कारण तो फक्त पावसाळ्यात आंघोळ करायचा. बहुधा पावसात फक्त ओला व्हायचा.

'लालू मिय्या' 'लालू मिय्या'
गवामधी आविलया
सदा अंगावर बुरा
पावसायात आंघोया

दाढीमिशाचं जंगल
अंगी फाटकी गोधडी
हाती भल्ली मोठी काठी
पाठी चंध्याची गाठोडी

तुले नही घरदार
सोतामधीच मगन
बारीमास भटकतो
नही खानं नही पेनं!

('काही व्यक्तिचित्रे', 'बहिणाईची गाणी', पृ. १०२)

वाढलेल्या दाढीमिशा, अंगावर फाटकी गोधडी, हाती मोठी काठी, पाठीवर चिंध्यांची गाठोडी बाळगणाऱ्या लालूमिय्याला घरदार नव्हते. स्वतःतच तो मग्न राहायचा आणि बाराही महिने खाण्यापिण्याचे भान न ठेवता भटकत राहायचा.

बहिणाबाईंची ही व्यक्तिचित्रे त्यांच्या सूक्ष्म निरीक्षणातून, व्यापक अनुभूतीतून निर्माण झाली आहेत. त्यात नातेवाईक आहेत. गावातील व्यक्ती आहेत, गरीब आहेत, श्रीमंत आहेत. आपापल्या प्रकृतीधर्मानुसार जगणारी ही माणसे, त्यांची स्वभाववैशिष्ट्ये हेरून बहिणाबाईंनी रंगवली आहेत.

'जीवनाचा, माणसाच्या प्रत्येक कृतीचा अगदी खोलवर वेध घेणारी, माणसाच्या वृत्तीत, प्रत्येक कृतीत सतत शोध घेऊ पाहणारी ही थोर कवयित्री कोणत्या दृष्टीनं जीवन जगत होती, जीवनाशी किती समरस झाली होती, याचा विचार करताना मन अक्षरशः विस्मयचकित होतं. त्यांची अलौकिक काव्यप्रतिभा प्रत्येक वस्तूगणिक व्यक्तीनुसार, प्रसंगानुसार, क्षणाक्षणाला नवविचारांचा साज घेऊन व्यक्त होताना दिसते."[१]



## संदर्भ :

१. भिरुड, (डॉ.) प्रमिला, 'बहिणाबाई चौधरी : एक श्रेष्ठ कवयित्री', बहिणाओची गाणी : एक अभ्यास, प्रथमावृत्ती, व्यंकटेश प्रकाशन, जळगाव, २००३, पृ. ५५.



# इतर काही कविता

बहिणाबाईंच्या कवितांचे विषय व्यापक आहेत. गावात येणारा बहुरूपी, प्लेगची साथ, दारिद्र्यात जगणाऱ्या माणसांचा संसार, त्यातील कारुण्य, जीवनाच्या वाटेवर चालणाऱ्या वाटसरूला उपदेश, माणसांची गलथानवृत्ती असे अनेक चौकटीबाहेरचे विषय त्यांनी हाताळले. अशा काही कवितांचा अभ्यास या प्रकरणात आहे.

१. बहिणाबाईंची चार कडव्यांची 'अनागोंदी कारभार' ही कविता माणसांच्या गलथानवृत्तीला दर्शवते.

'भुजे सोनार मडकं
कुंभारानं केले तोडे
बंडी शिवतो सुतार
शिंपी लाकडाले घडे.'

('अनागोंदी कारभार', 'बहिणाईची गाणी', पृ. ६१)

गावात अजबच प्रकार सुरू आहे. कशाशी कशाचा ताळमेळ नाही. सोनार मडके भाजतो तर कुंभार तोडे. सोनाराने कुंभाराचे, कुंभाराने सोनाराचे, सुताराने शिंप्याचे तर शिंप्याने सुताराचे काम करणे म्हणजे विचित्रच!

'शिये लव्हार वहाना
इय्या चांभार घडतो
चाले नहाराची पोथी
ढोरं बाम्हन वढतो
बेलदार करे पेढे
हलवाई खुंदे गारा
पिंजे पाथरवट रूई
पिंजरीन घडे चिरा.'

('अनागोंदी कारभार', 'बहिणाईची गाणी', पृ. ६१)

लोहार वहाणा शिवतो, चांभाराचे काम करतो. चांभार विळा तयार करतो म्हणजे लोहाराचे काम करतो. त्याचप्रमाणे ब्राम्हणाऐवजी महार पोथी वाचतो आणि ब्राम्हण ढोरे ओढतो. पेढे करणारा हलवाई चिखल तुडवतो, तर बेलदार पेढे करतो. पाथरवटाचे काम पिंजारी, तर पिंजाऱ्याचे काम पाथरवट करतो.

‘काय कामाची वाटनी
झाला गावाचा खैमाना
अरे असा कसा गाव
त्याले ठाव ना ठिकाना!’

(‘अनागोंदी कारभार’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. ६१)

असे विचित्र काम ज्या गावात चालते, त्या गावाला कसलाच ठावठिकाणा राहत नाही. असे हे ताळमेळ नसलेले अजब गाव. अपात्र व्यक्तीच्या हाती कारभार देऊन आपल्या समस्या आपणच निर्माण करतो, असे बहिणाबाई सुचवितात.

२. गरिबांच्या संसाराची ओढाताण जाणवते, ते बहिणाबाईंच्या चार कडव्यांच्या ‘नही दियामधी तेल’ या कवितेतून.

‘नही दियामधी तेल
कशी आंधारली रात
तेले मिये एकदाच
नेली उंदरानं वात!’

(‘नही दियामधी तेल’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. ६२)

रात्रीचा काळोख. दिवा लावावा म्हटले तर तेल नाही. धडपड करून तेल मिळवले तर उंदराने वातच पळवून नेली.

‘वात केली चिंधुकाची
तेल दियात पडलं
सापडेना आकपेटी
घोडं आठी बी आडलं.’

(‘नही दियामधी तेल’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. ६२)

चिंधीची वात केली, दिव्यात तेल घातले तर आगपेटीच दिसेना.

‘सापडली आकपेटी
आग्यायेतायाची लेक
आली आली हाती काडी
लाडानवसाची एक
शिलगावली रे काडी
जोत पेटली पेटली

आंधाऱ्याले ब्याहीसनी
मेली इझीसनी गेली'

('नही दियामधी तेल', 'बहिणाईची गाणी', पृ. ६२)

आगपेटीची शोधाशोध केल्यावर एकदाची सापडली आग्यावेताळाची लेक. तिच्यातही एकच काडी. ती पेटवली तोच जणू अंधाराला घाबरून ती विझून गेली.

हे सगळे वर्णन गरिबांच्या संसाराचे. साधा दिवाही लावणे किती कठीण असते. आग्या वेताळाची लेकही ज्या अंधाराला घाबरते, तो अंधारही किती भयंकर. दारिद्र्यात खितपत पडलेल्या मानवी जीवनाचा हा आरसा.

३. त्या काळात प्लेगची साथ येत असे. वैद्यकीय सोयीसुविधा फारशा नव्हत्या. प्लेगमुळे गावेच्या गावे उजाड व्हायची. 'पिलोक' (प्लेग) ह्या कवितेत बहिणाबाईंनी हाच विषय हाताळला आहे.

'पिलोक पिलोक
आल्या पिलोकाच्या गाठी
उजाडलं गाव
खया-मयामधी भेटी
पिलोक पिलोक
जीव आला मेटाकुटी
भाईर झोपड्या
गावामधी मसनवटी
पिलोक पिलोक
कशाच्या रे भेटीगाठी!
घरोघरी दुख
काखाजागामधी गाठी
पिलोक पिलोक
आता नशिबात ताटी
उचलला रोगी
अन् गाठली करंटी'

('पिलोक', 'बहिणाईची गाणी', पृ. ७९)

प्लेग या रोगाची लक्षणे म्हणजे काखेत, जांघेत गाठी येणे. घरोघरी दुःखी वातावरण असते. अनेक व्यक्ती मृत्युमुखी पडतात. या रोगाची भयानकता बहिणाबाईंनी वर्णन केली आहे.

४. जीवनमार्गावरील वाटसरूला उद्देशून लिहिलेली बहिणाबाईंची कविता 'वाटच्या वाटसरा'.

वाटच्या वाटसरा, वाट बिकट मोठी
नशिबी दगड गोटे
काट्याकुट्याचा धनी
पायाले लागे ठेचा
आलं डोयाले पानी
वरून तापे ऊन
आंग झालं रे लाही
चालला आढवानी
फोड आले रे पायी
जानंच पडीन रे
तुले लोकाच्या साठी
वाटच्या वाटसरा
वाट बिकट मोठी!
दिवस ढयला रे
पाय उचल झट
असो नसो रे तठी
तुझ्या लाभाची गोट
उतार चढनीच्या
दोन्ही सुखादुखात
रमव तुझा जीव
धीर धर मनात
उघडू नको आता
तुझ्या झाकल्या मुठी
वाटच्या वाटसरा
वाट बिकट मोठी!

माझेच भाऊबंद
घाईसनी येतीन
नको धरू रे आशा
धर एव्हढं ध्यान.

तुझ्या पायाने जानं
तुझा तुलेच जीव
लावनी पार आता
तुझी तुलेच नाव

मतलबाचे धनी
सर्वी माया रे खोटी
वाटच्या वाटसरा
वाट बिकट मोठी!

वाऱ्याचं वाहादन
आलं आलं रे मोठं
त्याच्यात झुकीसनी
चुकू नको रे वाट

दोन्ही बाजूनं दऱ्या
धर झुडूप हाती
सोडू नको रे धीर
येवो संकट किती

येऊ दे परचीती
काय तुझ्या ललाटी
वाटच्या वाटसरा
वाट बिकट मोठी!

(‘वाटच्या वाटसरा’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. २४)

जीवन प्रवास करणारा हा वाटसरू नशिबी काटेकुटे, दगडगोटे असणारा आहे. त्याला या बिकट वाटेवरून चालताना ठेचा लागतात. डोळ्यात पाणी येते, ऊन्हाने अंग लाही लाही होते, पायाला फोड येतात; पण बहिणाबाई वाटसरूला सांगतात की तुला जावेच लागेल. काही लाभ होवो न होवो; पण या सुखदुःखाच्या प्रवासात तू मन रमव. तुझ्या मनातले दुःख तू झाकल्या मुठीप्रमाणे बंद ठेव. आपले भाऊबंद मदतीला येतील, अशी आशा करू

नकोस. वाऱ्याचे मोठे वादळ आलेले आहे, संकट आले आहे. तरीदेखील नशिबात काय आहे, हे कोणालाच माहीत नसते. संकटांना तोंड देत जीवनाच्या बिकट वाटेवर पुढे चालत राहायचे. 'सोडू नको रे धीर, येवो संकट किती' असे त्या सांगतात.

बहिणाबाईंची ही कविता त्यांच्याच जीवनाशी संबंधित असावी, असे वाटते. स्वतःच्या मनाला त्या जीवनवाटेवर चालण्याची हिंमत देत असाव्यात. कुणीतरी जवळच्या व्यक्तीने त्यांना दुखावले असावे. 'तुझ्यामुळेच जीव' असे त्या म्हणतात. तेव्हा त्यांच्या 'आता माझा माले जीव' या कवितेची आठवण होते. प्रतिकूल परिस्थितीतही न खचता पुढे चालत राहण्याचा संदेश मात्र या कवितेतून मिळतो.

५. 'रायरंग' या कवितेचा थोडक्यात परिचय यापूर्वीही करून देण्यात आला आहे. ही कविता 'इतर काही कवितां'मध्ये नंतर समाविष्ट करण्यात आली होती.

निरनिराळी सोंगे घेऊन गावात येणारा बहुरूपी म्हणजे 'रायरंग'. बहिणाबाईंच्या मते तो नुसतेच हसवत नाही, तर लोकांना जीवनोपयोगी उपदेशही देतो.

आला आला रायरंग, करे लोकाचं रंजन
हासवता हासवता, घाले डोयात अंजन
आला आला रायरंग, देखा याची सपातनी
भरे हिरीद काठोट, झरे डोयाची माथनी
रायरंग रे नाटक्या, याच्या पोटाचं गऱ्हानं
नका म्हनू रे गऱ्हानं, घडे देवाचं पुरान
कोन्ही म्हणे आलं दारी, रायरंगाचं रे सोंग
अरे त्याच सोंगामधी, माले दिसे पांडुरंग!
आला रायरंग दारी, याचं फेडा तरी रीन
अरे थकले भागले, त्याचा घालवतो शीन
नका म्हनू रे भिकारी, जरी तुम्ही नानावटी
करा गुनाची कदर, हात घाला कनवटी

('रायरंग (बहुरूपी)', 'बहिणाईची गाणी', पृ. ७८)

लोकरंजनातून उपदेशाचे डोस देणारा हा रायरंग लोकांच्या चुकाही नजरेसमोर आणतो. त्याचे हावभाव हृदयस्पर्शी असतात. डोळ्यांना पाझरवण्याचे सामर्थ्य त्याच्यात असते. त्याला कुणी नाटक्या म्हणावे, हे बहिणाबाईंना पटत नाही.

पोटासाठी हा रायरंग सोंग आणतो. त्याच्यामुळे पुराणाचा लाभ घडतो. त्याला पोटाचे गाऱ्हाणे म्हणावे, हे बहिणाबाईंना पटत नाही कारण – 'अरे त्याच सोंगामधी, माले दिसे पांडुरंग' असे त्या सांगतात. थकल्याभागल्यांचा शीण हा रायरंग घालवतो. त्याचे आपल्यावर ऋणच असते. ते आपण फेडले पाहिजे.

तुम्ही कितीही श्रीमंत असाल, मोठे असाल तरी त्याला भिकारी म्हणू नका. त्याच्या गुणांची कदर करा आणि जवळ असेल त्यातून थोडेसे त्यालाही द्या, अशी विनवणी बहिणाबाई करतात. समाजातल्या उपेक्षित परंतु समाजाची गरज असलेल्या अशा घटकांविषयी बहिणाबाईंचा कळवळा व्यक्त करणाऱ्या या कवितेत हृदयाला पाझर फोडण्याचे सामर्थ्य आहे.

'बहिणाबाईंची निरीक्षणशक्ती किती सूक्ष्म आहे, त्यांचा जीवनविषयक दृष्टिकोन किती विशाल आहे, हे आपल्या प्रत्ययाला तर येतंच; पण त्याचबरोबर त्यांना कर्तव्याची जाणीव असल्याचं सर्वांची 'सत्कर्मी रती वाढो' अशी आत्यंतिक ओढ असल्याची जाणीवही होते. कर्मविरहित धर्म आणि धर्म विरहित कर्म ही कल्पना त्यांना मान्य नाही. अगदी रोजच्या साध्या साध्या गोष्टींच्या आधारे फार मोठं तत्त्वज्ञान सांगण्याची त्यांची हातोटी उल्लेखनीय आहे.'[१]



## संदर्भ :

१. भिरुड, (डॉ.) प्रमिला, 'मौलिक विचारप्रधान कविता', बहिणाओीची गाणी : एक अभ्यास, प्रथमावृत्ती, व्यंकटेश प्रकाशन, जळगाव, २००३, पृ. ८६.



# स्फुट ओव्या

'बहिणाईची गाणी' या ग्रंथात 'स्फुट ओव्या' या शीर्षकाखाली एकूण पन्नास ओव्या आहेत. काही ओव्या एकमेकांशी संबंधित असल्याने मूळ पुस्तकात त्यांना एकत्रित केले आहे. एकत्रीकरणानंतर त्यांची संख्या चाळीस भरते. मात्र येथे विषयानुरूप फोड केल्याने ४८ भागात विश्लेषण केलेले आहे.

१. जसा बोल्याले कर्रय
तसा कामाले करारी
सभावनं मन मोका
असोद्याचा शेतकरी

कारामधी रोखठोक
नही उसनउधारी
दोन देये दोन घेये
असा राजा शेतकरी

असा राजा शेतकरी
चालला रे आढवानी
देख त्याच्या पायाखाले
काटे गेले वाकीसनी

('स्फुट ओव्या', 'बहिणाईची गाणी', पृ. ८३)

आसोदे हे बहिणाबाईंचं माहेर. अर्थातच माहेरची प्रत्येक गोष्ट बहिणाबाईंच्या अभिमानाची. तिथला शेतकरीही आदर्शच.

आसोद्याचा शेतकरी हा कामात तत्पर आहे. कठोर बोलणारा पण करारीपणे काम करणारा. उसनउधारीपासून दूर राहणारा, चोख कारभार करणारा.

हा शेतकरी अनवाणी चालतो; पण त्याच्या पायाखालचे काटेही वाकून जातात, असे त्याचे दमदार चालणे असते. आसोद्याच्या शेतकऱ्यांविषयी बहिणाबाईंचा अभिमान येथे प्रकट झाला आहे.

२. बोरू चाले कुरूकुरू
तशा पाट्या पेनशिली
पोऱ्हं निघाले शिक्याले
कधीमधी टांगटोली

हाय समोरची शाया
पोऱ्हं शायीतून आले
हुंदडत हायाकडे
ढोरं पान्याकडे नेले

अरे आसोद्याची शाया
पोऱ्हं शंबर शंबर
शायामधी भारी शाया
तिचा पह्यला नंबर

इमानानं शिकाळती
तठी 'आबा' मायबाप
देती अवघ्याले इद्या
भरीभरीसनी माप

('स्फुट ओव्या', 'बहिणाईची गाणी', पृ. ८३–८४)

आसोद्याचा शेतकरी जसा श्रेष्ठ तशी आसोद्याची शाळाही कौतुकाचीच आणि तिथले विद्यार्थीही. शाळेतील काही मुले बोरूने लिहीत असतात तर काही पेन्सीलने लिहितात. कधी शाळेला टाळंटाळही करतात. या शाळेत १००-१०० मुले असून सर्व शाळांमध्ये ती प्रथम क्रमांकाची शाळा आहे आणि तिथे शिक्षणही अतिशय चांगल्या प्रकारे दिले जाते. असा बहिणाबाईंना शाळेविषयीचा अभिमान आहे.

३. भाऊ वाचे पोथी
येऊ दे रे कानांवर
नको भुकू रे कुतऱ्या
तुले काय आलं जरं!'

('स्फुट ओव्या', 'बहिणाईची गाणी', पृ. ८४)

बहिणाबाईंचे बंधू गणपत उर्फ गना ह्यांना पोथ्यापुराणांचे वाचन आवडायचे. परमेश्वराच्या भक्तीत ते रंगून जात आणि बहिणाबाई त्यांच्या ओव्या श्रवण करत. त्या वेळेस एखाद्या कुत्र्याचे भुंकणे अडथळा निर्माण करीत असे. म्हणून बहिणाबाई जरा रागानेच, 'मध्येच भुंकू नकोस, तुला काय रोग जडलाय?' असा प्रश्न त्या कुत्र्याला करतात.

४.	कधी बाप जल्मामधी
घडू नही ते घडलं
जसं कंगल्याचं लेकरू
बंगल्यावऱ्हे चढलं!

(‘स्फुट ओव्या’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. ८४)

ही ओवी सुभाषिताप्रमाणे आहे. आजपर्यंत जे घडले नव्हते, ते घडले, जणू कंगाल माणसाचे लेकरू बंगल्यावर जाऊन बसले. जे वैभव किंवा जी गोष्ट मिळणे शक्य नव्हते, ती गोष्ट, ते वैभव मिळाले. आश्चर्य व्यक्त करणारी ही ओवी आहे किंवा कदाचित त्यांना एखाद्याला गर्व चढल्याचे उदाहरण मांडायचे असावे.

५.	गेला वाकडा तिकडा
दूर सगर दिसला
जसा शेताच्या मधून
साप सर्पटत गेला!

(‘स्फुट ओव्या’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. ८४)

शेतातून वेडीवाकडी जाणारी पायवाट पाहून बहिणाबाईंनी ही ओवी रचली आहे. वेडीवाकडी वाट त्यांना सरपटणाऱ्या सापाप्रमाणे भासते.

६.	कडू बोलता बोलता
पुढे कशी नरमली
कडू निंबोयी शेवटी
पिकीसनी गोड झाली!

(‘स्फुट ओव्या’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. ८४)

एका स्त्रीच्या वागण्याबोलण्यात झालेले परिवर्तन बहिणाबाईंनी सूचित केले आहे. कडवट, खोचक बोलणारी स्त्री काही दिवसांनी किंवा वयोमानाप्रमाणे सर्वांशी गोड बोलू लागते, चांगली वागू लागते. म्हणून बहिणाबाई म्हणतात, ही ‘कडू निंबोयी शेवटी, पिकीसनी गोड झाली.’

७.	फाट आता टराटर
नही दया तुफानाले

हाले बाभयीचं पान,
बोले केयीच्या पानाले!

('स्फुट ओव्या', 'बहिणाईची गाणी', पृ. ८४)

या ओवीतून दोन अर्थ निघू शकतात. एक म्हणजे वादळाचा बाभळीच्या पानावर परिणाम होत नसतो; पण केळीची पाने मात्र टराटरा फाटतात. म्हणून बाभळीचे पान केळीच्या पानाला हिणवत असावे आणि दुसरा अर्थ असा की शेतामध्ये केळी आणि बाभळी शेजारी शेजारी असल्याने वादळवाऱ्याने बाभळीच्या काट्यांनी केळीची पाने फाटतात आणि त्या दोषाचे खापर बाभळीचे पान वादळावर फोडत आहे.

बहिणाबाईंचे हे निसर्ग निरीक्षण सूक्ष्म स्वरूपाचे आहे.

८. उच्च्या खुज्या जोडप्याची
कशी जमली रे जोड
उगे ताडाखाले जसं
भुईरिंगनीचं झाड!'

('स्फुट ओव्या', 'बहिणाईची गाणी', पृ. ८५)

निसर्गनिरीक्षणाचा आणखी एक नमुना उंच पती व खुजी पत्नी अशा विजोड जोडप्याला पाहून बहिणाबाईंना सुचलेल्या ओळींमधून दिसून पडतो. उंच ताडाचा वृक्ष आणि भुईरिंगणीचं खुजं झाड. बहिणाबाईंनी उंच व खुज्या पती-पत्नीच्या जोडाला दिलेली ही उपमा आहे.

९. हिरवे हिरवे पानं
लाला फयं जशी चोच
आलं वडाच्या झाडाले
जसं पीक पोपटांचं!'

('स्फुट ओव्या', 'बहिणाईची गाणी', पृ. ८५)

हिरव्यागार पानांनी बहरलेला वड पाहून आणि त्याला लाल फुलांनी आलेली शोभा पाहून बहिणाबाईंना पोपटाची आठवण होते. जणूकाही वडाच्या झाडाला आलेली हिरवी पानं म्हणजे पोपट आणि समोरची लाल फळं म्हणजे त्यांची चोच. अशा पोपटांचे पीक आलेले आहे.

१०.	पयसाचे लाल फुलं
हिर्वे पानं गेले झडी
इसरले लाल चोची
मिठ्ठू गेले कुठे उडी?

(‘स्फुट ओव्या’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. ८५)

पळसाच्या झाडाची हिरवी पाने झडून गेलेली आहेत. परिणामी लाल फुलेच उठून दिसतात. जणू हिरवे पोपट आपल्या लाल चोची इथे विसरले आणि कुठे बरे उडून गेले? पळसाच्या वृक्षाला पाहून बहिणाबाईंना सुचलेली पोपटाने आपल्या लाल चोची विसरून जाण्याची ही कल्पना विलक्षण अशी आहे.

११.	सोमवती आमावस
कशी आंधारली रात
देल्ही रातांध्याच्या हाती
पेटयेल काडवात!

(‘स्फुट ओव्या’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. ८५)

एखाद्या गोष्टीतील निरर्थकता सूचित करण्याकरिता बहिणाबाईंनी वरील ओळी रचल्या. सोमवती अमावस्येच्या गडद अंधारलेल्या रात्री जो व्यक्ती रातआंधळा आहे, त्याच्या हाती पेटवलेली काडीवात दिली, तर त्याचा काय फायदा? ज्याला दिसतच नाही, त्याला काडवातीचा उपयोग नसतो.

१२.	कशी दाखईन रस्ता
आली आंधाऱ्याची रात
कसा देईन रे दान
सांग बुझाऱ्याचा हात?’

(‘स्फुट ओव्या’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. ८५)

अंधाऱ्या रात्री रस्ता कसा दाखवायचा? आणि कंजूष माणसाकडून दान कसे दिले जाणार, असा बहिणाबाईंचा प्रश्न आहे. म्हणजेच दोन्ही गोष्टी अशक्य अशा असतात. बहिणाबाईंनी सांगितलेले हे व्यावहारिक सत्य मानवी प्रवृत्तीचे स्वरूप प्रगट करते.

१३.	तुझी म्हईस ठांगय
नको रुसू लतखोऱ्या
माझी म्हईस दुभती
नको हुसू रे शेजाऱ्या!

('स्फुट ओव्या', 'बहिणाईची गाणी', पृ. ८६)

ग्रामीण भागात दूधदुभत्याच्या धंद्याकरिता गाईम्हशी पाळल्या जातात. या प्राण्यांवरूनही शेजाऱ्यापाजाऱ्यांत वाद होतात. आपली म्हैस 'ठांगय' म्हणजेच भाकड राहून दुसऱ्याची म्हैस दुभती आहे, हे पाहून राग अनावर झालेल्या माणसाला बहिणाबाई न रुसण्याचा सल्ला देतात. आपली दुभती म्हैस पाहून दूध न देणाऱ्या म्हशीच्या मालकाने म्हणजेच शेजाऱ्याने आपला हेवा करू नये, असे त्या बजावतात. दुसऱ्याचा उत्कर्ष, प्रगती पाहून झुरत बसणाऱ्या व्यक्तींना बहिणाबाईंनी दिलेला हा सल्ला आहे.

१४.	हिच्या तोंडात साकर
आन् पोटात निंबोनी
मोठी आली पट्टवनी
साऱ्या मुल्खाची लभानी!

('स्फुट ओव्या', 'बहिणाईची गाणी', पृ. ८६)

'बहिणाबाईंची गाणी' या पुस्तकाच्या प्रथमावृत्तीत 'भामटी, बलुची, लभाणी' स्त्रियांना 'लभानी' म्हणतात, असा उल्लेख आहे. ग्रामीण भागात सतत बोलणारी, काहीही उद्योग न करता रिकामपणाच्या उठाठेवी करत फिरत राहणारी स्त्री 'लभाणी' म्हणून ओळखली जाते.

बहिणाबाईंनी इथे स्त्रीची मूर्ती उभी केली आहे. ती इतकी गोड बोलते, की जणू तिच्या तोंडात साखर आहे, परंतु पोटात मात्र निंबोणी आहे. म्हणजेच अंतःकरणात कडवटपणा आहे. तिला आपले म्हणणे दुसऱ्याला पटवता येते. दुसऱ्यावर प्रभाव टाकता येतो. अशा स्त्रीला बहिणाबाईंनी 'साऱ्या मुल्खाची लभानी' म्हटले आहे. गोड बोलून दुसऱ्यांवर प्रभाव टाकून कडवट अंतःकरण असणारी अशी लभानी स्त्री साऱ्या मुलखात सापडणार नाही. समाजात अशी पात्र ठिकठिकाणी असतात. बहिणाबाईंची सूक्ष्म निरीक्षण शक्ती येथे प्रत्ययास येते.

१५.	अरे आरदटाकेला
	तुले कशाचं हिरीत
	तशी निझूर शेताले
	काय सांगे बरसात!

(‘स्फुट ओव्या’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. ८६)

एका कठोर माणसाचे हे वर्णन आहे. त्याला कुणाची दया नाही, जिव्हाळा नाही. अशा माणसाला हृदयच नसेल, त्याकरिता बहिणाबाई ‘निझूर’ शेताचा उल्लेख करतात. मुळातच शेत निझूर असले म्हणजे नापीक असले तर त्या शेतात पाऊस पडून काय फायदा? म्हणजेच निष्ठूर माणसाचा स्वभाव बदलणे अशक्यच.

१६.	नांगरलं शेत
	खूप केली मशागत
	पेरल्या मुकन्या
	मारे गानं गात गात!

(‘स्फुट ओव्या’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. ८६)

शेतकरी जीवन म्हणजे कष्ट अधिक आणि उत्पन्न अत्यल्प. काहीशा औपरोधिक स्वरात बहिणाबाई शेतकऱ्याचे वर्णन करतात. पेरणीसाठी शेत नांगरले, चांगली मशागत केली, आनंदाची गाणी गात पेरणीही केली, पण पेरले काय तर मुकन्यासारखे बारीक सत्त्वहीन बी. त्यामुळे सगळी मेहनत वाया जाणार. निःसत्त्व बियाणे पेरून फायदा नसतो. म्हणजेच कुठलीही गोष्ट विचार करून व्हायला हवी आणि योग्य ठिकाणी योग्य वस्तूंचा वापर व्हावा, असे बहिणाबाई सांगतात.

१७.	फाटी गेलं पांघरून
	नको बोचकू रे चिंध्या
	झालं गेलं पार पडी
	नको काडू आता गिंध्या!

(‘स्फुट ओव्या’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. ८६)

पांघरूण संपूर्णतः फाटलेले आहे, अशा वेळी चिंध्या बोचकून, ओढून उपयोग काय? ते पांघरूण किंवा त्या चिंध्या ओढण्यात काहीही अर्थ नाही.

माणसाची अगतिकता, काहीसा त्रागा आणि कृतीतील निरर्थकता येथे जाणवते. व्हायचे ते होऊन गेले. अशा वेळी गिंध्या म्हणजे मागच्या भाकड गोष्टी अर्थात जुने ते उकरून का काढायचे, की ज्याचा काहीच फायदा नाही?

मानवी प्रवृत्तीवर प्रकाश टाकणारी ही ओवी आहे.

१८. तुले परनलं पोरी
झाल्या जल्माच्याच भेटी
दिल्लीचं बिलूबांदर
आनी देलं तुझ्यासाठी!

('स्फुट ओव्या', 'बहिणाईची गाणी', पृ. ८६)

मुलाच्या लग्नाचा हा प्रसंग आहे. मुलाचे लग्न करून सून घरात आणली. तिला सासू म्हणत असावी, 'आता परनलं म्हणजे लग्न करून तुला घरी आणल्यामुळे आपल्या जीवनभर भेटी होत राहतील. म्हणजे आयुष्यभराची सोबत राहील.' या सुनेला भविष्यात सुख मिळेल, हे पटवून देण्यासाठी तिच्यासाठी दिल्लीचे बिलबांदर आणल्याचे सासूबाई सांगतात. दिल्ली तशी दूरच. इतक्या दुरून सुनेसाठी बिलबांदर आणल्याचे सासू सांगते, म्हणजेच सुनेच्या हौशी येथे पूर्ण होतील, तिचे कौतुक केले जाईल, अशी ही सासूने सुनेला दिलेली ग्वाही आहे.

१९. घरांमधी सर्वे गोरे
तूच कशी कायी घूस
उज्या जवारीत आलं
जसं कान्हीचं कनूस

('स्फुट ओव्या', 'बहिणाईची गाणी', पृ. ८७)

बहिणाबाईंची ही ओवी एखाद्या व्यक्तीविषयी असावी. घरातल्या सर्व व्यक्ती गोऱ्या आहेत, तूच तेवढी काळी कशी? जणूकाही ज्वारीच्या पांढऱ्या ताटांमध्ये, शुभ्र कणसांमध्ये एखादे कान्हीचे म्हणजे बिनदाण्याचे काळे कणीसच!

२०. माझे उघडे नशीब
पीक शेतात दाटले

तुझे जबून शेजाऱ्या
कसे डोये रे फुटले?

('स्फुट ओव्या', 'बहिणाईची गाणी', पृ. ८७)

बहिणाबाईंचा शेजारी दुष्ट प्रवृत्तीचा असावा. त्याचे शेतही बहिणाबाईंच्या शेताला लागूनच असावे. तो बहिणाबाईंविषयी सतत वाईट चिंतीत असावा. बहिणाबाई त्याला संतापून म्हणतात, माझे नशीब चांगले म्हणून माझ्या शेतात एवढे चांगले पीक आले. तुला ते दिसत नाही का? की तुझे डोळे फुटलेत? दुसऱ्यांचे चांगले दिवस ज्यांना बघवत नाहीत, अशांवर बहिणाबाई बोट ठेवतात.

२१. रुशी बसे वरमाय
तिचा रुसवा केवढा?
म्हणे पापड वाढला
कसा वाकडातिकडा

('स्फुट ओव्या', 'बहिणाईची गाणी', पृ. ८७)

लग्नप्रसंगात वधूकडच्या मंडळींवर वराकडची मंडळी आपला मोठेपणा गाजवीत असतात. त्यातही नवरदेवाची आई म्हणजे वरमाय हिचा तर तोरा काही वेगळाच! ती केव्हा कशासाठी रुसून बसेल, ते सांगणे कठीणच. या ओवीत वरमाय वाकडातिकडा पापड वाढला म्हणून रुसून बसली आहे. म्हणजे क्षुल्लक कारणावरून रुसणे, फुगणे लग्नसमारंभात नेहमीच घडते, असे बहिणाबाई सुचवितात.

२२. पिको आराटी बोराटी
नको शेतामधी बांध
बरी बिराऱ्याची मया
होऊ नही भाऊबंद

('स्फुट ओव्या', 'बहिणाईची गाणी', पृ. ८७)

दोन शेतांमध्ये असलेल्या बांधावरून शेतकऱ्यांमध्ये नेहमीच भांडणे होत असतात. या बांधावर आराटीबोराटीची काटेरी झाडे उगवलेली असतात. ती चालतात पण दुसऱ्या शेतकऱ्याने त्या जागेत पेरले तर मात्र चालत नाही. मग दोन सख्खे भाऊ जरी शेजारी शेजारी असले तरी चालत नाहीत.

परक्यांची माया परवडली पण भाऊबंद नको. बहुधा दोन शेतांमध्ये या बांधाच्या जागी आराटीबोराटी या काटेरी वनस्पतींऐवजी पेरणीच व्हावी, असे बहिणाबाईंना वाटत असावे.

२३. शेतकऱ्या तुझे हाड
शेतामधी रे मुडले
मुडीसनी झाली राख
तापी माईत पडले

('स्फुट ओव्या', 'बहिणाईची गाणी', पृ. ८७)

शेतकऱ्यांचे जीवन संपूर्ण कष्टातच जाते. हाडांची काडं करून तो शेतीत राबतो. शेवटी मृत्यूनंतर त्याच्या हाडांची राख पवित्र तापी नदीत पडते. पवित्र नदीत अस्थी पडल्याने सद्‌गती प्राप्त होते, असा समज आहे. शेतकऱ्यांच्या कष्टावर आणि मृत्यूनंतर त्याला प्राप्त होणाऱ्या सद्‌गतीवर या ओळी प्रकाश टाकतात.

२४. माझी कपिला तान्हेली
कशी पान्यावर गेल्ही
तिले गाऱ्याने गियली
आन् पान्यानेच पेल्ही'

('स्फुट ओव्या', 'बहिणाईची गाणी', पृ. ८८)

बहिणाबाई आपल्या कपिला गाईच्या मृत्यूसंबंधी माहिती देतात. तान्हेली कपिला पाणी प्यायला गेली आणि चिखलात फसली. त्या गाऱ्यानेच तिला गिळले आणि पाण्यानेच पिऊन टाकले.

कपिलेच्या आठवणीने बहिणाबाईंच्या मनाला वेदना होत असाव्या. त्यांचे दुःखही या चार ओळींतून बोलके होते.

२५. रस्त्यानं चालली
मायबहीन आपली
मांघे फिरी पाह्यं
पाप्या धरत्री कापली

('स्फुट ओव्या', 'बहिणाईची गाणी', पृ. ८८)

रस्त्याने आपलीच मायबहीण जात असताना तिच्याकडे वळून वळून पाहणाऱ्या नीच प्रवृत्तीच्या माणसांबद्दल बहिणाबाई संताप व्यक्त करतात. ही मानवाची दुष्ट, हीन, पापी प्रवृत्ती पाहून धरणीमाता कंपित होते, असे त्या सांगतात.

२६. घाम गायता शेतात
शेतकरी तरसला
तव्हा कुठे आभायात
मेघूराया बरसला!

(‘स्फुट ओव्या’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. ८८)

शेतकरी जीवन कष्टाचेच. पावसाची वाट बघत शेतकरी राबतच राहतो, त्रासतो, जिकिरीला येतो, तेव्हा कुठे आकाशातून मेघराज बरसतो, असे बहिणाबाई सांगतात. खूप कष्ट घ्यावे लागतात, नंतर फळ मिळते, असे त्या सुचवितात.

२७. मेहरूनचा तलाव
नही लहान सहान
आज त्यानं भागवली
जयगावाची तहान

(‘स्फुट ओव्या’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. ८८)

निसर्गातील प्रत्येक घटकाकडे बहिणाबाई श्रद्धापूर्वक बघतात. त्यांचा चिकित्सक दृष्टिकोनही ठिकठिकाणी जाणवतो. मेहरूनच्या तलावाविषयी अभिमानाने त्या सांगतात, की हा तलाव साधासुधा लहानसहान नाही. संपूर्ण जळगावातील लोकांची तहान भागविण्याची त्याच्यामध्ये क्षमता आहे.

२८. अरे वाहत वाहत
आली नदी ‘मेहेरुनी’
तिले म्हणू नका लेंडी
भागवते धोनं पानी

(‘स्फुट ओव्या’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. ८८)

मेहरूनजवळूनच वाहणारी नदी. तिला लोक ‘लेंडी’ म्हणतात. बहिणाबाई मात्र श्रद्धेने नदीकडे बघतात. वाहत वाहत ही नदी मेहरूनला आली, हे भाग्याचेच लक्षण. त्या नदीत कपडे धुता येतात, पाण्याची सोय होते. अशा या परोपकारी नदीला लोकांनी ‘लेंडी’ म्हणू नये, असे त्यांना वाटते.

२९. वटवट्या नारी
तुले वटक्याची सव
तुले देल्हा जल्म
कोन नितातेल देव?

(‘स्फुट ओव्या’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. ८८)

सतत वटवट, आरडाओरड करणाऱ्या स्त्रीला बहिणाबाई स्पष्टच म्हणतात, तुला सतत वटवट करण्याची, रागवण्याची सवय आहे. तुला जन्म देऊन देवाने काय साधले? कोणती हौस भागवून घेतली?

३०. वाटेचं वावर
काटीकुपाटीने बंद
निस्सवली नार
काय करती भाऊबंद?

(‘स्फुट ओव्या’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. ८९)

शेताला काट्याचे कुंपण नसेल तर कुणीही आत शिरून पिकांची नासाडी करू शकतो. कुंपण घातले तर पिकाच्या नासाडीला पायबंद बसून ते सुरक्षित राहते किंबहुना सुरक्षित ठेवता येते; पण जर एखाद्या स्त्रीने ताळतंत्र सोडला, ती स्वैराचार करू लागली तर तिचे भाऊबंदही त्याला आळा घालू शकत नाहीत.

३१. सावकारा, तुझं मन
मन मोहरीएवढं
तुझं राकेसाचं डाच
तुझं पोट रे केव्हढं?

देवा घेनं जलमनं
खुटेनाज तुझ्या दारी
तसं देनं न मरनं
सुटेनाज संवसारी

अरे पांडुरंगा, तुझी
कशी भक्ती करू सांग?
तुझ्या रूपाआड येतं
सावकाराचं सोंग!

('स्फुट ओव्या', 'बहिणाईची गाणी', पृ. ८९)

या तीन ओव्यांपैकी पहिल्या ओवीत सावकराच्या स्वार्थी वृत्तीचे वर्णन आहे. सावकाराचे मन हे मोहरीएवढे म्हणजे अत्यंत संकुचित असे आहे. त्याला पैशाचा हव्यास इतका असतो की राक्षसाप्रमाणे त्याचे पोट असते, म्हणजे त्याला प्रचंड हाव असते.

दुसऱ्या ओवीतून बहिणाबाई सांगतात की कर्ज घेणे आणि जन्म घेणे हे परमेश्वराच्या दारी सतत सुरू असतात. तसेच कर्ज फेडणे आणि मरणे यातूनही कुणी सुटू शकत नाही.

शेवटी बहिणाबाई सावकारी पाशाची किंवा जाचाची सामान्यांच्या मनावर किती पकड असते, ते सांगतात. सतत मनात कर्जाचे, कर्ज देणाऱ्या सावकाराचे विचार येत राहतात. शेवटी त्या परमेश्वरालाच म्हणतात, 'हे परमेश्वरा, अशी स्थितीत मी तुझी भक्ती कशी करू ते तूच सांग, तुला आठवायचा प्रयत्न केला की मूर्तीऐवजी सावकाराचं सोंगच माझ्या डोळ्यांपुढे उभे ठाकते.'

ग्रामीण भागातील कष्टकरी जीवाची ही अगतिकता, हे दुःख हृदय पिळवटून टाकते.

३२. डोये लागले आभायी
मेघा नको रे बरसू
केली नजर खालती
माझे शिपडले आसू

('स्फुट ओव्या', 'बहिणाईची गाणी', पृ. ८९)

डोळे आकाशाकडे केले आणि मेघाला बरसू नकोस म्हणून विनंती केली. नजर खाली केली आणि दु:ख गिळण्याच्या प्रयत्नात आसवे शिंपडली गेली. आकाशाकडे नजर करून दु:खाश्रूंना रोखले; पण खाली बघताच त्यांना आवर घालता आला नाही, ही भावावस्था कवयित्रीने वर्णिली आहे.

३३. भरली येहेर
मोट चाले भराभर
कशाले करतं
कनाचाक कुरकुरं

('स्फुट ओव्या', 'बहिणाईची गाणी', पृ. ८९)

मोट चालताना कना आणि चाक यांचा आवाज येतो. तो आवाज ऐकून बहिणाबाई विचार करतात की पाणी विहिरीचे, तिच्यातले पाणी कमी होते, म्हणून तिने कुरकुरायला हवे. वर आणणारी मोट तिला त्रास होतो म्हणून तिने कुरकुरायला हवे; पण पाण्याने भरभरून वर येत असताना कुरकूर कोण करतं? तर कना आणि चाक. म्हणजेच एखाद्याजवळ भरपूर असल्याने तो दुसऱ्याला काही देत असेल तर तिऱ्हाईत व्यक्तीच कुरकूर करतात. बाहेरच्यांच्याच पोटात का दुखते, हा प्रश्न बहिणाबाईंना पडतो.

साध्यासरळ रचनांमधून बहिणाबाईंनी जीवनातले आणखी एक तत्त्वज्ञान उलगडून दाखवले आहे.

३४. वसांडली मोट
करे धो धो थायन्यात
हुंदडत पानी
जसं तान्हं पायन्यात!

('स्फुट ओव्या', 'बहिणाईची गाणी', पृ. ९०)

पाण्याने भरलेली मोट वर आल्यावर तिच्यामधील पाणी धायन्यात धो धो पडते. ते उसळते. ते पाहून बहिणाबाईंना पाळण्यात हुंदडणारे, खेळणारे, हसणारे तान्हे मूल आठवते. बहिणाबाईंच्या कल्पनाशक्तीची प्रशंसा करावी तेवढी थोडीच!

३५. धर्तीवरील हिर्वय
गेली उडत उडत
अरे उडता उडता
झाली नियी आभायात

('स्फुट ओव्या', 'बहिणाईची गाणी', पृ. ९०)

जमिनीवरील हिरवळ आणि निळे आकाश यांतून बहिणाबाई हिरव्या आणि निळ्या रंगाची संगती लावताना म्हणतात, की जमिनीवरची हिरवळ उडत वर गेली आणि उडता उडता आकाशात पोचेपर्यंत निळी झाली. बहिणाबाईंच्या विलक्षण कल्पनाशक्तीचा हा आणखी एक पुरावा.

३६. उठा उठा बहिनाई
बोंड कपाशीचे येचा
बोटं हालवा हालवा
जशा पाखराच्या चोचा

('स्फुट ओव्या', 'बहिणाईची गाणी', पृ. ९०)

कपाशीच्या हंगामात कापूस वेचून म्हणजेच फुटलेल्या बोंडातून शुभ्र कापूस काढून घेणे हा कापूस काढताना बोटांची विशिष्ट हालचाल होते. ती हालचाल पाहून बहिणाबाईंना चोचीने खाद्य काढणारी पाखरे आठवतात. वेळ न दवडता कापूस गोळा करायच्या आणि भराभर पाखरांच्या चोचीप्रमाणे बोटांची हालचाल करायची, असे त्या म्हणतात.

३७. जव्हा इमान सचोटी
पापामधी रे बुडले,
तव्हा याच मानसानं
किल्ल्या कुलूप घडले!

किल्ल्या राह्यल्या ठिकाणी
जव्हा तिजोऱ्या फोडल्या
तव्हा याच मानसानं
बेड्या लोखंडी घडल्या!

('स्फुट ओव्या', 'बहिणाईची गाणी', पृ. ९०)

बहिणाबाई प्रत्येकच गोष्टीकडे चिकित्सक दृष्टीने पाहतात. किल्ल्या आणि कुलूप यांची निर्मिती केव्हा आणि का झाली असावी? माणसामधील प्रामाणिकपणा, सत्यनिष्ठा नाहीशी झाली. माणसे पापांमध्ये बुडून गेली, दुसऱ्यावर विश्वास टाकण्याची स्थिती राहिली नाही, तेव्हा माणसाला आपल्या संपत्तीची काळजी वाटू लागली आणि त्याला कलूप-किल्लीचा शोध लावावा लागला.

सुरक्षिततेसाठी कुलूप-किल्लीचा शोध लागला खरा; पण दुष्ट प्रवृत्तींना रोखणे माणसाला जमले नाही. कुलपे तोडून चोऱ्या व्हायला लागल्या. तिजोऱ्या फोडल्या जाऊ लागल्या. तेव्हा या चोरांना शिक्षा देण्याची गरज भासू लागली, म्हणून चोरांच्या हातापायात घालण्यासाठी लोखंडी बेड्या निर्माण कराव्या लागल्या.

बहिणाबाईंच्या प्रगल्भ प्रतिभेची साक्ष येथे मिळते.

३८. माझं दुखं, माझं दुखं
जशी आंधारली रात
माझं सुखं, माझं सुखं
हातातली काडवात

('स्फुट ओव्या', 'बहिणाईची गाणी', पृ. ९०)

वाईटाची तुलना अंधाराशी तर चांगल्याची तुलना प्रकाशाशी केली जाते. दुःख माणसाला अंधाऱ्या रात्रीप्रमाणे भयंकर भासते तर सुख माणसाला प्रकाशणाऱ्या हातातल्या काडवातीप्रमाणे भासते. मानवी प्रवृत्तीचे दर्शन बहिणाबाई येथे घडवितात.

३९. माझं दुखं, माझं दुखं
तयघरात कोंडले
माझं सुखं, माझं सुखं
हांड्याझुंबरं टांगले!

('स्फुट ओव्या', 'बहिणाईची गाणी', पृ. ९१)

सुखदुःखाचा विचार माणसाने कसा करावा? दुःख माणसाने नेहमी तळघरात कोंडावे, म्हणजे मनातल्या कप्प्यात ठेवावे आणि सुख घरात

हंड्याझुंबरे टांगल्याप्रमाणे सर्वांना दाखवावे, म्हणजे सुखात इतरांनाही समाविष्ट करून घ्यावे.

४०. अरे छापीसनी आलं
मानसाले समजलं
छपीसनी जे राह्यालं
देयालेच उमजलं

('स्फुट ओव्या', 'बहिणाईची गाणी', पृ. ९१)

प्रत्यक्षात माणसाला जितके दिसते, तितकेच तो समजू शकतो. जे त्याला दिसतच नाही, ते समजत नाही आणि ते केवळ परमेश्वरच जाणतो. म्हणून बहिणाबाई म्हणतात, जे छापून आले, ते माणसाला समजले, जे छापून उरले ते परमेश्वरच जाणतो.

४१. अरे देवा तुझं देनं
नही सरलं सरलं
देलं मोटभरी दान
पोट भुकेलं उरलं!

('स्फुट ओव्या', 'बहिणाईची गाणी', पृ. ९१)

ह्या ओळी शेतकरी जीवनाशी संबंधित आहेत. परमेश्वराच्या कृपेला अंत नसतो. बहिणाबाई म्हणतात की, 'परमेश्वरा तुझं देणं सरलं नाही. तू खूप दिलंस; पण तरीही माणसाचं पोट भुकेलंच राहिलं.' धान्याच्या राशी शेतकरी पिकवतो, पण त्याला पुरेसं अन्नही मिळत नाही, हे त्यांना सुचवावयाचे असावे.

४२. अरे देवा तुझं घेनं,
काही नही, काही नही
तुझ्या पुढचा निवद
मानुसज जातो खाई!

('स्फुट ओव्या', 'बहिणाईची गाणी', पृ. ९१)

परमेश्वर प्राणिमात्रांकडून कुठलीही अपेक्षा ठेवत नाही. परमेश्वराला काही द्यावे लागत नाही. त्याच्यापुढे ठेवलेला नैवेद्यही माणूसच खातो.

बहिणाबाईंची परमेश्वराप्रती कृतज्ञता, श्रद्धा, निष्ठा या ओळींमधून सहज व्यक्त होते.

४३. गानं आलं कानामधी
बुगडीले काय त्याचं?
वास गेला नाकामधी
नथनीले काय त्याचं?

('स्फुट ओव्या', 'बहिणाईची गाणी', पृ. ९१)

बहिणाबाईंच्या चिंतनशीलतेला तोड नाही. गाण्यातला आनंद कानांना समजतो. कानातल्या बुगडीला त्याचे काही घेणेदेणे नसते. त्याचप्रमाणे कुठलाही गंध नाकाला जाणवतो. नाकातली नथनी ते अनुभवू शकत नाही. ज्या गोष्टीत जे सामर्थ्य तोच अनुभव त्याला येतो, इतरांना नाही.

४४. सोता झाला रे आरसा
असा मनाचा जो साफ
तठी कशाचं रे पाप
त्याले सात गुन्हे माफ!

('स्फुट ओव्या', 'बहिणाईची गाणी', पृ. ९२)

सद्‌वर्तनी, निर्मळ स्वभावाच्या व्यक्तीविषयी बहिणाबाई सांगतात की, जो पवित्र, सत्शील, निर्मळ मनाचा असतो. तो स्वतःच स्वतःचा आरसा असतो. इतरांना विचारण्याची त्याला गरज नसते. स्वतःच्या अंतर्मनात स्वतःचा निर्मळपणा तो पाहतो. अशा व्यक्तीत पापाचा प्रवेश कसा होणार? त्याच्याकडून गुन्हा कसा घडेल? अशा व्यक्तीची प्रशंसा करताना त्या म्हणतात, की अशा सज्जनाला सात गुन्हेही माफ असतात. एकंदरीत अशी व्यक्ती पाप करूच शकत नाही.

४५. माय म्हनता म्हनता
होट होटालागे भिडे
आत्या म्हनता म्हनता
केवढं अंतर पडे दडे

('स्फुट ओव्या', 'बहिणाईची गाणी', पृ. ९२)

बहिणाबाई भाषाशास्त्राच्या अभ्यासक नव्हत्या. त्यांनी शाळाही बघितली नव्हती; पण त्यांची उदाहरणे व्याकरणकारालाही लाजवतात. प, फ, ब, भ, म ही 'प' वर्गातील व्यंजने उच्चारताना ओठांना ओठ भिडतात तर स्वरांचे उच्चारण करताना ओठ एकमेकांना चिकटत नाहीत. 'माय' हा शब्द उच्चारताना ओठाला ओठ टेकतात आणि 'आत्या' हा शब्द उच्चारताना ओठात पडणारे अंतर म्हणजे मायच्या तुलनेत आत्याच्या प्रेमात, जिव्हाळ्यात असणारा दुरावा होय.

४६. माय म्हतली म्हतली
जशी तोंडातली साय
बाय म्हतली बिराणी
जशी भरडली दाय

('स्फुट ओव्या', 'बहिणाईची गाणी', पृ. ९२)

'माय'च्या उच्चारणात गोडवा आहे. त्याकरिता बहिणाबाई 'माय'ला 'साय'ची उपमा देतात; पण 'बाय' म्हणजे परक्या बाईविषयी उच्चारताना जी जाणीव, जी संवेदना होते, ती जशी भरडलेली दाळ. पुन्हा 'माय'ची जवळीकता बहिणाबाईंनी वर्णिली आहे.

४७. ताता म्हनता म्हनता
दातामधी जीभ अडे
काका म्हनता म्हनता
कशी मांघे मांघे दडे

('स्फुट ओव्या', 'बहिणाईची गाणी', पृ. ९२)

उच्चारणाच्या संदर्भात बहिणाबाईंचे सूक्ष्म निरीक्षण आणि जीवनातील जोडलेली संगती खरोखर त्यांच्या विलक्षण आकलनशक्तीचा नमुना आहे.

'माय'च्या उच्चारणातील गोडवा वर्णिल्यानंतर बहिणाबाई चौधरी 'ताता' आणि 'काका' या शब्दांच्या उच्चारणातील गमती आणि त्यासंदर्भातील त्यांचे विचार मांडतात. 'ताता' म्हणजे वडील. 'ताता' हा शब्द उच्चारताना जीभ दातात अडते आणि 'काका' म्हणताना जीभ मागे मागे दडते. 'ताता' उच्चारताना दातात अडणारी जीभ 'काका' उच्चारताना मागे मागे दडणारी जीभ दोघांचीही जरब दाखवते; पण काकांपेक्षा 'ताता' जवळचे. म्हणजे

आदरयुक्त जरब म्हणून अडणारी जीभ आहे. काका थोडे दूरचे, म्हणून ती मागे अडणारी जीभ, असे बहिणाबाई नमूद करतात.

४८. जीजी म्हनता म्हनता
झाला जीभले निवारा
सासू म्हनता म्हनता
गेला तोंडातून वारा!

('स्फुट ओव्या', 'बहिणाईची गाणी', पृ. ९२)

जीजी म्हणजे मावशी. 'जीजी' उच्चारताना जीभ टाळूला चिकटून असते. जणू तिला निवारा मिळतो; पण 'सासू' उच्चारताना तोंडून वारा निघून जातो. मावशीची जवळीकता, प्रेमळ आश्रय आणि सासू म्हणजे दुराव्याची भावना. बहिणाबाईंच्या व्याकरण आणि व्यक्तिविशेष संबंधांची सांगड घालण्याची ही प्रक्रिया त्यांच्या असाधारण कल्पकतेची द्योतक आहे.

अशा ह्या बहिणाबाईंच्या स्फुट ओव्या. जीवनानुभूती, कल्पनासामर्थ्य, सूक्ष्म निरीक्षणशक्ती, विलक्षण बुद्धिमत्ता या सगळ्यांची प्रचिती त्यांच्या ह्या ओव्यांवरून येते.



# म्हणी

'संध्यासमयी आभाळात खुलणारे रंग जसे प्रत्यक्षच बघायला हवे, वर्णनाने नाही समाधान लाभणार; पहिल्या पावसाने पृथ्वीचा येणारा मृदगंध, तोही अनुभवायलाच हवा; तसेच परमावधीचे सुंदर, संपन्न भावविश्व, शब्दविश्व, कल्पना, भावना, बुद्धी या साऱ्यांचे वैभव मिरवीत, सहजभावाने जन्माला आलेले बहिणाबाईंचे काव्य म्हणजे साखरेची गोडी - घेतल्याशिवाय नाही समजणार! ही सारीच अभिव्यक्ती म्हणजे 'एका दैवी प्रतिभेचा आविष्कार' असेच म्हणावे लागेल, केवळ अवर्णनीय, अनुभवण्याजोगा!"[१] हा अनुभव एकांगी नाही. बहिणाबाईंच्या रचना विविधांगी आहेत. त्यांनी रचलेल्या काही शब्दबंधांना म्हणीचे स्वरूप प्राप्त झाले आहे तर काही म्हणी ग्रामीण परिसरात नित्य वापरल्या जाणाऱ्या आहेत.

म्हणी हे भाषेचे आविभाज्य अंग असते. मोजक्या शब्दांत मोठा आशय व्यक्त करणे, हे म्हणींचे काम. कधी ह्या म्हणी विसंगतीवर बोट ठेवतात, कधी वस्तुस्थिती प्रगट करतात. मराठी भाषेत पुरातन काळापासून अनेक म्हणी अस्तित्वात आहेत. बहिणाबाईंनी रचलेल्या म्हणी मराठी वाङ्मयाला मिळालेली अपूर्व अशी देण आहे. बहिणाबाईंच्या एकोणतीस म्हणींचा समावेश 'बहिणाईची गाणी' या पुस्तकात करण्यात आला आहे. 'म्हणी' या शीर्षकाखाली कंसामध्ये 'सहज बोलता बोलता प्रसंगानुसार सुचलेल्या कै. बहिणाबाईंच्या उत्स्फुर्त म्हणी' असे वाक्य जोडले आहे.

१. 'दया नाही, मया नाही, डोयाले पानी
गोगलगायच्या दुधाचं काढा वो लोनी'

('म्हणी', 'बहिणाईची गाणी', पृ. १०५)

ज्या गोष्टीत अंतःकरणाचा ओलावा नसतो, पण तो असल्याचे भासवले जाते, तिथे ही म्हण लागू पडते. अंतःकरणात दया नाही, माया नाही, तरीही डोळ्यांत पाणी आणणे म्हणजे जसे गोगलगाईच्या दुधाचे लोणी काढणे होय. मुळात गोगलगाय छोटीशी. तिच्या दुधापासून लोणी काढणे म्हणजे अशक्यप्राय! खोटा दिखावा करणाऱ्यांना ही म्हण लागू पडते.

२. 'हौस केली लिसळीले गोंधलं
मोंढ्या बैलाले बाशिंग बांधलं'

('म्हणी', 'बहिणाईची गाणी', पृ. १०५)

काहीतरी हौस केली आणि लिसळीला म्हणजे अस्वलाला गोंधले आणि बिनशिंगाच्या बैलाला बाशिंग बांधले. वास्तविक केसाळ अस्वलाच्या अंगावर गोंधणे शक्य नाही किंवा उपयोगाचे नाही आणि शिंग तुटलेल्या बैलाला बाशिंग बांधणेही शक्य नाही. म्हणजेच अनाठायी गोष्टींचा प्रयत्न करणे.

३. ‘चुल्ह्याची माटी आगीन खाये
माथनीची पाटी पानी पेये’

(‘म्हणी’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. १०५)

चूल आणि माठ या दोन्ही गोष्टी मातीपासून बनतात. चुलीत जाळ जळत राहिल्याने तिची झीज होते. त्याला बहिणाबाई ‘चुल्ह्याची माटी आगीन खाये’ असे म्हणतात, तर दुसरीकडे माठाची माती पाणी पिते म्हणजे माठाचे पाणी झिरपत राहते. माठातले पाणी कमी होत असल्याने ‘माथनीची माटी पानी पेये’ असे बहिणाबाई म्हणतात. बहिणाबाईंच्या सूक्ष्म निरीक्षणशक्तीचे हे एक उदाहरण आहे.

४. ‘रस्त्यात पडला सोन्याचा वाया
तिकडून आला भगा आभाया’

(‘म्हणी’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. १०५)

रस्त्यात सोन्याचा वाळा पडलेला असतो आणि ‘भगा’ नावाचा माणूस आभाळाकडे बघत चाललेला असतो. त्याचे लक्ष सोन्याच्या वाळ्याकडे जात नाही. मानवी जीवनात अनेकदा मौल्यवान वस्तूंच्या जवळ जाऊनही इतरत्र लक्ष असल्याने ती वस्तू तो मानव गमावून बसतो. म्हणजे एखाद्या चांगल्या गोष्टीच्या जवळ असूनही त्याची जाणीव नसल्याने किंवा वेंधळेपणाने माणूस ती गमावतो.

५. ‘शिदोळाले आला राग
माले म्हना फन्या नाग’

(‘म्हणी’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. १०५)

शिदोळ म्हणजे गांडूळ. त्याला राग आला कारण त्याला सर्वांनी फणा असलेला नाग म्हणावे, ही त्याची इच्छा. वास्तविक नाग आणि गांडूळ ह्यांची

तुलना होऊ शकत नाही. दोघांचेही स्वभावधर्म वेगळे असतात. एखाद्या व्यक्तीमध्ये पात्रता नसतानाही इतरांनी त्याला श्रेष्ठ म्हणावे, ही इच्छा बाळगणाऱ्या व्यक्तीला ही म्हण लागू पडते.

६. ‘कुजात नारले काय सांगे माहेर
काटेसायरले केला मलमलचा आहेर!’

(‘म्हणी’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. १०५)

काटेरी सायरच्या अंगावर तीक्ष्ण काटे असल्याने एखादे मलमली तलम वस्त्र अंगावर घातले तर ते फाटून जाते, म्हणजेच काटसायरच्या अंगावर वस्त्र घालणे म्हणजे अनाठायी प्रयत्न. माहेरच्या जवळच्या लोकांनी हित सांगूनही न ऐकणाऱ्या द्वाड स्त्रीला कसे वागावे, हे सांगताना बहिणाबाईंनी काटसायरचे उदाहरण दिले आहे. म्हणजेच एखाद्या द्वाड स्त्रीला कोणीच समजवू शकत नाही.

७. ‘जल्मदात्या मायजागी, सवतर माय आल्या
जशा खिरनीच्या झाडाले, निंबोया आल्या’

(‘म्हणी’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. १०५)

ज्या मुलांवरचे मातृप्रेमाचे छत्र अकाली नष्ट होते, त्यांच्या दुःखाची तीव्रता फार अधिक असते. जन्मदात्री माय जाते आणि सावत्र आई येते. जणू खिरणीच्या झाडाला निंबोळ्या आल्यागत स्थिती होते. खिरणी खायला खूप गोड असते, तर निंबोळी ही अत्यंत कडू असते. सख्या आईचे प्रेम सावत्र आईकडून मिळू शकत नाही.

८. ‘कडू खानं रुचेना, कडू बोलनं रुचे
अशी कशी दुजाभाई, बोल वो वाचे’

(‘म्हणी’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. १०५)

जिभेला कडू खायला आवडत नाही; पण कडू बोलायला आवडते. बहिणाबाई जिभेला विचारतात की, हा दुजाभाव का? बहिणाबाईंचे मानवी स्वभावाचे हे सूक्ष्म निरीक्षण वाखाणण्याजोगे आहे.

९.	‘पोट म्हने भरलं पोतं
	जीभ म्हने तुझं काय जातं?’

('म्हणी', 'बहिणाईची गाणी', पृ. १०५)

देणाऱ्याने कितीही दिले तरी घेणाऱ्याला मर्यादा असतात. जिभेने चाखत जावे, पोटाने रिचवत जावे. पोत्याप्रमाणे पोट फुगले की ‘भरले आता’ म्हणावे आणि जिभेने विचारावे की ‘आयते मिळतेय, तेही जड जातेय?’ कदाचित जिभेला चवीचा आनंद मिळत असल्याने तिला मर्यादा नसाव्या; पण पोटाचे तसे नसते.

१०.	‘आरशी झाली पारखी
	आता मी कोनासारखी?’

('म्हणी', 'बहिणाईची गाणी', पृ. १०५)

आरसाच नाही तर रूप कसे पाहायचे? या म्हणीला त्यांच्या वैयक्तिक जीवनाचा संदर्भ आहे. तिसाव्या वर्षी वैधव्य आल्यावर आरशाची गरजच उरली नाही. कुंकूच गेले तर आरशी तोंडासमोर हवीच कशाला? त्यांच्या हृदयातील कारुण्याची झालर या ओळींना आहे.

११.	‘केसावर रुसली फनी
	एकदा तरी घाला माझी येनी’

('म्हणी', 'बहिणाईची गाणी', पृ. १०५)

ही एक गमतीदार म्हण आहे. फणीला केसांचा राग येतो. ती रुसते आणि केसांना म्हणते की, ‘मी नेहमीच तुमची वेणी घालते. एकदा तरी तुम्ही माझी वेणी घाला.’ जी गोष्ट घडणे शक्य नाही त्या गोष्टीची अपेक्षा करणे निरर्थकच नाही का?

१२.	‘कऱ्याले गेली नवस
	आज निघाली आवस’

('म्हणी', 'बहिणाईची गाणी', पृ. १०६)

या म्हणीला विनोदाची छटा तर आहेच, पण एक बोधही त्यातून मिळतो. एखादी चांगली गोष्ट कधी नव्हे ती करण्याचे योजावे आणि अडथळा यावा नि परत फिरावे, हा मानवी स्वभावही येथे चित्रित होतो. एक बाई नवस

करायला निघाली खरी, पण तो नेमका अमावस्येचा दिवस होता. अमावस्येचा दिवस शुभ मानला जात नाही. मग त्या बाईला नवस कसा करता येणार? हा दैवदुर्विलासच म्हणावा लागेल.

१३. ‘आग्या टाकीसनी चुल्हा पेटत नही
टाया पिटीसनी देव भेटत नाही’

(‘म्हणी’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. १०६)

काजवा प्रकाशतो म्हणून तो चुलीत टाकला तर चूल पेटेल का? नाही. काजवा अग्नी प्रज्वलित करू शकणार नाही. त्याचप्रमाणे केवळ टाळ्या वाजवल्याने परमेश्वर भेटणार नाही. वरवर भक्तीचा आव आणणाऱ्यांना देव भेटत नसतो. अंतरी खरा भाव असावा लागतो. बहिणाबाईंच्या वैचारिकतेच्या उच्च पातळीचे हे उदाहरण आहे.

१४. ‘ज्याच्या हाताले घट्टे
त्याले देव भेटे’

(‘म्हणी’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. १०६)

जी व्यक्ती कठोर परिश्रम करते, जिच्या हाताला घट्टे पडतात, त्याच व्यक्तीला परमेश्वर भेटतो. या म्हणीतून कर्माला महत्त्व देणाऱ्या बहिणाबाईंची ओळख होते. निरपेक्ष मनाने कष्ट करावे, हा संदेश बहिणाबाई देतात.

१५. घरावऱ्हे कौल चढतं ते दिसतं,
कौलावर देनं चढतं, ते दिसत नही’

(‘म्हणी’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. १०६)

कौलारू घरे सुंदर दिसतात. घराच्या छतावर कौलं चढवली जातात, तेव्हा सर्वांना दिसतात; पण घर बांधताना झालेले कर्ज मात्र लोकांना दिसत नाही. लोकांना वरवरची सुबत्ता पाहून बोलायला आवडते; परंतु त्याकरिता घेतलेले कष्ट, कर्ज अशा गोष्टी, वस्तुस्थिती मात्र दिसत नाही. ती जाणून घेण्याचा प्रयत्नही ते करीत नाहीत. मानवी प्रवृत्तीवर बहिणाबाईंनी बोट ठेवले आहे.

१६. 'आसू नही ती सासू कशाची?
आसरा नही तो सासरा कशाचा?'

('म्हणी', 'बहिणाईची गाणी', पृ. १०६)

अश्रूंचा संबंध केवळ दुःखाशीच नसतो, तर माया, जिव्हाळा, तळमळ यांच्याशीही असतो. ज्या सासूच्या मनात सुनेबद्दल जिव्हाळा नाही, आस्था नाही, जी सासू सुनेच्या दुःखात समरस होत नाही, ती सासू काय कामाची? तसेच जो सासरा आपल्या सुनेला खंबीर आधार देत नाही, तो सासरा काय कामाचा? सासरी आल्यावर सुनेला लेकीप्रमाणे सासूसासऱ्यांनी वागवावे, तिच्यासाठी सासूच्या डोळ्यांत आसवे यावीत, सासऱ्याचा आधार सुटू नये, ही बहिणाबाईंची अपेक्षा आहे. सासू-आसू, सासरा-आसरा या शब्दांची त्यांनी घातलेली सांगड मार्मिक अशी आहे.

१७. 'हातामधी घडाय
फुकट गेला याय'

('म्हणी', 'बहिणाईची गाणी', पृ. १०६)

वेळेचे महत्त्व माणसाने लक्षात घ्यायला हवे. वेळ वाया न दवडता सत्कारणी लागावा. त्याकरिता त्या म्हणतात, हातात घड्याळ असूनही दिवस फुकट घालवला. एखाद्या प्रसंगानंतर त्यांना ही म्हण सुचली असावी.

१८. 'पोटामधी घान, होटाले मलई
मिय्याच्या तांब्याले भाइरून कल्हई'

('म्हणी', 'बहिणाईची गाणी', पृ. १०६)

मनात वाईट विचार असले तरी गोड बोलणारी माणसे पाहून बहिणाबाईंना मिय्याचा तांब्या आठवतो. त्याचे बाह्यस्वरूप ॲल्युमिनियम किंवा जर्मनच्या चकाकीचे असले तरी आतून तो काळपट, घाणेरडा असतो. बाहेरून कलई; पण आत घाण असलेल्या ह्या मिय्याच्या तांब्याची उपमा वरवर गोड बोलून मनात वाईट चिंतणाऱ्या लोकांना चपखल लागू पडते. समाजात अशी माणसे जागोजागी आढळतात. बहिणाबाईंनाही अशा माणसांचा वाईट अनुभव आला असावा.

१९.	'तवा खातो भाकर, चुल्हा भुकेला
पव्हरा पेतो पानी, रहाट तान्हेला'

('म्हणी', 'बहिणाईची गाणी', पृ. १०६)

चूल-तवा, रहाट-बादली अशा जोड्यांतून बहिणाबाईंनी जीवनातील विसंगती टिपली आहे. चुलीवरच्या तव्याला भाकरीचा लाभ होतो, चूल मात्र उपाशी राहते. तसेच रहाटाने विहिरीतून काढलेल्या पाण्याचा बादलीला लाभ होतो, रहाट मात्र तान्हेलाच राहतो. पुष्कळदा दोघांच्या साह्याने घडणाऱ्या गोष्टींचा लाभ एकालाच होतो व दुसरा त्यापासून वंचित राहतो.

२०.	'मानसानं घडला पैसा
पैशासाठी जीव झाला कोयसा'

('म्हणी', 'बहिणाईची गाणी', पृ. १०६)

माणसाने पैशाचा शोध लावला. स्वतःच्या सुखासाठी, आनंदासाठी, मनःशांतीसाठी पैसा निर्माण केला; पण याच पैशापायी त्याचा जीव कोळसा झाला. त्याचे आयुष्य करपून गेले. तो दुःखी झाला. मानवी जीवनातील हे आणखी एक तथ्य!

२१.	'मानूस मोठा हिकमती, याचं घोंगडं त्याच्यावर
दगडाचा केला देव, शेंदूराच्या जीवावर'

('म्हणी', 'बहिणाईची गाणी', पृ. १०६)

हिकमती म्हणजे कावेबाज. आपले घोंगडे दुसऱ्यावर टाकून हा माणूस आपला कावा साधत असतो. दुसऱ्याकडून काम करवून घेणे, स्वार्थ साधणे, स्वतः काही न करणे असा मानवी स्वभाव. दगडाला तो शेंदूर फासतो आणि लोक दगडाला देव मानू लागतात. शेंदूर लावल्यामुळे ते घडते; पण माणूस त्याचे श्रेय घेतो. शेंदूर फासून दगडाला देव बनविणाऱ्या माणसाचे स्वरूप उलगडवणारी ही म्हण. मानवी जीवनातील कावेबाजपणा सोबतच श्रद्धांच्या फोलपणावरही प्रकाश टाकते.

२२.	'घोड घोड म्हतलं, लढ्याले जुतलं!
हातामधी फूल धरलं, उराशानं नाक भरलं'

('म्हणी', 'बहिणाईची गाणी', पृ. १०६)

कोणत्याही गोष्टीचा योग्य ठिकाणीच उपयोग व्हायला हवा. घोड्याला घोडागाडीलाच जुंपले पाहिजे. गाड्याला जुंपून उपयोग नसतो. हातात हुंगण्यासाठी फुल घ्यायचे आणि सर्दी झालेली असेल तर फुलाचा सुगंध कसा येणार? योग्य गोष्ट योग्य गोष्टीशीच संबंधित असावयास हवी, असे कवयित्रीला वाटते.

२३. 'भयान्यानं दुकानदारी केली, तराजूवर जप्ती आली
डोयीवर गुयाची भेली, वानी गल्लीत इक्याले गेली'

('म्हणी', 'बहिणाईची गाणी', पृ. १०६)

व्यवहारज्ञान नसेल तर मनुष्य अपयशी ठरतो, हे पटविणारी ही म्हण आहे. व्यवहारशून्य माणसाने दुकानदारी केली तर दुकानातील तराजूवर जप्तीच आली. डोक्यावर गुळाची भेली घेतली आणि विकायला कुठे नेली तर वाण्यांच्या गल्लीत! तिथे गुळाचा अगोदरच सुळसुळाट असतो आणि त्यात ह्या व्यवहारशून्य व्यक्तीचा गुळाची भेली विकण्यासाठी प्रवेश! जीवनाच्या यशापयशात व्यवहारज्ञानाचा मोठा वाटा असतो, असे बहिणाबाई सांगतात.

२४. 'तयापायाले भेटे धरतीमायी
तयहात राहाले आधरतायी'

('म्हणी', 'बहिणाईची गाणी', पृ. १०६)

मानवी अवयवांकडेही बहिणाबाई वेगळ्या दृष्टिकोनातून बघतात. चालताना तळपायांना धरणीचा स्पर्श होतो, मात्र तळहात अधरतायी म्हणजे वरच्या वर, अधांतरी राहतात. काहींच्या जीवनाला आधार तर काहींचे जीवन अधांतरी असते, हे तर बहिणाबाईंना सुचवावयाचे नसावे?

२५. 'डोयाले आली लाली
चस्म्याले औसदी लावली'

('म्हणी', 'बहिणाईची गाणी', पृ. १०६)

डोळे येतात, लाल होतात. इतरांपर्यंत या साथीचा संसर्ग होऊ नये म्हणून औषधासोबतच काळा चश्माही लावावा लागतो. म्हणजे चश्म्याचा उपयोगही औषधाप्रमाणेच होतो, हे निरीक्षण बहिणाबाईंनी शब्दांत मांडले आहे.

२६. 'आगीचं मडकं, बांदरानं धरलं
मरनाराचं हासू झालं'

('म्हणी', 'बहिणाईची गाणी', पृ. १०७)

प्रेतयात्रेत आगीचे मडके मुलगा किंवा पती धरतो, परंतु जर ते भलत्याच व्यक्तीने धरले तर हसू होते, अयोग्य म्हटले जाते म्हणून गमतीने बहिणाबाई म्हणतात, आगीचे मडके माकडाने धरले आणि मरणाऱ्याचेच हसू झाले.

२७. 'वडगन्याले ठान नही,
घरकोंबड्याले ग्यान नही,
घरजवायाले मान नही'

('म्हणी', 'बहिणाईची गाणी', पृ. १०७)

या म्हणीत बहिणाबाईंनी तीन गोष्टी निदर्शनास आणून दिल्या आहेत. वडगन म्हणजे दारोदार हिंडणारा. तो सतत इकडे तिकडे फिरत असतो, त्याला निश्चित ठावठिकाणा नसतो. जो माणूस घरातच बसून असतो, बाहेरच्या जगात मिसळत नाही, अशा घरकोंबड्याला ज्ञान नसते. जावई म्हटला की सासरी मान असतोच; पण घरजावई होऊन सासऱ्याकडेच राहणाऱ्या जावयाला योग्य मान दिला जात नाही. अशी तिन्ही प्रवृत्तींच्या माणसांवर बहिणाबाईंनी टीका केली आहे.

२८. 'मस्तकातलं पुस्तकात गेलं
पुस्तकातलं मस्तकात आलं'

('म्हणी', 'बहिणाईची गाणी', पृ. १०७)

लेखनप्रक्रिया आणि आकलनप्रक्रिया यांचा संबंध या म्हणीतून बहिणाबाईंनी उलगडून दाखवला आहे. जे माणसाच्या डोक्यात असते, ते पुस्तकात उतरते. पुस्तके निर्माण झाली की ती वाचली जातात. पुस्तके वाचली की माणसाला ज्ञान प्राप्त होते म्हणजे ते माणसाच्या डोक्यात जाते.

२९. 'म्हननारानं म्हन केली
जाननाराले अक्कल आली'

('म्हणी', 'बहिणाईची गाणी', पृ. १०७)

म्हणींची निर्मिती, उपयुक्तता यांवर प्रकाश टाकणारी ही म्हण. कुणीतरी म्हण निर्माण केली. ज्याने त्यातले मर्म जाणले, तिचा अर्थ समजून घेतला, तो शहाणा झाला. म्हणी मोजक्या शब्दांनी गुंफल्या असतात; परंतु त्यात आशय व्यापक असतो. म्हणींचे महत्त्व बहिणाबाईंनी म्हणीतूनच मांडले आहे.

बहिणाबाईंच्या म्हणी त्यांच्या सूक्ष्म निरीक्षणशक्ती आणि कल्पनाशक्तीचा परिचय देतात. जीवनाशी सांगड घालणारी तत्त्वे प्रकट करतात. अल्पाक्षरांतून मोठा मथितार्थ प्रकट करणाऱ्या या म्हणी म्हणजे मराठी सारस्वताला मिळालेली मोठी देण आहे.



## संदर्भ :

१. चौधरी, स्नेहलता, 'एक होत्या बहिणाई', भूमिकन्या बहिणाबाई चौधरी : एक चिंतन, द्वितीयावृत्ती, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, २००२, पृ. ४.



# बहिणाबाईंचे शब्दभांडार आणि प्रतिमासृष्टी

काबाडकष्ट करीत, परिस्थितीला सामोरे जात बहिणाबाई चौधरींनी निसर्गाशी आपले नाते जोडले. समाजात वावरताना, शेतीकाम करताना आणि आपल्या मुलांचे पालनपोषण करताना त्यांच्या चौकसवृत्तीने असंख्य निरीक्षणे मनःपटलावर नोंदविली. त्यातून त्यांना असंख्य म्हणी, वाक्प्रचार, शब्द मिळत गेले. त्यांच्यामध्ये उपजतच असलेल्या काव्यरचनेच्या गुणाला त्यामुळे संजीवनी मिळाली.

बहिणाबाईंची भाषा आणि शब्दभांडार हे अहिराणी, खान्देशी बोलीभाषेशी, प्रदेशाशी आणि शेतकरी जीवनाशी संबंधित आहे. 'धांडा' (ओल्या कडब्याचे थोटूक), 'तावा', 'चुल्हा' (चूल), 'बैतन' (सरपण, जळण), 'फुकनी', 'धुक्कूय' (धूर), 'मया' (माया, प्रेम), 'खाकस' (खसखस) असे ग्रामीण स्त्रीजीवनाशी संबंधित कितीतरी शब्द शहरी रसिक-वाचकांना नवीन वाटतात. 'आग्या' (काजवा), 'आढवानी' (अनवाणी), 'आवतन' (आमंत्रण), 'कारोन्या' (करुणा), 'खैमाना' (सत्यनाश), 'घरोट' (जाते), 'डाडोर' (पोटाची ढेरी), नानावटी (श्रीमंत), निमानतोंड्या (दुर्मुखलेला), 'बिरान्याची' (परक्याची), 'मदन' (कणसे रगडून झालेला राडा), 'येडजाना' (निरक्षर, अडाणी), 'वाहारी' (सून), 'हिरीत' (हृदय) असे हे बहिणाबाईंचे शब्दभांडार त्यांच्या परिसरात वापरात असले तरी प्रथमतःच मराठी साहित्याला मिळाल्याने त्याचे महत्त्व अधिक वाटते.

म्हणींचेही तसेच आहे. तत्कालीन जळगाव-खान्देशच्या परिसरात वापरल्या जाणाऱ्या म्हणी बहिणाबाईंमुळे पुढे आल्या. 'हातामधी घडाय फुकट गेला याय', 'शिदोळाले आला राग, माले म्हना फन्या नाग', 'भरली येहेर, मोट चाले भराभर, कशाले करतं, कनाचाक कुरकुर', 'आरशी झाली पारखी, आता मी कोनासारखी?', 'आसू नही ती सासू कशाची? आसरा नही तो सासरा कशाचा?' अशा कितीतरी म्हणींचा परिचय येथे होतो.

बहिणाबाई भाषाशास्त्रज्ञ नव्हत्या; पण त्यांच्या काही रचना वाचताना त्या एखाद्या भाषा अभ्यासकाप्रमाणे कविता प्रसवतात की काय, असा प्रश्न पडतो.

'माय म्हनता म्हनता
होट होटालागे भिडे
आत्या म्हनता म्हनता

केवढं अंतर पडे दडे’
(‘स्फुट ओव्या’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. ९२)

‘जीजी म्हनता म्हनता
झाला जीभले निवारा
सासू म्हनता म्हनता
गेला तोंडातून वारा!’
(‘स्फुट ओव्या’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. ९२)

दोन नात्यांमधील जवळीक-दुरावा किती विलक्षण टिपला आहे? आणि तो प्रकट करताना बहिणाबाईंनी भाषाविष्कार किती सहज साधला आहे?

खरेतर त्यांच्या काव्याला नटण्यामुरडण्याची हौस नाही, अलंकारांची अपेक्षा नाही, बहिरंगांचा फाजील सोस नाही. ओघाने त्यांचे काव्य वाक्प्रचार, म्हणी आणि प्रतिमांनी नटते. त्यांच्या रचनांच्या प्रतिमांचे अधिष्ठान ‘धरित्री’ हेच आहे. ‘ ‘धरित्री’ ही प्रतिमा बहिणाबाईंच्या काव्यानुभूतीत सुखःदुखाचे प्रतीक बनून येते. ‘धरित्री’ बहिणाबाईंची जन्मदा, ‘धरित्री’ हीच तिची सखी. ‘धरित्री’ कष्टकरी, श्रमकरी वर्गाच्या सृजनशीलतेचे केंद्र आहे. ‘ धरित्री’ मानवी जीवनाच्य अर्थपूर्णतेचे चिन्ह, ‘धरित्री’ ही ग्रामजनाची सुखात्मिकाही आणि शोकात्मिकाही. ‘धरित्री’ या प्रतिमेला बहिणाबाईंच्या कवितेत अर्थपूर्णता, अर्थघनता प्राप्त होते आणि मग बहिणाबाईंच्या काव्यप्रतिभेला ‘धरित्री’ची प्रतिमा सतत खुणावत राहते.’[१] यांच्या काव्यात सातत्याने वावरणारी ही प्रतिमा ‘माझी माय सरसोती’, ‘हिरीताचं देनंघेनं’, ‘धरित्रीला दंडवत’, ‘आता माझा माले जीव’, ‘देव अजब गारोडी’ किंवा कितीतरी ‘स्फुट ओव्यां’मधूनही जाणवते.

‘<u>धरत्री</u>च्या कुशीमधी
बीयबियानं निजली
वऱ्हे पसरली माटी
जशी <u>शाल</u> पांघरली’
(‘देव अजब गारोडी’, ‘बहिणाईची गाणी’, पृ. ३१)

‘<u>धर्ती</u>मधल्या रसानं
जीभ माझी सवादते

तव्हा तोंडातली चव
पिंडामधी ठाव घेते'
('माझी माय सरसोती', 'बहिणाईची गाणी', पृ. ३)

त्यांच्या काव्यात आढळणाऱ्या 'धरित्री'प्रमाणेच 'आभाळ', 'पाऊस', 'मन', 'सपान' या आणि निसर्गाशी संबंधित कितीतरी प्रतिमा भुरळ घालण्याची क्षमता ठेवतात. मानवी मनाचे विश्लेषण करताना –

'मन वढाय वढाय
उभ्या पिकातलं ढोर
किती हाकला हाकला
फिरी येतं पिकावर'
('मन', 'बहिणाईची गाणी', पृ. १८)

पिकातल्या ढोराची प्रतिमा अवतरते तर त्यांच्या पतीच्या निधनानंतर–

'सांग सांग धर्ती माता
अशी कशी जादू झाली
झाड गेलं निंधीसनी
मांघे सावली उरली!'
('आता माझा माले जीव', 'बहिणाईची गाणी', पृ. २२)

निघून गेलेल्या झाडाची आणि उरलेल्या सावलीची प्रतिमा प्रकटते.

'ऊठ सासुरवाशीन बाई
ऊठ जानं, शेतीकामाचा किती घोर
तू गोठ्यामधलं ढोर'
('सासुरवाशीन', 'बहिणाईची गाणी', पृ. ४३)

ढोराप्रमाणे राबणारी सासुरवाशीण तर कधी

'देवा पाऊस पाऊस
तुझ्या डोयातले आंस
दैवा, तुझा रे हारास
जीवा तुझी रे मिरास'
('आला पाऊस', 'बहिणाईची गाणी', पृ. २८)

देवाच्या डोळ्यांतील पाऊस म्हणजे आसू अशी उत्तुंग झेप त्या घेतात.

अशा रचनांमधील त्यांच्या प्रतिमा वाखाणण्याजोग्या आहेत. त्यांच्या काव्यात 'धरित्री' ही प्रतिमा कष्टकऱ्यांचे, शेतकऱ्यांच्या जीवनाचे वास्तव म्हणून तर 'आकाश' ही प्रतिमा त्यांच्या जीवनातील स्वप्नांना, इच्छा-आकांक्षांना प्रकट करते. दोघांच्या मिलनातून निर्माण होणारे धनधान्य, मोत्यासारखी पिके आणि संपन्नता हे सूत्र कितीतरी प्रतिमांना साकार करत जाते. निसर्गातील विविध रंग, पिवळे सोने म्हणजे पीक किंवा धान्य, कापूस वेचतना पाखराच्या चोचीप्रमाणे हात चालवण्याचा सल्ला, वडाची हिरवी पाने, त्याला लागलेली लाल फळे तसेच पळसाच्या झाडाची हिरवी पाने आणि त्याला लागलेली लाल फुले म्हणजे पोपटाची चोच आणि हिरवे पोपट, माय म्हणजे आंब्याची थंडगार सावली, माहेरची वाट म्हणजे मखमल, अशा सुंदर प्रतिमा त्यांनी वापरल्या आहेत. 'मना'च्या बाबतीत तर जीवनातील माणसांचे खोटेनाटे व्यवहार पाहून बोरीबाभळींच्या अंगावर शहारे आले आणि त्या काटेरी झाल्या, ही प्रतिमा तर एखाद्या तत्त्ववेत्त्याची वाटते.

'वाटेवरच्या दगडा'वर बालकवींप्रमाणे बहिणाबाईंनी चेतनागुणोक्तीचा आरोप केल्याचे त्यांच्या 'माहेराची वाट'सारख्या कवितांमधून जाणवते.

'नीट जाय मायबाई
नको करू धडपड
तुझ्याच मी माहेराच्या
वाटंवरला दगड'

('माहेराची वाट', 'बहिणाईची गाणी', पृ. ८)

बहिणाबाईंच्या प्रतिमा या ग्रामीण शेतकरी जीवनाशी निगडित असल्याने सामान्यांना आपल्याशा वाटतात, ओळखीच्या वाटतात. अहिराणी-खान्देशी आणि वऱ्हाडी बोलीतून त्या अवतरल्या असल्याने महाराष्ट्राच्या फार मोठ्या प्रदेशाला त्या आकर्षित करतात. त्यांच्यामधील वात्सल्य, दुःख, स्वप्ने प्रकट होताना त्यांच्या चपखल प्रतिमा सहजगत्या येतात. विविधांगी शब्द, वाक्प्रचार, म्हणी, सुभाषिते यांनी तर त्यांच्या रचनांचे सौंदर्य अधिकच खुलविले असून त्यांना कधी शब्दांची वाण पडली असेल, असे वाटत नाही. त्यांचे कधीही रिते न होणारे शब्दभांडार आणि बोलीभाषेतील गोड म्हणींचा साठा यांमुळे मराठी साहित्याला एक मोठी देण मिळाली. व्यापक निरीक्षणशक्ती आणि कल्पक विचारशक्ती यांमुळे त्यांच्या काही उल्लेखनीय

रचनाच वाक्प्रचार आणि म्हणी म्हणून पुढे आल्या. कुठल्याही विद्यापीठात जाऊन पदवी न घेतलेल्या बहिणाबाईंचे भाषाप्रभुत्व, समर्पक प्रतिमांची जाण आणि कल्पकता पाहून भल्याभल्या अभ्यासक आणि भाषाप्रभूंनाही आश्चर्य वाटल्याशिवाय राहत नाही.



## संदर्भ :

१. चिडगोपकर, (डॉ.) अलका, 'बहिणाबाईच्या काव्यातील प्रतिमासौंदर्य', बहिणाबाईची गाणी : एक काव्यदर्शन, प्रथमावृत्ती, स्नेहवर्धन पब्लिशिंग हाऊस, पुणे, २०००, पृ. ४८.



# सौंदर्य आणि वैशिष्ट्यांनी ओतप्रोत बहिणाबाईंची अजरामर कविता

कवीही जन्माला यावा लागतो आणि कविताही. वाङ्मयाचा प्रारंभबिंदू कविता हाच आहे, ह्यात दुमत नाही. भल्या भल्या दिग्गजांच्या कविता जेव्हा समग्र महाराष्ट्राला भुरळ घालत होत्या, संत, पंत, तंत रचनांचे आदर्श कपाळावर चिकटवून कविता प्रसवली जात होती आणि मराठी सारस्वतात दर्जेदार म्हणून वाखाणल्या जात होती, त्याच वेळी खानदेशातील जळगावात राहणाऱ्या एका शेतकरी कुटुंबातील एक अडाणी स्त्री आपल्यावर कोसळणाऱ्या प्रत्येक संकटांचा सामना करीत, शेतात राबताना किंवा जात्यावर दळताना संसाराची गाणी गात होती. काळ्याशार भूमीत रसरशीत अंकुरासारखी ती रुजली, वाढली आणि त्या भूमीची गाणी तिने गायली. अक्षराचाही गंध नसलेल्या या स्त्रीने मौलिक आणि आशयघन असे काव्य महाराष्ट्राला दिले. जीवनाचे तत्त्वज्ञान कुणीही पहिले सांगितले नसेल इतक्या सोप्या भाषेत सांगणाऱ्या या महान कवयित्रीचे नाव होते - बहिणाबाई चौधरी.

'मराठी साहित्यपरंपरा ही अतिशय उत्कृष्ट आहे. कविता हे तिचं रम्य, भव्य, लावण्यमय, देखणं, साजिरं, गोजिरं रूप आहे. मराठी साहित्याने ग्रंथाच्या प्रांगणात पाऊल टाकलं, ते कवितेचं पैंजण बांधूनच! खान्देश कन्या बहिणाबाई चौधरी यांच्या कवितांच्या पैंजणांचे स्वर रुणझुण करत जनमानसाच्या काळजात उतरले आणि त्या स्वरांनी जनमानस हरखलं, बहरलं, फुललं आणि खुललं. कवितेच्या आकाशातील अढळ असं धृवपद त्यांना मिळालं.'[१]

वयाच्या तेराव्या वर्षी बहिणाबाईंचा विवाह झाला. सर्व कुटुंब एकत्र राहत होते; पण लवकरच ते कुटुंब विभक्त झाले. वाटण्या झाल्या. वाट्याला आलेल्या घरात, मिळालेल्या मोजक्या जमिनीवर कष्ट करत बहिणाबाई पतीसह राहू लागल्या. २-३ वर्षांनी दुष्काळ पडला. दुष्काळाच्या काळात त्यांना खडी फोडण्याचे कामही करावे लागले. बहिणाबाईंनी जो देवाचा प्रथम शोध घेतला तो या परिस्थितीत. 'टाया पिटिसन देव भेटत नाही' हे त्यांनी जाणले. 'ज्याच्या हाताला घट्टे, त्याले देव भेटे।' हे त्यांना पटले. त्यांना दोन मुले आणि एक मुलगी झाली. ओंकार, सोपान आणि काशी. दुर्दैवाने तिशीच्या आतच त्यांच्यावर वैधव्याची आपत्ती कोसळली. संसाररथाचे एक चाक

निखळले. जबाबदारी अंगावर आली. कष्ट वाढले आणि हे कष्ट करता करता त्यांची रचना फुलू लागली. ओव्या रचणाऱ्या या स्त्रीला आपण काव्यनिर्मिती करीत आहोत, याची जाणीवही नव्हती. जात्यातून पीठ सहज पडावे, तशा त्यांच्या रचना घडत गेल्या. अभिजात लाभलेली काव्यप्रतिभा ही त्यांच्या अंतिम श्वासापर्यंत सोबत होती. त्यांचे चिंतनशील सजग मन विविध घटकांचे, प्रसंगांचे, मानवी प्रवृत्तींचे, जीवनव्यवहाराचे निरीक्षण करीत होते. या निरीक्षणातून त्यांची कविता फुलत गेली. वेदनेतून निर्माण झालेली कविता ही हृदयाच्या आतल्या कप्प्यातून येते आणि ती अत्यंत प्रभावशाली ठरते. त्यांच्या कित्येक कवितांना तर तुकोबांच्या रचनांप्रमाणे सुभाषितांचा दर्जा प्राप्त झाला.

इंदिरा संत यांनी बहिणाबाई चौधरींना निसर्गकन्या म्हणून गौरविले आहे. त्या खरेतर भूमीकन्याही आहेत. कारण त्यांच्या अतिशय सुबोध आणि साध्या विषयांवरील सोप्या कवितेतून शेतीविषयक प्रतिमा, निसर्गाचे कौतुक, धरित्रीविषयीचा अभिमान सर्वत्र विखुरलेला आढळतो. त्या स्वतः शेतात राबलेल्या असल्यामुळे शेतीविषयक जाणिवा आणि प्रतिमा त्यांच्या काव्यात विपुलत्वाने आढळतात. त्यांच्या कवितांना लोकगीतांचा बाज जाणवतो.

महाराष्ट्रातील जळगाव, भुसावळ परिसरात जीवन व्यतीत झाल्यामुळे तिथली खानदेशी आणि अहिराणी भाषा हे त्यांच्या काव्याचे विशेष रूप आहे. स्त्रियांची खास अशी वेगळी भाषाही त्यांच्या काव्यातून जाणवते. वरवर दिसायला स्त्री-पुरुषांची भाषा सारखी असली तरी स्त्रियांची काही वैशिष्ट्ये त्यांच्या बोलीतूनही दिसतात. याला कारण जुन्या काळात आर्यांचे भारतात आगमन झाल्यानंतर त्यांना दुसऱ्या समाजातून स्त्रिया स्वीकाराव्या लागल्या. या स्त्रियांनी कालांतराने आर्यांची भाषा आत्मसात केली तरी त्यांची मूळ वैशिष्ट्ये कायम राहिली. बहिणाबाईंची कविता अभ्यासताना स्त्रीभाषेचे असे वेगळे रूप सहजपणे दाखवता येते. या कवितेत स्त्रियांचे दीर्घ उच्चार आहेत. मृदू व्यंजनांचे उच्चार कमी आहेत. शेती, घर, मुलेबाळे हे स्त्रियांचे जग असल्यामुळे त्यातले कितीतरी सूक्ष्म अर्थदर्शक शब्द त्यांच्या कवितेत जागोजागी विखुरलेले आढळतात. 'अवसभर', 'पूनव', 'मामंजी', 'घरोट', 'खिरनी', 'भिलावा', 'हाय' अशा शब्दांनी त्यांनी आपले काव्य सजविले आहे. पूर्वीच्या काळी दळण घरीच जात्यावर म्हणजे घरोट्यावर दळले जात असल्याने गृहिणींचा बहुतांश वेळ दळण्यात जायचा. दळण दळणे हीसुद्धा एक कला होती. त्या कष्टांची जाणीव होऊ नये, म्हणून स्त्रिया जात्यावरची गाणी

गायच्या. जात्यावरील दांडा फिरवताना, त्यात धान्य टाकताना शरीराची विशिष्ट हालचाल होत असते. त्या हालचालीनुसार त्यांच्या मुखावाटे बाहेर पडणारी ही गाणी त्याच तालावर, ठेक्यावर गायली जायची आणि साहजिकच त्या रचनांमध्ये जुळणाऱ्या शब्दांची पेरणी केली जायची. हे कसब बहिणाबाईंना उत्तमरीत्या जमले. त्यांनी दळलेल्या पिठातून कुटुंबाची भूक भागली तर त्याच वेळी निर्माण होत गेलेल्या काव्याने समग्र मराठी काव्यप्रांताची भूक भागवली असे म्हणण्यापेक्षा मेजवानी दिली, असेच म्हणावे लागेल.

बहिणाबाईंची भाषा आणि शब्दभांडार हे अहिराणी, खान्देशी बोली भाषेशी आणि प्रदेशाशी संबंधित आहे. 'धांडा', 'तावा', 'चुल्हा', 'बैतन', 'फुकनी', 'धुक्कय', 'मया', 'खय' असे कितीतरी शब्द शहरी रसिक-वाचकांना नवीन वाटतात. 'हातामधी घडाय फुकट गेला याय', 'शिदोळाले आला राग, माले म्हना फन्या नाग', 'भरली येहेर, मोट चाले भराभर, कशाले करतं, कनाचाक कुरकुर', 'आरशी झाली पारखी, आता मी कोनासारखी?' अशा कितीतरी म्हणींचा परिचय होतो.

त्यांच्या काव्याला नटण्यामुरडण्याची हौस नाही, अलंकारांची अपेक्षा नाही, बहिरंगांचा फाजील सोस नाही. ओघाने त्यांचे काव्य वाक्प्रचार, म्हणी आणि प्रतिमांनी नटते. त्यांच्या रचनांच्या प्रतिमांचे अधिष्ठान 'धरित्री' हेच आहे. ती त्यांच्या काव्यात सातत्याने वावरताना दिसते. 'माझी माय सरसोती', 'हिरीताचं देनंघेनं', 'धरित्रीला दंडवत', 'आता माझा माले जीव', 'देव अजब गारोडी' किंवा कितीतरी 'स्फुट ओव्यां'मधूनही ते जाणवते. 'धरित्री'प्रमाणेच 'आभाळ', 'पाऊस', 'मन', 'सपान' याही प्रतिमा भुरळ घालण्याची क्षमता ठेवतात.

'मन वढाय वढाय
उभ्या पिकातलं ढोर
कितीहाकला हाकला
फिरी येतं पिकावर'
('मन', 'बहिणाईची गाणी', पृ. १८)

'सांग सांग धर्ती माता
अशी कशी जादू झाली
झाड गेलं निंधीसनी

मांघे सावली उरली!'

('आता माझा माले जीव', 'बहिणाईची गाणी', पृ. २२)

अशा रचनांमधील त्यांच्या प्रतिमा वाखाणण्याजोग्या आहेत.

संतांनी आपल्या काव्यनिर्मितीचे श्रेय परमेश्वराला दिले. बहिणाबाईसुद्धा आपल्या रचनांमागे ईश्वरी प्रेरणा असल्याचे नमूद केले. रामदास, तुकाराम, मुक्ताई यांच्या काव्याशी बहिणाबाईंची कविता काहीशी मिळतीजुळती वाटली तरी तिला संतसाहित्य म्हणून संबोधता येणार नाही; कारण एकोणविसाव्या शतकातील जगण्यात त्यांना आलेले अनुभव त्यांनी आपल्या कवितांमधून चित्रित केले आहेत. त्यात जाणीवपूर्वक प्रबोधनाची पेरणी केली नसून अनुभूतींच्या प्रगटीकरणाबरोबर ओघाने ते येते.

'महाराष्ट्राच्या ओठांवर ज्ञानेश्वरांची ओवी, एकनाथांचे भारुड, तुकारामांचे अभंग आणि बहिणाबाईंची गाणी आहेत. बहिणाबाईंची गाणी जीवनाला स्पर्श करणारी, सहस्रपदरी आहेतच, पण त्यांचं आणखी एक महत्त्वाचं वैशिष्ट्य म्हणजे या गाण्यांमध्ये लय आहे, ताल आहे, गेयता आहे. सुरेख चालींमध्ये ही गाणी म्हणता येतात. असं लय, ताल, गेयता असणारं काव्य कधीही कालबाह्य होत नाही. म्हणूनच शतकापूर्वीची बहिणाबाईंची गाणी आजही आवडीने गायली जातात.'[२]

बुक्का उधळीत गावात येणारी पंढरीची दिंडी, कधी गावातल्या विठ्ठल मंदिरातले कथाकीर्तन, राम मंदिरातील संतांच्या भेटीगाठी, दर्शन, जळगावातला रथ, जयरामबुवाला मिळणारा मुंजाचा मान हे विषय त्यांच्या आध्यात्मिक आवडीला स्पष्ट करतात, श्रद्धादर्शी मनाला प्रकट करतात.

रामाच्या, विठोबाच्या मंदिरांत ऐकायला मिळालेल्या कीर्तन, प्रवचन, भजनातून त्यांच्या मनात काव्याचे बीज रुजले असावे आणि त्यातूनच प्रसंगानुसार अनेक अनुभवांचे बोल त्यांनी ओवीबद्ध केले असावेत, असे म्हणावेसे वाटते. मात्र त्यांच्या रचनांमध्ये श्रद्धा आहे, अंधश्रद्धा नाही.

साहित्यनिर्मितीसाठी व्यापक शिक्षणाची आवश्यकता असते, हा समज अनेक संत, महंत, कवींनी खोटा ठरविला. त्यात संत गाडगेबाबा, संत तुकडोजी महाराज, संत गुलाबराव महाराज अशा संतांच्या पंक्तीत शोभेल, अशी एक अडाणी, निरक्षर स्त्री जीवनाचे तत्त्वज्ञान शिकवून गेली. बहिणाबाईंचे निरक्षरत्व उलट त्यांच्या काव्याला एक सहजता प्रदान करते. कारण कवितेचे बहिरंग नटविणे, त्याला ओढूनताणून अलंकार घालणे ही

जाणीवच कुठे नाही. त्यामुळेच साध्या, सरळ जगण्यातून निसर्गाचे जे अवलोकन होत गेले, तेच त्यांच्या कवितेतून प्रतिमांच्या रेलचेलीने अवतरले. जाणीवपूर्वक नाही, तरी उपमा, उत्प्रेक्षा, रूपक, अनुप्रास, यमक आदी अलंकारांचा समर्पक वापर बहिणाबाईंच्या कवितेत आढळतो. त्यांच्या प्रतिमांचे मूळ 'धरित्री' आहे. बहिणाबाई अस्सल शेतकरी असून धरतीशी जणू त्यांची नाळ जोडली गेली आहे. म्हणूनच 'धरित्री'च्या प्रतिमेतून त्या जन्मदा, सखी अशी विविध नात्यांची गुंफण उलगडून दाखवतात. धरित्री ही काळी, खडकाळ तरीही तिच्यातून उगवणारी फुले, फळे सुंदर, सुगंधी, चविष्ट, विविध रंगांनी परिपूर्ण अशी आहेत. म्हणजे हे सगळे गुण, ही सर्व वैशिष्ट्ये या धरित्रीमध्ये आहेत; पण ती स्वतःजवळ न ठेवता वाटून टाकण्यातच तिला धन्यता वाटते. बहिणाबाईंना यातून सृष्टीच्या आणि ईश्वराच्या मूळ रूपाशी एकच शक्ती निगडित आहे, हेच दाखवायचे आहे.

'धर्तीमधल्या रसानं
जीभ माझी सवादते
तव्हा तोंडातली चव
पिंडामधी ठाव घेते'

('माझी माय सरसोती', 'बहिणाईची गाणी', पृ. ३)

धरतीप्रमाणेच आभाळही बहिणाबाईंच्या कवितांमधून डोकावते. धरती आणि आभाळ यांना जोडणारा रेशीमबंध म्हणजे पाऊस. निसर्गाशी संबंधित सर्वच घटक बहिणाबाईंच्या जीवनाशी एकरूप झाले होते. त्यांच्या सुखदःखाशी जुळले होते. चैत्र-वैशाखातले ऊन, अमृताची गोडी असणारी 'लौकी' नदी, माहेरच्या वाटेवरचे बाभळीचे वन, काटेगोटे, पाण्याच्या डाबा, वडाची झाडे, पळसाची फुले, सुगरण-साळुंकीसारखे पक्षी, ढगांचा गडगडाट, सुसाट वाहणारा मारोतीचा बाप - वारा, धरतीचा परिमळ, पावसाच्या झडी तर कधी पांडुरंगाचे गीता-भागवत सामावून घेणारा आल्हाददायक पाऊस, मातीतले अंकुर, त्यातून उगवणारे सोने एवढेच कशाला तर बोरी-बाभळींची झाडे आणि त्यांचे शेतीसाठी घातले गेलेले कुंपण, विहिरी, त्यावरील मोट, 'कना', 'चाक', 'वखर', 'नांगर', 'तिफन', 'मोघडा', 'आऊत', 'गोफनी', 'कोयपं', 'इये', 'सरत' अशी शेतीशी संबंधित अवजारे आणि वस्तूही सतत त्यांच्या रचनांतून सहजगत्या अवतरत राहतात. 'पेरणी', 'कापणी', 'रगडणी', 'उपनणी' हे तर

त्यांच्या काव्याचे मुख्य विषयच होते.आणि या सर्वांच्या किमयेला पाहून त्यांना 'देव अजब गारोडी' वाटतो आणि त्यांच्या काव्याला अध्यात्माचा स्पर्श होतो.

कामाच्या रामरगाड्यात कधी विरंगुळ्याचे क्षणही येतात. सणासुदीला सासरहून माहेरी जाण्याच्या संधी मिळतात. 'गुढी उभारनी', 'आखजी', 'पोया' असे सण साजरे केले जातात. त्या सणांचे महत्त्व, गुढी उभारली जात असून तिला 'पाडवा' का म्हणायचे असे तत्त्वचिंतनात्मक प्रश्न, बैलांच्या ऋणांची जाणीव, त्यांचे पूजन आणि या सणांच्या निमित्ताने एकत्र येणारे नातेवाईक, मैत्रिणी, खेळले जाणारे झिम्मा-फुगडीसारखे खेळ, झोके, आणि हे झोकेही कसे तर 'गेला झोका, गेला झोका, चालला माहेराला जी, आला झोका, आला झोका, पलट सासराले जी' असे सासर-माहेरच्या प्रवासात रमलेले. अशी अत्यंत सुरेख वर्णने त्यांच्या काव्यातून प्रकटली.

एकंदरीत काय तर निसर्ग, भूमी आणि शेतकरी, ग्रामीण जीवनाला बहिणाबाईंच्या काव्यात विपुलत्वाने स्थान मिळाले आहे. मात्र या सर्वाचे श्रेय त्या सर्वशक्तिमान परमेश्वराला देतात.

त्या स्वतः शैक्षणिकदृष्ट्या विद्वान नसल्या तरी विद्वत्तेशिवायही अव्वल दर्जाच्या काव्याची निर्मिती होऊ शकते, हे बहिणाबाईंच्या कवितेतून अनेक समीक्षकांच्या प्रत्ययाला आले आहे. 'रचनेच्या आणि भाषेच्या दृष्टीने बहिणाईचे काव्य अत्यंत आधुनिक आहे. प्रत्येक काव्यामध्ये एक संपूर्ण घटना किंवा विचार आहे. त्याचा प्रारंभ आणि अखेर परिणामाच्या दृष्टीने नाट्यात्मक व्हावा, ह्याबद्दल त्यांचा कटाक्ष आहे. शब्दांचा किंवा विचारांचा फार विस्तार न करता थोडक्यामध्ये एखादी भावना जास्तीत जास्त प्रभावाने कशी व्यक्त करता येईल ह्याकडे त्यांनी विशेष लक्ष दिलेले आहे. त्या दृष्टीने मराठी भाषेवरचे त्यांचे प्रभुत्व केवळ अद्‌भुतच म्हटले पाहिजे.'[३]

दैनंदिन कामाचे, शेतीकामातील अनुभवांचे, नातेवाइकांच्या स्वभावाचे, अचानक घडलेल्या काही घटनांचे त्यांनी आपल्या साध्या, सोप्या, सरळ भाषेतून जे कवितेच्या रूपात वर्णन केले आहे, ते अप्रतिम तर आहेच; पण सुशिक्षितांना अचंबित करणारे आहे.

'बहिणाबाईंच्या काव्यात जातिवंत जिव्हाळा आणि अलौकिक प्रतिभा होती. जीवनातील सुखदुःख, ऊनपाऊस, चढउतार सारख्याच संयमाने पचवून, प्रत्येक क्षण त्या नुसत्या उत्कटतेने जगल्या नाहीत, तर प्रत्येक क्षणाला त्यांनी

बोलते केले आणि म्हणूनच वास्तविकता आणि सत्य यांचा स्पर्श झालेले त्यांचे काव्य आपल्या मनाचा ठाव घेते.'[४]

अनुभूतीच भंडारावर आणि निसर्गदत्त देणगीच्या जोरावर बहिणाबाईंनी आपल्या रचनांनी महाराष्ट्राला वेड लावले. त्यांना जाणवणाऱ्या प्रत्येक संवेदनशील घटनेचा आणि घटकांचा त्यांनी वेध घेतला. त्यात व्यसनांच्या आहारी गेलेल्या व्यक्ती, त्यामागची कारणे, अस्पृश्यांचे हलाखीचे जीवन हे विषय पण येतात. लोकांचे रंजन करून डोळ्यात अंजन भरणारा 'रायरंग', धुडी 'धुडाबोय', मुसलमान झालेला 'मारोत्या', 'मुक्की पिंजारीन', कमेटीतला 'मुनीर' शिपाई, 'छोटू भैय्या', 'पर्सुराम बेलदार', 'भोजा' फुटका, 'लालू मिय्या' अशा अनेक व्यक्तिरेखा स्वभाव, परिस्थितीनुसार समाजाला काहीतरी शिकवून जातात. भावनिक नाते जोडतात. बहिणाबाईंच्या निरीक्षणशक्तीचा परिचय देतात.

'मधमाशी जशी मध गोळा करते, तसे हे वेचक अनुभव आहेत. मध हे सत्य आहे, कल्पना नाही. ते शोधावे तेव्हा मिळते. एकाच वेळी बहिणाबाई मधमाशांचे व कोळ्याचे जीवन जगत होत्या, साकारत होत्या. सुंदर, कलात्मक, माधुर्यपूर्ण चित्रण करणारे पुष्कळसे कवी घरातच असतात. पुस्तके वाचतात, जाळी विणतात; पण त्यांचे लेखन क्षणजीवी असते, त्यात सत्य नसते. जीवनाचा शोध नसतो. वाङ्मयकारांनी जीवनाकडे जायला पाहिजे. जीवनाचा शोध, संशोधन केले पाहिजे. साहित्यात जीवनाचा साक्षात्कार घडविला पाहिजे. हा जीवनाचा अनुभव जर नसेल तर साहित्याचा अधःपात होतो. साहित्य या कसोटीस ते उतरत नाही. श्रमातून साकारलेले साहित्य अक्षर ठरते. श्रेष्ठ वाङ्मय हे श्रमातून जन्मास येते. श्रम आणि साहित्य यांचा असा अनन्यसाधारण संबंध आहे. बहिणाबाईंची गाणी श्रमिकांची वेदना आहे, स्वेदाची गंगोत्री आहे, असे म्हटले पाहिजे.'[५]

बहिणाबाईंच्या काव्याचे विषय सर्वव्यापक असे आहेत. त्यामागे त्यांचे जीवनानुभव कारणीभूत आहेत. जीवनाचे आणि समाजातील प्रत्येक घटकाच्या मनोवृत्तींचे सखोल अध्ययन त्यांनी केले. 'कधी विहिरीतील पाण्यानं त्यांना काव्याचा मंत्र दिला. ज्या ज्या गोष्टीवर त्यांची नजर गेली, जी जी व्यक्ती त्यांच्या सहवासात आली, ज्या ज्या वस्तूला त्यांचा स्पर्श झाला ती ती काव्यविषय झाली. शेतातलं पीक असो, पोळा असो वा आखजी असो, पर्सुराम बेलदार असो नाहीतर चिमाबोय असो, माहेरचा गाव असो की

माहेरच्या गावच्या वाटेवरचं ‘रेलबाईचं फाटुक’ असो, सारे सारे काव्यविषय बनले. दगडांना वाचा फुटली वृक्षवेलींच्या भावना व्यक्त झाल्या. बहिणाबाईंचं काव्य हे असं व्यापक आहे, सर्वस्पर्शी आहे.’[६]

अभिजात काव्यनिर्मितीला साक्षरतेची उणीव भासते, हा भल्याभल्यांचा गैरसमज बहिणाबाईंच्या उत्स्फुर्त काव्यामुळे खोटा ठरला. हातात कधीही लेखणी न धरलेल्या बहिणाबाईंची अध्यात्म, निसर्ग, विनोद, कारुण्य, उपरोध, भक्ती, सामाजिक अशा विविध विषयांवरील कविता वाचताना मर्मज्ञ रसिकसुद्धा आश्चर्यचकित होतात. तत्कालीन श्रेष्ठ साहित्यिक आचार्य अत्रे यांनी बहिणाबाईंच्या कवितेला बावनकशी सोने म्हटले, यातच त्यांच्या निर्मितीच्या अभिजाततेची ग्वाही मिळते.

‘बहिणाबाईंची काव्यसृष्टी निसर्गप्रतिमांनी खच्चून भरलेली आहे. त्यांची शब्दकला अनुपम आहे. त्यांची चित्रवती भाषाशैली मनोवेधक आहे. त्यांची गाणी प्रासादिक आहेत. श्रवणमधुर आहेत. त्यांच्या गाण्यात आनंद आहे; पण आनंदाची बेहोषी नाही. सुख आहे पण सुखाचं उतणं मातणं नाही. दुःख आहे पण दुःखाचा आक्रोश नाही. तत्त्वज्ञान आहे, पण तत्त्वज्ञानाचा रूक्षपणा नाही. उपदेश आहे, पण उपदेशातला कोरडेपणा नाही. अलंकरण आहे, पण अलंकारांमुळे कवितेला येणारा बोजडपणा नाही. कल्पनाविलास आहे, पण कल्पनाविलासामुळे येणारी कृत्रिमता नाही. त्यांच्या गाण्यात विनोद आहे, पण विनोदामुळे गांभीर्याला बाधा येत नाही... बहिणाबाईंची गाणी आहेतच तशी अनमोल.’[७]

आज बहिणाबाईंची गाणी अजरामर झाली आहेत. संगीतबद्ध झाली आहेत, चित्रपटांतून उतरली आहेत. सामाजिक जाणिवा, अध्यात्माचा स्पर्श, जीवनविषयक सर्वांग सुंदर तत्त्वज्ञान, दीनदलितांप्रती कणव, शेतकरी आणि ग्रामीण जीवनाशी जुळलेली नाळ, अंधश्रद्धा, व्यसने यांच्याविषयी स्पष्ट मते, सण, स्त्रीजीवन, विनोद, हास्य-कारुण्य, मानवतावाद, उपदेशपरता, संतांविषयी आदर, साहित्याला नव्याने ओळख करून दिलेले ग्रामीण, शेतरी जीवनात वापरले जाणारे शब्द, वाक्प्रचार आणि म्हणी असे विविधांगी विषय आणि वैशिष्ट्ये यांनी त्यांची कविता बहरली आहे. कुठेही अहंभाव नाही, स्पष्ट भूमिका मांडताना कुणाची भीडमूर्वत नाही. नैराश्याला दूर सारत आशेचा किरण तेवता ठेवत कठीण परिस्थितीशी लढण्याचा महामंत्र देणारी त्यांची कविता नैराश्याने आणि बिकट परिस्थितीने ग्रासलेल्या शेतकऱ्यांना तर

आत्महत्येपासून परावृत्त करण्याचे सामर्थ्य ठेवतेच, शिवाय माणसाला माणसापासून दूर नेणाऱ्या विज्ञानवादी युगात समग्र मानवाला माणूसपण शिकवण्याची, जीवनाचे तत्त्वज्ञान शिकवण्याची धमक ठेवते. या महान कवयित्रीने मराठी साहित्याला दिलेल्या या सहजमुक्त काव्याचे, या बावनकशी सोन्याचे मोल लावता येणार नाही. अद्भुत आणि अविश्वसनीय असेच म्हणावे लागेल. त्यांच्या एकूणच व्यक्तिमत्त्वाला आणि कार्यकर्तृत्वाला विनम्र अभिवादन!



## संदर्भ :


१. धुप्पड, माया, बहिणाबाई चौधरी आणि त्यांच्या सहस्रपदरी कविता, अक्षररंग पुरवणी, दै. लोकमत, पुणे, दि. ३—१२—२०००, पृ. १.

२. तत्रैव.

३. अत्रे, प्र.के., 'परिमळ — पहिल्या आवृत्तीची प्रस्तावना', बहिणाईची गाणी, बहिणाबाई चौधरी, सुचित्रा प्रकाशन, मुंबई, सातवी आवृत्ती, १९९९, प्रा.पृ. १३.

४. वरुडकर, माधुरी, निसर्गकन्या, अक्षररंग पुरवणी, दै. लोकमत, पुणे, दि. १—१२—२००२, पृ. ३.

५. यादव, (डॉ.) स.ग., जुन्यात चमकेल नव्यात झळकेल अशी कविता, निसर्गकन्या बहिणाई चौधरी, प्रचार प्रकाशन, कोल्हापूर, पहिली आवृत्ती, १९८२, पृ. ६.

६. भिरुड, (डॉ.) प्रमिला, 'बहिणाबाई चौधरी : एक श्रेष्ठ कवयित्री', बहिणाओीची गाणी : एक अभ्यास, व्यंकटेश प्रकाशन, जळगाव, प्रथमावृत्ती, २००३, पृ. २४.

७. कऱ्हाडे, सदा, 'बहिणाबाईची गाणी — एक चिंतन', बहिणाईची गाणी, बहिणाबाई चौधरी, सुचित्रा प्रकाशन, मुंबई, सातवी आवृत्ती, १९९९, प्रा.पृ. ५९.




# संदर्भग्रंथसूची
## (अकारविल्हे)
## अ. ग्रंथ

१. कांबळे, आशालता, बहिणाबाईंची कविता : एक आकलन, प्रथमावृत्ती, अश्वमेध प्रकाशन, पुणे, २०००.

२. चिडगोपकर, (डॉ.) अलका, बहिणाबाईंची गाणी : एक काव्यदर्शन, प्रथमावृत्ती, स्नेहवर्धन पब्लिशिंग हाऊस, पुणे, २०००.

३. चौधरी, बहिणाबाई, बहिणाईची गाणी, सातवी आवृत्ती, सुचित्रा प्रकाशन, मुंबई, १९९९.

४. चौधरी, स्नेहलता, भूमिकन्या बहिणाबाई चौधरी : एक चिंतन, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, द्वितीयावृत्ती, २००२.

५. जोग, रा.श्री., अभिनव काव्यप्रकाश, आठवी आवृत्ती, व्हीनस प्रकाशन, पुणे, १९८४.

६. जोशी, महादेवशास्त्री (संपा.), भारतीय संस्कृतिकोश, खंड सहावा, प्रथमावृत्ती, भारतीय संस्कृतिकोश मंडळ, पुणे, १९७०.

७. जोशी, लक्ष्मणशास्त्री आणि इतर (संपा.), मराठी विश्वकोश, खंड अकरावा, प्रथमावृत्ती, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई, १९८२.

८. नसिराबादकर, ल.रा., प्राचीन मराठी वाङ्मयाचा इतिहास, सहावी सुधारित आवृत्ती, फडके प्रकाशन, कोल्हापूर, १९९७.

९. पगारिया, (डॉ.) सुशीला, खान्देशच्या शेतातून उमललेल्या कवयित्री बहिणाई, जळगाव, १९९३.

१०. भिरूड, प्रमिला, बहिणाओीची गाणी : एक अभ्यास, प्रथमावृत्ती, व्यंकटेश प्रकाशन, जळगाव, २००३,

११. मालशे, स.गं. (संपा.), मराठी वाङ्मयाचा इतिहास, खंड दुसरा, भाग पहिला, प्रथमावृत्ती, महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे, १९८२.

१२. यादव, (डॉ.) स.ग., निसर्गकन्या बहिणाबाई चौधरी, प्रथमावृत्ती, प्रचार प्रकाशन, कोल्हापूर, १९८२.

१३. वाबगावकर, म.शं., संशोधन व आस्वादन, प्रथमावृत्ती, साहित्य प्रसार केंद्र, नागपूर, १९७७.

## ब. वृत्तपत्रे/नियतकालिके

१. (दै.) देशोन्नती (अकोला), बहिणाबाईंची सहस्रपदरी कविता, सुनील पवार, साहित्य स्पंदन, दि. १–११–२००२.
२. (दै.) लोकमत (पुणे), बहिणाबाई चौधरी आणि त्यांच्या सहस्रपदरी कविता, माया धुप्पड, अक्षररंग पुरवणी, दि. ३–१२–२०००.
३. (दै.) लोकमत (पुणे), निसर्गकन्या, माधुरी वरुडकर, अक्षररंग पुरवणी, दि. १–१२–२००२.
४. (दै.) सकाळ (पुणे), बहिणाईचे माहेर, (डॉ.) विजया खानझोडे, मधुरा पुरवणी, दि. १७–८–२००५.

## क. प्रबंध

१. मांडवकर, वीरा, भूमिका व ऋणनिर्देश, संत बहिणाबाई : व्यक्ती आणि वाङ्मय, संत गाडगेबाबा अमरावती विद्यापीठाच्या आचार्य पदवीसाठी सादर केलेला प्रबंध, २००६, पृ. ५.

## ड. संकेतस्थळे

1. www.docstoc.com
2. www.encyclopedia.balaee.com
3. www.marathiblogs.net/
4. www.marathikavitaa.wordpress.com
5. www.widamban.com

## इ. संशोधनाधार ग्रंथ

१. पाटील, वा.भा., संशोधन पद्धती, प्रथमावृत्ती, श्री मंगेश प्रकाशन, नागपूर, १९९८.
२. बेहेरे, सुमन, सामाजिक संशोधन पद्धती (तंत्रे आणि पद्धती), प्रथमावृत्ती, विद्या प्रकाशन, नागपूर, १९९८.

३. बोधनकर, सुधीर व अलोणी, विवेक, सामाजिक संशोधन पद्धती, द्वितीयावृत्ती, श्री साईनाथ प्रकाशन, नागपूर, १९९९.

४. भांडारकर, पु.ल., सामाजिक संशोधन पद्धती, प्रथमावृत्ती, महाराष्ट्र विद्यापीठ ग्रंथनिर्मिती मंडळ, नागपूर, १९७६.

५. मालशे, स.गं., शोधनिबंधाची लेखनपद्धती, प्रथमावृत्ती, सुविचार प्रकाशन मंडळ, पुणे–नागपूर, १९७५, पुनर्मुद्रण, १९८८.

६. शर्मा, वीरेन्द्र, रिसर्च मेथडॉलॉजी, संशोधित द्वितीय संस्करण, पंचशील प्रकाशन, जयपूर, २००१.

7. Joseph Gibaldi, MLA Handbook for Writers of Research Papers, Sixth Edition, Affiliated East-West Press Pvt Ltd, New Delhi, 2004.

## फ. शुद्धलेखनाधार ग्रंथ

१. गोखले, द.न., शुद्धलेखन विवेक, प्रथमावृत्ती, सोऽहम प्रकाशन, पुणे, १९९३.

२. मांडवकर, पवन, ठळक शुद्धलेखन, द्वितीयावृत्ती, डॉ. भाऊ मांडवकर संशोधन केंद्र, कळंब, जि. यवतमाळ, २०१३.

३. वाळंबे, मो.रा., मराठी शुद्धलेखन प्रदीप, द्वितीयावृत्ती, नितीन प्रकाशन, पुणे १९८३.



# प्राचार्य डॉ. पवन मांडवकर यांचा परिचय

प्राचार्य, इंदिरा महाविद्यालय, कळंब, जि. यवतमाळ
अध्यक्ष, संत गाडगे बाबा अमरावती विद्यापीठ मराठी प्राध्यापक परिषद
कार्यकारिणी सदस्य, अमरावती विद्यापीठ प्राचार्य फोरम

डॉ. पवन मांडवकर यांनी मराठी आणि इंग्रजी अशा दोन विषयात एम.ए. केले आहे. त्यांनी बी.एड. ची पदवी प्राप्त केली असून 'दया पवार : वाङ्मयदर्शन आणि चिकित्सा' या विषयावर त्यांना अमरावती विद्यापीठाने आचार्य पदवीने सन्मानित केले आहे. मराठी विषयातच ते युजीसी तर्फे घेतली जाणारी नेट परीक्षाही उत्तीर्ण झाले आहेत. एम.ए. मराठीत ते विद्यापीठातून प्रथम आले होते तर बी.एड.च्या परीक्षेत त्यांनी प्रावीण्य मिळविले होते.

त्यांनी भारतीय वायूसेनेत सेमी टेक्निशियन म्हणून सात वर्षे सेवा दिली आहे. या दरम्यान ते तामीळनाडूतील चेन्नई येथे, पंजाबमधील चंदिगढ येथे आणि राजस्थानातील उतरलाई जि. बाडमेर येथे कार्यरत होते. त्यानंतर सोनामाता हायस्कूल, चहांद येथे सहायक शिक्षक, इंदिरा महाविद्यालय, कळंब येथे मराठी अधिव्याख्याता आणि आता इंदिरा महाविद्यालय, कळंब येथे प्राचार्यपदावर कार्यरत आहेत.

विविध विषयांवरील त्यांची पंचेचाळीस पुस्तके प्रकाशित असून वृत्तपत्रे व नियतकालिकांतून ते सातत्याने लेखन करतात. त्यांच्या 'किलबिलाट' ह्या बालकाव्यसंग्रहाला महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळातर्फे अनुदान देण्यात आले आहे.

शालेय व महाविद्यालयीन जीवनात डॉ. पवन मांडवकर यांनी वक्तृत्व, वादविवाद स्पर्धांची तसेच खेळात रनिंगमध्ये अनेक पारितोषिके पटकावली आहेत. नंतरही त्यांना काही पुरस्कार मिळाले आहेत.

अनेक विभागीय, राज्यस्तरीय, राष्ट्रीय चर्चासत्रांचे, कार्यशाळांचे, अधिवेशनांचे आयोजन त्यांनी केलेले आहे. स्वतः विविध चर्चासत्रे, कार्यशाळा यांमध्ये निबंधवाचन व चर्चासत्रांचे अध्यक्ष म्हणून त्यांना संधी मिळाली आहे. अनेक संशोधनपर ग्रंथ आणि शोधनिबंध त्यांच्या नावावर असून परदेशातही त्यांनी शोधनिबंधांचे वाचन केले आहे. परदेशात चर्चासत्राच्या अध्यक्षपदाचा मान त्यांना मिळाला आहे. 'मराठी प्राध्यापक संशोधन पत्रिका' व 'रिसर्च जर्नल ऑफ इंडिया' या राष्ट्रीय स्तरावरील नियतकालिकांचे ते मुख्य संपादक आहेत. अनेक महाविद्यालयांच्या जर्नल्सच्या सल्लागार मंडळावर किंवा संपादक मंडळावर ते कार्यरत आहेत. विद्यापीठाच्या दूरशिक्षण विभागासाठी त्यांनी क्रमिक पुस्तकांचे लेखनही केले आहे.

## संस्थापक / पदाधिकारी / सदस्य

१. संस्थापक – डॉ. भाऊ मांडवकर संशोधन केंद्र, इंदिरा महाविद्यालय, कळंब, जि. यवतमाळ

२. अध्यक्ष – संत गाडगे बाबा अमरावती विद्यापीठ मराठी प्राध्यापक परिषद, अमरावती

३. संस्थापक अध्यक्ष – आदर्श संघटना, विजय कॉलनी, अमरावती

४. उपसचिव – डॉ. य.मो. दोंदे सार्व. शै. ट्रस्ट, कळंब, जि. यवतमाळ

५. कार्यकारी मंडळ सदस्य – इमेज वेलफेअर अचिव्हर्स फोरम, ठाणे

६. कार्यकारी मंडळ सदस्य – दिशा गायडन्स सेंटर, रुक्मिणी नगर, अमरावती

७. व्यवस्थापक – सेवा प्रकाशन, विजय कॉलनी, अमरावती

८. माजी सदस्य – संत गाडगेबाबा अमरावती विद्यापीठ रासेयो सल्लागार समिती

९ कार्यकारी मंडळ सदस्य – डॉ. य.मो. दोंदे वाचनालय, बोरी महाल, ता. कळंब, जि. यवतमाळ, श्री. रमेश रामचंद्र खवणे वाचनालय, कळंब, जि. यवतमाळ, जयसेवा वाचनालय, अमरावती, इंदिराबाई दोंदे वाचनालय, मूर्तिजापूर, जि. अकोला

## प्रकाशित पुस्तके

बालकथा – गाढव गोष्टी, झंपू, गंमतगोष्टी, संस्कारशील श्याम, गौरीची दिवाळी

कादंबऱ्या – डेड लॉक, विरह, अपूर्ण संघर्ष, मी अनामिका बोलतेय, दीपशिखा

कथासंग्रह – दामूअण्णा (विनोदी), ब्यांड मास्तर (उत्कृष्ट कथासंग्रह म्हणून राज्यस्तरीय पुरस्कारप्राप्त)

काव्य – प्रेम कविता, किलबिलाट (बालकाव्य) (साहित्य संस्कृती मंडळ अनुदानित)

अभ्यासात्मक / संशोधनात्मक / संदर्भग्रंथ – झटपट शुद्धलेखन, झटपट पत्रलेखन, झटपट मराठी शुद्धलेखन, ठळक शुद्धलेखन, झटपट निबंध, दया पवार, अर्वाचीन मराठी कविता : १८८५ ते १९३५ : एक दृष्टिक्षेप, बहिणाईची गाणी : सौंदर्य आणि समीक्षा, दया पवार : वाङ्मयदर्शन आणि चिकित्सा (यूजीसी अनुदानित प्रबंध), दलित कथा आणि विटाळ

संकीर्ण – धमाल वार्ता, छान छान नावे बाळांची, एका रखेलीची (आत्म)हत्या! (रहस्यकथा), वास्तुशास्त्रातील ठळक संकेत, हसणावळ, शेतकऱ्यांच्या आत्महत्या, अण्णा हजारेंचे राळेगणसिद्धी, सद्दाम हुसैन, शरद पवार, शरद जोशी

धार्मिक – शनिशिंगणापूर, श्री क्षेत्र चिंतामणी कळंब, वैदर्भीय अष्टविनायक, श्री क्षेत्र माहूरगड

संपादन – आदर्श (त्रैमासिक हस्तलिखित)(शालेय जीवनात दोन वर्ष चालवलेले नियतकालिक), घरगुती व्यवसाय (शालेय जीवनात केलेले पहिले संपादन), ज्ञानदीप (अमरावती विद्यापीठ शिक्षण महाविद्यालय वार्षिकांक १९९४–९५), ओंजळ (प्राति.

काव्यसंग्रह) , गंधाली (प्राति. चारोळीसंग्रह), सिंधू (गौरवग्रंथ), मराठी प्राध्यापक सूची, दलित, ग्रामीण आणि प्रादेशिक साहित्य, संत साहित्य

## पुरस्कार

विदर्भ संत साहित्य संमेलन अंजनगावसूर्जी – २००१ सन्मान पत्र, आध्यात्मिक सहजसमाधी विश्वविद्यापाठाचा आचार्य काव्यरत्न पुरस्कार – २००४, म. ज्योतिबा फुले शिक्षाविद पुरस्कार – चतुर्थ अखिल भारतीय प्रतिभा सम्मान पुरस्कार समारोह, इन्दौर –२००७, साहित्य गौरवपत्र – साहित्यप्रेमी सार्वजनिक वाचनालय, इस्लामपूर, २००७, सर्वोत्कृष्ट कथासंग्रह पुरस्कार – ब्यांड मास्तर – साहित्यप्रेमी सार्वजनिक वाचनालय, इस्लामपूर, २००७

## संपादन क्षेत्रातील कार्य व अन्य काही विशेष

१. 'घरगुती व्यवसाय' शालेय जीवनात केलेले पहिले संपादन

२. वयाच्या १३ व्या वर्षी 'आदर्श' हस्तलिखित त्रैमासिक सुरू करून त्याचे दोन वर्षे संपादन.

३. अमरावती विद्यापीठ शिक्षण महाविद्यालयात बी.एड.चे शिक्षण घेत असताना 'ज्ञानदीप' वार्षिकांकाचे संपादन.

४. ओंजळ (प्राति. काव्यसंग्रह), गंधाली (प्राति. चारोळीसंग्रह), सिंधू (गौरवग्रंथ), मराठी प्राध्यापक सूची, दलित, ग्रामीण आणि प्रादेशिक साहित्य, संत साहित्य (महाराष्ट्रातील मराठी विषयाच्या प्राध्यापकांचे शोधनिबंध) या ग्रंथांचे संपादन

५. सरदार पटेल महाविद्यालय, चंद्रपूर, वाधवानी महाविद्यालय, यवतमाळ, पारवेकर महाविद्यालय, यवतमाळ यांच्या जर्नल्सच्या संपादन सल्लागार मंडळावर.

६. संत गाडगेबाबा अमरावती विद्यापीठाच्या दूरशिक्षण विभागाच्या बी.ए. १, २, ३ च्या मराठी विषयांच्या ग्रंथांतील काही भागाचे लेखक

७. देवी अहिल्या विश्व विद्यालय, इंदौर च्या एम.ए. व बी.ए. च्या मराठी विषयांच्या अनेक परीक्षांसाठी पेपर सेटर व परीक्षक

८. देवी अहिल्या विश्व विद्यालय, इंदौर च्या पीएच.डी. चे प्रबंध तपासणाऱ्या यादीतील परीक्षक

९. संत गाडगेबाबा अमरावती विद्यापीठाच्या मराठी विषयाचे पेपर सेटींग

१०. रिसर्च जर्नल ऑफ इंडिया, मराठी प्राध्यापक सशोधन पत्रिका या दोन राष्ट्रीय पातळीवरील आयएसएसअेन पीअर रिव्ह्यू नियतकालिकांचे मुख्य संपादक

११. आकाशवाणीवरून कथांप्रमाणेच अनेक संशोधनपर भाषणांचे प्रसारण तसेच अनेक चर्चासत्रे, कार्यशाळा, कार्यक्रम यांमधून भाषणे

१२. अनेक विभागीय, राज्यस्तरीय, आंतरराष्ट्रीय परिषदांमध्ये शोधनिबंध वाचन

